






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

डॉ. स. गं. मालशे

अंक १७४

आषाढ । श्रावण । भाद्रपद १८९२

जुलै । ऑगस्ट । सप्टेंबर १९७०





१८७० झाशीवाली १९७०

अनुक्रमणिका



महाराष्ट्र राज्य
साहित्य-संस्कृति मंडळ
पुरस्कृत

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : डॉ. स. गं. मालशे

संपादन समिती : अशोक रा. केळकर
म. ना. अदवंत, द. मा. मिरासदार
शंकर सारडा, भीमराव कुलकर्णी

अंक १७४
आषाढ । श्रावण । भाद्रपद १८९२
जुलै । ऑगस्ट । सप्टेंबर १९७०

## महाबळेश्वर साहित्य संमेलन विशेषांक

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे हे त्रैमासिक मुखपत्र
कार्यवाह भीमराव कुलकर्णी यांनी
महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३० येथे प्रसिद्ध केले.
मुद्रणस्थळ : कल्पना मुद्रणालय, शिव-पार्वती, टिळक रोड, पुणे ३०.

अनुक्रमणिका

■ महाबळेश्वर साहित्य-संमेलनानिमित्त हा अंक काढावा लागल्याने 'वाङ्मय समालोचन' पुढील अंकी.

■ ■ पत्रिकेचा हीरक-महोत्सव विशेषांक (अंक १७१–७२ जोड अंक) व मागील अंक (१७३) शिल्लक नाहीत. दुर्मिळ आहेत. कृपया मागणी करू नये.

■ ■ ■ गेल्या काही दिवसात सभासदसंख्या अनपेक्षितपणे वाढल्याने, १९७०–७१ सालची वर्गणी ज्यांच्याकडून आली नाही त्यांना अंक पाठविणे बंद करण्यात आले आहे.

---

१. आकाशवाणी, पुणे केंद्राच्या सौजन्याने

* ही व्याख्याने 'साहित्य–सेवा'त झाली असे तळटीपेत गैरसमजाने छापले गेले आहे. ती 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'त झाली होती.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, दुसरे अधिवेशन

# महाबळेश्वर साहित्य संमेलन

## दि. ७, ८, व ९ नोव्हेंबर १९७०

स. न. वि. वि.

महाबळेश्वरच्या निसर्गरम्य भूमीत, हॉलिडे कँपच्या प्रशस्त परिसरात दि. ७, ८ ९ नोव्हेंबर १९७० रोजी म. स. परिषदेचे दुसरे विभागीय संमेलन भरणार आहे.

या संमेलनाचे अध्यक्षस्थान सुप्रसिद्ध मराठी कवी श्री. बा. भ. बोरकर हे स्वीकारणार असून उद्घाटन खासदार नाथ पै यांच्या हस्ते होणार आहे.

या अधिवेशनात कविसंमेलन, कथासंमेलन, विनोदी लेखकांवर महिलांची फिर्याद हा अभिरूप खटला, ' चेहरे आणि मुखवटे ', ( प्रोग्रेसिव्ह डॅमॅटिक असोसिएशनचे नवे नाटक ) व ' आधे अधुरे, ( थिएटर युनिट ) ही नाटके आणि पाच परिसंवाद होणार आहेत.

या संमेलनाला कोणाही स्त्री-पुरुषाला हजर राहता येईल. आपण तर साहित्य परिषदेचे सदस्य आहात, तेव्हा आपण अवश्य यायला हवे.

संमेलनासाठी प्रतिनिधी फी रुपये पाच असून, तीन दिवसांच्या भोजन-निवासाचा खर्च प्रत्येकी तीस रुपये येईल. महाबळेश्वर–प्रतापगड–पाचगणी परिसरातील प्रेक्षणीय स्थळे दाखवण्यासाठी एस्. टी. ची सोय असून, त्याचा खर्च वेगळा पडेल.

हॉलिडेकँपची जागा मर्यादित असल्याने आपण आपले प्रतिनिधीशुल्क त्वरित पाठवून जागा राखून ठेवावी. नाहीतर आयत्या वेळी आपली मनासारखी सोय करणे आम्हांला कठीण होईल.

प्रतिनिधीशुल्क मनीऑर्डरने कार्यवाहांच्या पत्त्यावर पाठवा.

पत्ता : कार्यवाह, महाबळेश्वर संमेलन, १३४ साबणे रोड, महाबळेश्वर ( सातारा )

**आपले नम्र**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष, स्वागत समिती

शंकर रा. सारडा, कार्यवाह

डॉ. वसंत स जोशी,
भाऊसाहेब माळवदे
पं. रा. कुलकर्णी
} कार्यवाह

ओमप्रकाश सारडा
श्रीपाद नानजकर
} कोषाध्यक्ष

ना. ग. गोरे,
अध्यक्ष, म. सा. परिषद

डॉ. रा. शं. वाळिंबे, कार्याध्यक्ष

श्री. ग. ल. टोकळ
प्रा. भीमराव कुलकर्णी
प्रा. डॉ. वि. म. कुलकर्णी
} कार्यवाह

श्री. अ. अं. कुलकर्णी, कोषाध्यक्ष
प्रा. डॉ. स. गं मालशे, पत्रिका–संपादक

# महाबळेश्वर-साहित्य-संमेलन

## कार्यक्रम

### रविवार दि. ७ नोव्हेंबर १९७०

**सकाळी ११ वाजता :** ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन

**दुपारी ३॥ वाजता :** उद्घाटक श्री. नाथ पै यांचे भाषण
— स्वागताध्यक्ष श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे भाषण
— संदेश-वाचन
— अध्यक्ष श्री. बा. भ. बोरकर यांचे भाषण.

**रात्री ९ वाजता**— पद्माकर गोवईकरकृत विनोदी नाटक : ' चेहरे आणि मुखवटे '
दिग्दर्शक–भालबा केळकर. प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन. पुणे

### रविवार दि. ८ नोव्हेंबर १९७०

**सकाळी ९ वाजता :** कविसंमेलन
वि. द. घाटे, अनिल, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर, कृ. ब. निकुम्ब, वि. म. कुलकर्णी, अनुराधा पोतदार, चंद्रकांत खोत अरविंद वामन कुलकर्णी, दिलीप चित्रे, नारायण सुर्वे इ.

**सकाळी १० वाजता :** परिसंवाद क्र. १ : मराठी भाषेतील पारिभाषिक शब्द : घडण व भावी स्वरूप.
अध्यक्ष : लक्ष्मणशास्त्री जोशी, द. वा. पोतदार, डॉ. वा. ना. पंडित, डॉ. रा. शं. वाळिंबे, डॉ. ना. गो. कालेलकर, पंडित वेंकटेशशास्त्री जोशी, क. वा. केळकर, रा. ग. जाधव, डॉ. अशोक केळकर, डॉ. वसंत जोशी, डॉ. स. गं. मालशे, प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर.

**सकाळी १० वाजता :** परिसंवाद क्र. २ : दलित–साहित्य
अध्यक्ष : दुर्गा भागवत, ॲड. शंकरराव खरात, प्रा. वा. ना. वानखेडे, प्रा. अ. भि. शाह, प्रा. संभाजी कदम, प्रा. मे. पुं. रेगे, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्राचार्य शं. कृ. उनूने, बाबूराव बागूल, हरिभाऊ पगारे, प्रा. एस. एस. भोसले.









# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, दुसरे अधिवेशन

# महाबळेश्वर साहित्य संमेलन

## दि. ७, ८, व ९ नोव्हेंबर १९७०

स. न. वि. वि.

महाबळेश्वरच्या निसर्गरम्य भूमीत, हॉलिडे कँपच्या प्रशस्त परिसरात दि. ७, ८ ९ नोव्हेंबर १९७० रोजी म. स. परिषदेचे दुसरे विभागीय संमेलन भरणार आहे.

या संमेलनाचे अध्यक्षस्थान सुप्रसिद्ध मराठी कवी श्री. बा. भ. बोरकर हे स्वीकारणार असून उद्घाटन खासदार नाथ पै यांच्या हस्ते होणार आहे.

या अधिवेशनात कविसंमेलन, कथासंमेलन, विनोदी लेखकांवर महिलांची फिर्याद हा अभिरूप खटला, 'चेहरे आणि मुखवटे', (प्रोग्रेसिव्ह डॅमॅटिक असोसिएशनचे नवे नाटक) व 'आधे अधुरे, (थिएटर युनिट) ही नाटके आणि पाच परिसंवाद होणार आहेत.

या संमेलनाला कोणाही स्त्री-पुरुषाला हजर राहता येईल. आपण तर साहित्य परिषदेचे सदस्य आहात, तेव्हा आपण अवश्य यायला हवे.

संमेलनासाठी प्रतिनिधी फी रुपये पाच असून, तीन दिवसांच्या भोजन-निवासाचा खर्च प्रत्येकी तीस रुपये येईल. महाबळेश्वर–प्रतापगड–पाचगणी परिसरातील प्रेक्षणीय स्थळे दाखवण्यासाठी एस्. टी. ची सोय असून, त्याचा खर्च वेगळा पडेल.

हॉलिडेकँपची जागा मर्यादित असल्याने आपण आपले प्रतिनिधीशुल्क त्वरित पाठवून जागा राखून ठेवावी. नाहीतर आयत्या वेळी आपली मनासारखी सोय करणे आम्हांला कठीण होईल.

प्रतिनिधीशुल्क मनीऑर्डरने कार्यवाहांच्या पत्त्यावर पाठवा.

पत्ता : कार्यवाह, महाबळेश्वर संमेलन, १३४ सावणे रोड, महाबळेश्वर (सातारा)

**आपले नम्र**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष, स्वागत समिती

शंकर रा. सारडा, कार्यवाह

डॉ. वसंत स जोशी,
भाऊसाहेब माळवदे
पं. रा. कुलकर्णी
} कार्यवाह

ओमप्रकाश सारडा
श्रीपाद नानजकर
} कोषाध्यक्ष

ना. ग. गोरे,
अध्यक्ष, म. सा. परिषद

डॉ. रा. शं. वाळिंबे, कार्याध्यक्ष

श्री. ग. ल. ठोकळ
प्रा. भीमराव कुलकर्णी
प्रा. डॉ. वि. म. कुलकर्णी
} कार्यवाह

श्री. अ. अं. कुलकर्णी, कोषाध्यक्ष

प्रा. डॉ. स. गं मालशे, पत्रिका–संपादक

अनुक्रमणिका






# महाबळेश्वर-साहित्य-संमेलन

## कार्यक्रम

### रविवार दि. ७ नोव्हेंबर १९७०

**सकाळी ११ वाजता :** ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन

**दुपारी ३॥ वाजता :** उद्घाटक श्री. नाथ पै यांचे भाषण
— स्वागताध्यक्ष श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे भाषण
— संदेश-वाचन
— अध्यक्ष श्री. बा. भ. बोरकर यांचे भाषण.

**रात्री ९ वाजता—** पद्माकर गोवईकरकृत विनोदी नाटक : 'चेहरे आणि मुखवटे' दिग्दर्शक–भालबा केळकर. प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन. पुणे

### रविवार दि. ८ नोव्हेंबर १९७०

**सकाळी ९ वाजता :** कविसंमेलन
वि. द. घाटे, अनिल, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर, कृ. ब. निकुम्ब, वि. म. कुलकर्णी, अनुराधा पोतदार, चंद्रकांत खोत अरविंद वामन कुलकर्णी, दिलीप चित्रे, नारायण सुर्वे इ.

**सकाळी १० वाजता :** परिसंवाद क्र. १ : मराठी भाषेतील पारिभाषिक शब्द : घडण व भावी स्वरूप.
अध्यक्ष : लक्ष्मणशास्त्री जोशी, द. वा. पोतदार, डॉ. वा. ना. पंडित, डॉ. रा. शं. वाळिंबे, डॉ. ना. गो. कालेलकर, पंडित वेंकटेशशास्त्री जोशी, क. वा. केळकर, रा. ग. जाधव, डॉ. अशोक केळकर, डॉ. वसंत जोशी, डॉ. स. गं. मालशे, प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर.

**सकाळी १० वाजता :** परिसंवाद क्र. २ : दलित–साहित्य
अध्यक्ष : दुर्गा भागवत, ॲड. शंकरराव खरात, प्रा. वा. ना. वानखेडे, प्रा. अ. भि. शाह, प्रा. संभाजी कदम, प्रा. मे. पुं. रेगे, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्राचार्य शं. कृ. उनूने, बाबूराव बागूल, हरिभाऊ पगारे, प्रा. एस. एस. भोसले.

अनुक्रमणिका






# संपादकीय

स. गं. मालशे

---

## महामहोपाध्यायांना अभिवादन

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या वयाला ५ ऑगष्ट १९७० रोजी ८० वर्षे पूर्ण झाली, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे आणि आनंद व्यक्त करणे, हे आमचे आद्य कर्तव्यच आहे. पोतदार आणि परिषद यांचे संबंध किती घनिष्ट आहेत हे सांगायला नको. पुण्यातील सांस्कृतिक संस्थांवर आणि विशेषतः साहित्यपरिषदेवर पोतदारांचे जे ऋण आहे ते खरोखर शब्दातीत आहे.

'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या पुस्तकाचा अपवाद केला, तर पोतदारांनी साहित्यसेवा अशी कोणती केली आहे, असा प्रश्न छद्मीपणाने विचारणारे अनेक आहेत. १९३९ साली पोतदार म. सा. संमेलनाचे अध्यक्ष झाले, तेव्हा पुण्यातल्या एका अध्यापकाला काही विद्यार्थ्यांनी नेमका हाच प्रश्न विचारला होता. त्यावर अध्यापकांनी विद्यार्थ्यांना विचारलं होतं, "तुम्ही डोंगरेका बालामृताची जाहिरात पाहिली आहे का?" विद्यार्थी उत्तरले, "पाहिली आहे. प्रत्येक गावी पाहायला मिळते." अध्यापकांनी प्रतिसवाल केला होता, "तुम्ही डोंगरे बालामृताची बाटली पाहिली आहे का?" विद्यार्थी उत्तरले, "नाही!" अध्यापक म्हणाले, "पोतदारांच्या साहित्यसेवेचं असंच आहे. तिची जाहिरात आहे; पुस्तक कोणी पाहिलेलं नाही."

हा विनोदी किस्सा खोचक आणि म्हणून रोचक वाटला, तरी अन्याय्य आहे. पोतदारांनी प्रत्यक्ष पुस्तके लिहून साहित्यसेवा केली नसेल; पण साहित्यसंस्थांना जन्म देऊन, त्यांना वाढवून, साहित्यसंस्थामय बनून त्यांनी अनमोल साहित्यसेवा बजावली आहे, हेच वरच्या छद्मी प्रश्नाचे खरेखुरे उत्तर आहे!

शिवाय पोतदारांचे बरेच लेखन भारत इतिहास संशोधक मंडळाच्या नियत-कालिकांतून स्फुट रूपाने झालेले आहे. ते स्फुट आहे म्हणून मौलिक नाही, अशी कोणी

समजूत करून घेत असेल, तर ती चुकीची आहे. अशा इतिहाससंशोधनात्मक स्फुट लेखनाला प्रकाशकांची मागणी असत नाही. या स्फुट लेखनाचे संग्रह काढायचे तर प्रकाशकांच्या मागे लागले पाहिजे. स्वतःच्या लिखाणाचे असले आत्मकौतुक करण्याची वृत्ती पोतदारांची सुतराम् नाही. अलीकडे प्रकाशकांनी औत्सुक्य दाखविल्याने त्यांच्या भाषणांची दोन तीन पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. पण एकंदरीत या बाबतीत उदासीन राहण्याचाच त्यांचा खाक्या आहे.

दुसरे असे की पोतदारांचे खरे बळ त्यांच्या लेखणीपेक्षा वाणीत आहे. ते 'राजे' नाहीत, 'राजे बनविणारे' आहेत. त्यांच्या वाणीत नव्या संशोधकांना आणि साहित्यिकांना प्रेरणा देण्याचे सामर्थ्य आहे. त्यांच्या वक्तृत्वाची गोडी खरोखर अनुपमेय आहे. मराठी, संस्कृत, इंग्रजी, हिंदी अशा विविध भाषांतून त्यांच्या मिष्ठासवाणीचा ओघ अप्रतिहत-पणे चाललेला असतो. मतामतांचा गलबला माजला, धकाधकीचा मामला उभा राहिला की सभेत पोतदारांना आणावे, त्यांनी हा हा म्हणता फड जिंकला नाही, असे झाले नाही. साहित्यपरिषदेच्या वतीने शुद्धलेखन परिषद भरविण्यात आली होती. उभयपक्ष अटी-तटीने भांडत होते. पोतदारांनी समारोप केला, तो असा की दोन्ही पक्षांना वाटले की पोतदार आपल्याच बाजूचे आहेत! वातावरणातील तणातणी कमी झाली आणि शांतपणे सभा विसर्जित झाली.

पण पोतदार गुळमुळीत बोलून अजातशत्रुत्वाच्या बळावर वेळ मारून नेतात, म्हणून संस्थांना त्यांचा आधार वाटतो, असे नाही. त्यांच्या ठायी विधायक संस्थानिष्ठा आहे. तोडण्यापेक्षा जोडण्याकडे आणि मोडण्यापेक्षा मांडण्याकडे त्यांचा जात्याच कल आहे. बारीकसारीक गोष्टीत काकदृष्टीने नाक खुपसून संस्थांच्या कार्यकर्त्यांना नामोहरम करण्याची वृत्ती त्यांच्यात नाही. उलट आणीबाणीच्या प्रसंगी संस्थेच्या पाठीशी ते धारणासारखे ताठ उभे राहतात; जबाबदारी टाळीत नाहीत. न्यायमूर्ती रानडे आणि तात्यासाहेब केळकर यांच्या मागून पोतदारांइतका विधायक संस्थानिष्ठेने प्रेरित झालेला सार्वजनिक पुरुष महाराष्ट्रात शोधून मिळणार नाही.

पोतदार सर्वांना हवेहवेसे वाटतात, कारण ते वृत्तीने प्रसन्न आहेत. केव्हाही पाहा, ते उत्साही आणि टवटवीत असतात. त्यांच्या हास्याला खळ म्हणून नाही. त्यांना कोणी वयपरत्वे विचारले, "दादा मी मदत करू का जिना उतरायला!" ते ताडकन म्हणतील, "छे! छे! मला काय धाड झालीय. आमची प्रकृती अगदी टणठणोत आहे." त्यांना कोणाची सहानुभूती नको असते. त्यांच्या गप्पांची मैफल हा एक अनुभव असतो. अशा मैफलीत ते जुन्यात जुने आणि नव्यात नवे बनतात. 'पाणी तेरा रंग कैसा' असा त्यांचा स्वभाव आहे. म्हणूनच हा चालता बोलता ज्ञानकोश वाईस गेला, तर पुणेकरांना चुकल्यासारखं झालं आहे.

आता शिवचरित्राचे लेखन करण्यासाठी ते वाईला जेठा मारून बसले आहेत. त्यांचा हा संकल्प पुरा होवो अशीच त्यांच्या हितचिंतकांची इच्छा आहे. पण म्हणून

महाबळेश्वरसारख्या जवळ भरणाऱ्या साहित्यसंमेलनाला ते आल्याशिवाय राहायचे नाहीत. परिषद हे त्यांचे दुसरे घर आहे, त्यांना परिषदेचे कार्य हे घरचे कार्यच वाटणार! पोतदारांनी स्वतः संसार केला नाही; पण संस्थांचा संसार आपला मानला. हा त्यांचा संसार नीट चालावा आणि त्यांच्या छत्राखाली आमच्यासारख्या कार्यकर्त्यांना चार कामेधामे करता यावी म्हणून त्यांना दीर्घायुरारोग्य लाभावे, हीच इच्छा!

## आचार्य विनोबांना अभिवादन

११ सप्टेंबर १९७० रोजी आचार्य विनोबा भावे यांचा पंचाहत्तरावा वाढदिवस देशभर साजरा झाला. विनोबांचे जीवन म्हणजे एक अखंड चाललेली साधना. या जीवनसाधनेवरचे भाष्य म्हणजे त्यांचे साहित्य. त्यांच्या या साहित्यात द्रष्टेपण आहे. द्रष्टे या अर्थाने विनोबा कवी आहेत. पण ते आधी कृतिकवी आहेत. त्यांचे साहित्य ही एक स्वयंसिद्धीच आहे. त्यांनी २५–३० छोटीमोठी पुस्तके लिहिली आहेत. हे त्यांचे लेखन 'वाचमर्थोऽनुधावति' या कोटीतले आहे. मराठी संतांच्या वचनावर त्यांनी भाष्ये केली आहेत. गीतेप्रमाणे ज्ञानेश्वरीवर त्यांची श्रद्धा आहे. संतांप्रमाणे चित्तशुद्धीवर त्यांचा भर आहे. जीवन शुद्ध करते ते साहित्य, अशी त्यांची साहित्याची सुटसुटीत व्याख्या आहे.

म. गांधींच्या इंग्रजी शैलीचे जसे 'बायबली शैली' असे वर्णन केले जाते, तसेच विनोबांच्या मराठी गद्यशैलीचे वर्णन करावे लागेल. अल्पाक्षरसारवत्ता हे तिचे खास वैशिष्ट्य. 'गीताई' हा त्यांचा गीतानुवाद म्हणजे मूर्तिमंत प्रसादगुण! भाषा वाकवावी कशी, हे विनोबांपासून शिकावे. 'देतो तो देव, राखतो तो राक्षस' अशी लोकव्युत्पत्ती (Folk etymology) ते झटक्यात साधून जातात. 'संस्था नसावी, व्यवस्था असावी', 'जो स्वतःच्या रसात इतरांना भागीदार करतो तो रसिक' 'श्रद्धेत बळ आहे, बुद्धीत दिशा आहे' अशा अर्थगर्भ चाटूक्ती त्यांच्या लेखनात पानोपानी आढळतात.

म. गांधींनी विनोबांना मोठे मानले. १९१६ साली विनोबा त्यांच्याकडे गेले. गांधीजींनी तेव्हा विनोबांच्या वडिलांना पत्र लिहून त्यांच्या आध्यात्मिक वृत्तीची प्रशंसा केली होती. १९१८ साली सी. एफ्. अँड्रयूज यांच्याशी ओळख करून देताना गांधीजी विनोबांविषयी म्हणाले होते, "हे आश्रमातले सर्वोत्तम रत्न आहे. आश्रमातून काही घ्यायला नाही आले विनोबा! आश्रमालाच तो आशीर्वादरूप झालाय!" १९४० साली वैयक्तिक सत्याग्रहातले आघाडीचे वीर म्हणून उभ्या भारतात गांधींनी विनोबांचीच निवड केली होती.

१९५१ पासून त्यांनी भूदानकार्याला स्वतःला वाहून घेतले आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत विनोबांनी जी अलिप्तता ठेवली त्यामुळे महाराष्ट्रात त्यांच्याविषयी एक प्रकारची अढी निर्माण झालेली होती. परंतु कालमानानुसार ती आता ओसरली आहे. विनोबांच्या कार्याविषयी मराठी साहित्यिकांना आता पूर्वग्रहरहित विचार

करता येईल. विज्ञानाच्या गरूडझेपेमुळे सारे जग जितके जवळ आलेले आहे, तितकेच विनाशी वृत्तीमुळे ते दूरही जात चालले आहे. भारतीय लोकशाहीची तर फरफट चालू आहे. जातिभेद, प्रांतभेद, पंथभेद, भाषाभेद, पक्षभेद यांचा बुजबुजाट झाला आहे. सत्तालोभापायी आयाराम गयाराम वृत्तीला ऊत आला आहे. राष्ट्रीय लोकशाही प्रवृत्तीत फूट पडल्यामुळे साम्यवादी दहशतवाद बळावतो आहे. अशा अराजकाच्या खाईकडे जाणाऱ्या लोकशाहीपेक्षा वेगळी शासनव्यवस्था यावी, अशी विनोबांची धारणा आहे. विनोबांच्या मते आजची लोकशाही केवळ आकारात्मक ( Formal ) आहे, लोकशाहीचा आशय ( Content ) तीत नाही. तो यायला हवा असेल, तर सत्तालोभी राजकारण बंद करून सेवानिष्ठ लोकनीतीचा अवलंब झाला पाहिजे. फुटीर लोकशाही आणि साम्यवादी दहशतवाद यांच्या कात्रीत सापडलेल्या भारतीयांनी विनोबांच्य विचारसरणीची कास धरली, तरच त्यांचा तरणोपाय आहे. ' नव्या साम्ययोगा 'ची शिकवण देणाऱ्या या मंत्रद्रष्ट्या आधुनिक ऋषीस आमचे त्रिवार अभिवादन !

### कॅ. गो. गं. लिमये : झाकले माणिक

' पुरुषस्य भाग्यम् ' म्हणतात, तसाच काहीसा प्रकार कॅप्टन गो. गं. लिमये यांच्या बाबतीत घडून आलेला आहे. त्यांच्या वयाची ऐंशी वर्षे लोटली. आजवर विनोदी लेखक म्हणून त्यांचा बोलबाला होता. पण राम कोलारकर हा धृष्ट तरुण टीकाकार पुढे झाला आणि त्याने ध्यानीमनी नसता गतवर्षी ' सर्वोत्कृष्ट मराठी कथा १ ' च्या प्रस्तावनेत जाहीर केले की ' मराठी लघुकथेचे जनक ' कॅ. लिमये हे आहेत. हा शोध ऐकून इतरांनाच नव्हे, तर खुद्द कॅप्टनसाहेबांनाही धक्का बसला असेल. परंतु ज्यांनी त्या संग्रहातली ' किस्मत ' ही कथा प्रत्यक्ष वाचली असेल, त्यांना कोलारकरांच्या मताची यथार्थता खासच पटली असेल. अजूनही जे लोक कोलारकरांच्या या निष्कर्षासंबंधी साशंक असतील, त्यांनी पॉप्युलर प्रकाशनसंस्थेतर्फे प्रसिद्ध झालेला कॅ. लिमये यांच्या निवडक कथांचा देखणा संग्रह वाचून काढावा. ( संग्रह कल्पना मुद्रणालयात मुद्रित झालेला आहे, तेव्हा मुद्रणाचे देखणेपण आवर्जून सांगायला नको. पण पुस्तकातील गोष्टींना चुकून बालवाचकांचा टंक उपयोजला गेला तर नाही, अशी ' कल्पना ' मनाला चाटून गेली. पण मुद्रक चिं. स. लाटकर हे लिमयांचे जावई हे नंतर कळले ( दैवे लाभला चिंतामणी ! ) तेव्हा हौसेला मोल नाही ! किंवा या बाबतीतली कल्पक निवड देवीदास बागुलांची असणार ! तेव्हा आमचंच काही तरी चुकलं असावं ! )

राम कोलारकरांनी कॅ. लिमयांना लघुकथेचे जनक ठरवताना म्हटले आहे, " कॅ. गो. गं. लिमये यांच्या कथांनी मराठी लघुकथेची मौख्यातून सुटका केली. भावरंजन, इच्छारंजन, बोधवाद, समीकरणे आणि शाब्दिकता ह्यांची त्यांनी हकालपट्टी केली. ललित गद्यशैलीला जडलेले असंख्य रोगट संकेत त्यांनी कापून काढले आणि कथेची भाषा जीवनाच्या जवळ आणली. " कोलारकरांच्या ह्या म्हणण्याला थोडी मुरड घातली

आहे. आम्ही कविवर्य बोरकर यांचे हार्दिक अभिनंदन करतो आणि त्यांच्या अध्यक्षते-खाली महाबळेश्वरचे संमेलन यशस्वी होवो अशी इच्छा प्रकट करतो.

## कै. डॉ. इरावती कर्वे

११ ऑगस्ट १९७० रोजी डॉ. इरावती कर्वे यांचे निधन झाले आणि पांडित्याच्या क्षेत्राइतकीच मराठी ललित्याच्या क्षेत्राचीही अपरिमित हानी झाली.

इरावतीबाईचा जन्म १९०५ साली ब्रह्मदेशात मिंज्यान येथे झाला. त्या मुंबई विद्यापीठाच्या बी. ए. आणि एम्. ए., बी. ए. चा विषय तत्त्वज्ञान आणि एम्. ए. चा समाजशास्त्र. पुढे बर्लिनला जाऊन मानववंशशास्त्रात त्यांनी पीएच्. डी. ही पदवी संपादन केली. काही काळ त्या एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठाच्या रजिस्ट्रार होत्या. १९३९ पासून मृत्यू येईपर्यंत पुण्यातील डेक्कन कॉलेजात त्यांचे अध्यापन-संशोधनाचे कार्य अविरत चालू होते. ' हिंदु सोसायटी : ॲन इंटरप्रिटेशन ', ' किनशिप ऑर्गनायझेशन इन इंडिया ', ' मराठी लोकांची संस्कृती ' यांसारखे संशोधन-पर ग्रंथ त्यांच्या गाढ्या विद्वत्तेची आणि सखोल व्यासंगाची साक्ष पटविणारे आहेत. १९४७ साली दिल्लीला भरलेल्या सायन्स काँग्रेसमध्ये मानववंशशास्त्रविभागाच्या त्या अध्यक्ष होत्या. मुंबई मराठी साहित्यसंघ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय यांसारख्या मान्यवर संस्थांच्या विद्यमाने महनीय प्रवक्त्या म्हणून त्यांनी व्याख्यानमालाही गुंफल्या. देशी-परदेशी ख्यातनाम नियतकालिकांतून त्यांचे संशोधनपर लेख प्रसिद्ध होत असत. विद्वत्तेच्या क्षेत्रातील त्यांचा अधिकार भारतीयच नव्हे, तर परकीय पंडितांनीही मान्य केलेला होता. परकीय विद्यापीठांच्या निमंत्रणावरून भारतीय मानववंशशास्त्रावर व्याख्याने देण्यासाठी अभ्यागत प्राध्यापक म्हणून त्यांना अनेकदा परदेशचे दौरे करावे लागले होते.

अशा या जगन्मान्य विदुषीने एकंदर प्रथेनुसार मराठीचा दुस्वास करायचा ! पण इरावतीबाईंना मराठी भाषा आणि महाराष्ट्र यांचा रास्त अभिमान वाटायचा. पंढरीचा विठ्ठल त्यांचा ' बॉय फ्रेंड ' होता. त्याच्यासाठी त्या भाविकांच्या जथ्यातून वारी करायच्या. ' क ' या टोपण नावाने ' अभिरुचि ' मासिकात त्यांचे ललित निबंध प्रसिद्ध होऊ लागले आणि मराठी रसिकांच्या मनात त्यांनी जे घर केले, ते कायमचेच ! ' परिपूर्ती ' आणि ' भोवरा ' या त्यांच्या ललित निबंधसंग्रहातून त्यांच्या अनुभव-संपन्नतेबरोबरच अभिजात रसिकतेचीही साक्ष पटते; तर ' आमची संस्कृती ' या लेख-संग्रहातील ' गोवधबंदीची चळवळ ' सारख्या लेखात त्यांच्या व्यासंगाचा आणि प्रखर तर्ककर्कशतेचा प्रत्यय येतो.

पण व्यासंगी आणि तर्ककर्कश वैचारिक लेखन करीत असूनही इरावतीबाईंनी आपली संवेदनक्षमता बोथट होऊ दिली नाही. स्त्रीजातीच्या परवशतेची त्यांना मनस्वी खंत वाटे. पुरुषाच्या प्रेताबरोबर त्याची मालमत्ता म्हणून गाडल्या गेलेल्या प्रागैतिहासिक-

कालीन स्त्रीची कवटी सापडताच तिला ' तू ती मीच का ग ? ' असा आर्त प्रश्न त्यांनी केला. महाभारतकालीन व्यक्ती आणि समाज यांचा शोध घेणाऱ्या ' युगान्त 'सारख्या ग्रंथातही हाच प्रश्न आणि हीच कणव पानोपानी जाणवते. ' परिपूर्ती ' या हृदयंगम ललितनिबंधात त्यांनी स्वतःच्या जीवनातील म्हणजेच आधुनिक स्त्रीच्या जीवनातील प्रसंग कथन करून तोच प्रश्न फिरून केला आहे. या निबंधाच्या प्रारंभी एका सार्वजनिक संस्थेतील व्याख्यानप्रसंगी त्यांची जी ओळख करून देण्यात आली, ती सांगितली आहे. महर्षी कर्वे यांची सून, फर्ग्युसन कॉलेजच्या प्राचार्य दि. धों. कर्वे यांची पत्नी अशा आशयाची ती ओळख होती. यावर इरावतींचा सवाल आहे, स्त्रीची ओळख अमक्याची सून, तमक्याची पत्नी किंवा फलाण्याची माता अशी का करून दिली जावी ? स्त्रीला स्वतःचे म्हणून काही स्वतंत्र व्यक्तित्व आहे की नाही ? हा सवाल गार्गी मैत्रेयीसारखे स्वतःसिद्ध व्यक्तिमत्त्व संपादन केलेल्या इरावतीबाईंनी करावा हे साहजिकच ! मात्र हा सवाल सुधारकी तर्ककर्कशतेतून केला गेलेला नाही. स्त्रीजातीच्या परवशतेसंबंधी तेथे सहभावना आहे. या सवालात बाईंच्या हळुवार व्यक्तिमत्त्वाचीच ओळख पटते.

' परिपूर्ती ' निबंधातल्या या ओळखप्रसंगावरून त्यांच्या दिराने—कै. र. धों. कर्वे यांनी करून दिलेली त्यांची ओळख मला आठवते. ती ओळखसुद्धा व्यासपीठावरची नव्हे; पडद्यामागची. मुंबईच्या साहित्यसंघात इरावतीबाईंची व्याख्याने व्हायची होती. संघाचे कार्यवाह डॉ. भालेराव र. धों. कर्वे यांना म्हणत होते, " रघुनाथराव, इरावतीबाईंचा परिचय तुम्ही करून द्या. " रघुनाथराव म्हणजे तर्ककर्कशतेचे अर्क ! त्यांनी प्रथम चक्क नकारच दिला. ते कारण देताना म्हणाले, " ती इरावती ना ? भलतीच भाविक आहे. उपाससुद्धा करते. अगदी इरॅशनल ! "

पण कर्वेघराण्याचा तर्ककर्कश वारसा काहीसा उणा होता, म्हणूनच मला वाटते, इरावतीबाईंचे हळुवार व्यक्तिमत्त्व रसिकांना चटका लावून गेले.

## वैदर्भी रसिकाग्रणी हरपला !

नागपूरचे दानशूर रसिकाग्रणी ल. श्री. तथा बाबुरावजी देशमुख यांच्या निधनाने विदर्भातील एक चैतन्यमय व्यक्तित्व हरपले आहे. बाबुरावजी ही व्यक्ती नव्हती, तर इतिहासकालीन वैभवशाली परंपरेचा वारसा घेऊन आलेली संपन्न अशी संस्था होती. विदर्भातील सारे सौजन्य, सारी रसिकता, सारे औदार्य आणि सारा प्रेमळपणा त्यांच्या ठिकाणी मूर्तिमंत वसत होता. त्यांच्या निधनाने औदार्याच्या आणि रसिकतेच्या क्षेत्रात औदासिन्य निर्माण झाले आहे. परिषदेच्या सुरुवातीच्या काळात त्यांनी दाखविलेली आस्था परिषद कधी विसरणार नाही. परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेला त्यांनी एक हजार रुपये देऊन परिषदेला उपकृत करून ठेविले आहे.

आहे. आम्ही कविवर्य बोरकर यांचे हार्दिक अभिनंदन करतो आणि त्यांच्या अध्यक्षते-खाली महाबळेश्वरचे संमेलन यशस्वी होवो अशी इच्छा प्रकट करतो.

## कै. डॉ. इरावती कर्वे

११ ऑगस्ट १९७० रोजी डॉ. इरावती कर्वे यांचे निधन झाले आणि पांडित्याच्या क्षेत्राइतकीच मराठी ललित्याच्या क्षेत्राचीही अपरिमित हानी झाली.

इरावतीबाईंचा जन्म १९०५ साली ब्रह्मदेशात मिंज्यान येथे झाला. त्या मुंबई विद्यापीठाच्या बी. ए. आणि एम्. ए., बी. ए. चा विषय तत्त्वज्ञान आणि एम्. ए. चा समाजशास्त्र. पुढे बर्लिनला जाऊन मानववंशशास्त्रात त्यांनी पीएच्. डी. ही पदवी संपादन केली. काही काळ त्या एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठाच्या रजिस्ट्रार होत्या. १९३९ पासून मृत्यू येईपर्यंत पुण्यातील डेक्कन कॉलेजात त्यांचे अध्यापन-संशोधनाचे कार्य अविरत चालू होते. ' हिंदु सोसायटी : ॲन इंटरप्रिटेशन ', ' किनशिप ऑर्गनायझेशन इन इंडिया ', ' मराठी लोकांची संस्कृती ' यांसारखे संशोधन-पर ग्रंथ त्यांच्या गाढ्या विद्वत्तेची आणि सखोल व्यासंगाची साक्ष पटविणारे आहेत. १९४७ साली दिल्लीला भरलेल्या सायन्स काँग्रेसमध्ये मानववंशशास्त्रविभागाच्या त्या अध्यक्ष होत्या. मुंबई मराठी साहित्यसंघ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय यांसारख्या मान्यवर संस्थांच्या विद्यमाने महनीय प्रवक्त्या म्हणून त्यांनी व्याख्यानमालाही गुंफल्या. देशी-परदेशी ख्यातनाम नियतकालिकांतून त्यांचे संशोधनपर लेख प्रसिद्ध होत असत. विद्वत्तेच्या क्षेत्रातील त्यांचा अधिकार भारतीयच नव्हे, तर परकीय पंडितांनीही मान्य केलेला होता. परकीय विद्यापीठांच्या निमंत्रणावरून भारतीय मानववंशशास्त्रावर व्याख्याने देण्यासाठी अभ्यागत प्राध्यापक म्हणून त्यांना अनेकदा परदेशचे दौरे करावे लागले होते.

अशा या जगन्मान्य विदुषीने एकंदर प्रथेनुसार मराठीचा दुस्वास करायचा ! पण इरावतीबाईंना मराठी भाषा आणि महाराष्ट्र यांचा रास्त अभिमान वाटायचा. पंढरीचा विठ्ठल त्यांचा ' बॉय फ्रेंड ' होता. त्याच्यासाठी त्या भाविकांच्या जथ्यातून वारी करायच्या. ' क ' या टोपण नावाने ' अभिरुचि ' मासिकात त्यांचे ललित निबंध प्रसिद्ध होऊ लागले आणि मराठी रसिकांच्या मनात त्यांनी जे घर केले, ते कायमचेच ! ' परिपूर्ती ' आणि ' भोवरा ' या त्यांच्या ललित निबंधसंग्रहातून त्यांच्या अनुभव-संपन्नतेबरोबरच अभिजात रसिकतेचीही साक्ष पटते; तर ' आमची संस्कृती ' या लेख-संग्रहातील ' गोवधबंदीची चळवळ ' सारख्या लेखात त्यांच्या व्यासंगाचा आणि प्रखर तर्ककर्कशतेचा प्रत्यय येतो.

पण व्यासंगी आणि तर्ककर्कश वैचारिक लेखन करीत असूनही इरावतीबाईंनी आपली संवेदनक्षमता बोथट होऊ दिली नाही. स्त्रीजातीच्या परवशतेची त्यांना मनस्वी खंत वाटे. पुरुषाच्या प्रेताबरोबर त्याची मालमत्ता म्हणून गाडल्या गेलेल्या प्रागैतिहासिक-

कालीन स्त्रीची कवटी सापडताच तिला ' तू ती मीच का ग ? ' असा आर्त प्रश्न त्यांनी केला. महाभारतकालीन व्यक्ती आणि समाज यांचा शोध घेणाऱ्या ' युगान्त 'सारख्या ग्रंथातही हाच प्रश्न आणि हीच कणव पानोपानी जाणवते. ' परिपूर्ती ' या हृदयंगम ललितनिबंधात त्यांनी स्वतःच्या जीवनातील म्हणजेच आधुनिक स्त्रीच्या जीवनातील प्रसंग कथन करून तोच प्रश्न फिरून केला आहे. या निबंधाच्या प्रारंभी एका सार्वजनिक संस्थेतील व्याख्यानप्रसंगी त्यांची जो ओळख करून देण्यात आली, ती सांगितली आहे. महर्षी कर्वे यांची सून, फर्ग्युसन कॉलेजच्या प्राचार्य दि. धों. कर्वे यांची पत्नी अशा आशयाची ती ओळख होती. यावर इरावतींचा सवाल आहे, स्त्रीची ओळख अमक्याची सून, तमक्याची पत्नी किंवा फलाण्याची माता अशी का करून दिली जावी ? स्त्रीला स्वतःचे म्हणून काही स्वतंत्र व्यक्तित्व आहे की नाही ? हा सवाल गार्गी मैत्रेयीसारखे स्वतःसिद्ध व्यक्तिमत्त्व संपादन केलेल्या इरावतीबाईंनी करावा हे साहजिकच ! मात्र हा सवाल सुधारकी तर्ककर्कशतेतून केला गेलेला नाही. स्त्रीजातीच्या परवशतेसंबंधी तेथे सहभावना आहे. या सवालात बाईंच्या हळुवार व्यक्तिमत्त्वाचीच ओळख पटते.

' परिपूर्ती ' निबंधातल्या या ओळखप्रसंगावरून त्यांच्या दिराने—कै. र. धों. कर्वे यांनी करून दिलेली त्यांची ओळख मला आठवते. ती ओळखसुद्धा व्यासपीठावरची नव्हे; पडद्यामागची. मुंबईच्या साहित्यसंघात इरावतीबाईंची व्याख्याने व्हायची होती. संघाचे कार्यवाह डॉ. भालेराव र. धों. कर्वे यांना म्हणत होते, " रघुनाथराव, इरावतीबाईंचा परिचय तुम्ही करून द्या." रघुनाथराव म्हणजे तर्ककर्कशतेचे अर्क ! त्यांनी प्रथम चक्क नकारच दिला. ते कारण देताना म्हणाले, " ती इरावती ना ? भलतीच भाविक आहे. उपासुद्धा करते. अगदी इर्रॅशनल ! "

पण कर्वेघराण्याचा तर्ककर्कश वारसा काहीसा उणा होता, म्हणूनच मला वाटते, इरावतीबाईंचे हळुवार व्यक्तिमत्त्व रसिकांना चटका लावून गेले.

## वैदर्भी रसिकाग्रणी हरपला !

नागपूरचे दानशूर रसिकाग्रणी ल. श्री. तथा बाबुरावजी देशमुख यांच्या निधनाने विदर्भातील एक चैतन्यमय व्यक्तित्व हरपले आहे. बाबुरावजी ही व्यक्ती नव्हती, तर इतिहासकालीन वैभवशाली परंपरेचा वारसा घेऊन आलेली संपन्न अशी संस्था होती. विदर्भातील सारे सौजन्य, सारी रसिकता, सारे औदार्य आणि सारा प्रेमळपणा त्यांच्या ठिकाणी मूर्तिमंत वसत होता. त्यांच्या निधनाने औदार्याच्या आणि रसिकतेच्या क्षेत्रात औदासिन्य निर्माण झाले आहे. परिषदेच्या सुरुवातीच्या काळात त्यांनी दाखविलेली आस्था परिषद कधी विसरणार नाही. परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेला त्यांनी एक हजार रुपये देऊन परिषदेला उपकृत करून ठेविले आहे.

## कै. डॉ. मु. गो. पानसे

इरावतीबाईंच्या निधनानंतर डेक्कन कॉलेजातील भाषा विषयाचे नामवंत प्राध्यापक डॉ. मु. गो. पानसे यांच्या २२ ऑगस्ट रोजी झालेल्या अकाली निधनाने पुण्याच्या सांस्कृतिक परिसरात पोकळी निर्माण झाली आहे. सुजाण सामाजिक दृष्टिकोण आणि स्वतंत्र विचारसरणी यांचा त्यांच्या लेखनात प्रत्यय येत असल्याने, ते चोखंदळ वाचकाला नेहमीच लक्षणीय वाटत असे. म. सा. परिषदेच्या हीरक महोत्सवाच्या निमित्ताने त्यांनी 'भाषाः अंतःसूत्र आणि व्यवहार' हे पुस्तक संपादित केले होते. त्यांच्या कार्याविषयी अधिकारी व्यक्तीचा स्वतंत्र लेख याच अंकी आलेला असल्याने त्याविषयी येथे विस्तार करीत नाही. परिषदेच्या भाषाविषयक कार्यात ते विशेष रस घेत असत. त्यांच्या अकाली निधनाने महाराष्ट्र एका विचारवंतास आणि परिषद एका कळकळीच्या कार्यकर्त्याला मुकली आहे.

## नवे आजीव सभासद

१. श्री. श. शि. जोगळेकर, पुणे ३०.
२. श्री. व. रा देसाई, पुणे ३०.
३. श्री. दामू धोत्रे, पुणे २.
४. श्री. द. धों. नगरकर, अहमदनगर.
५. श्री. केशवराव वि. कोठावळे, सांताक्रूझ (प.)
६. प्रा. डॉ. भालचंद्र फडके, पुणे १६.

# महाराष्ट्र : एक अभ्यास*

इरावती कर्वे

## १

महाराष्ट्राचा अभ्यास. हा एक नुसता भाग आहे. मी आज तीस वर्षे जो प्रश्न सोडवायचा प्रयत्न करते आहे, जो एका आयुष्यात सुटणे कधी शक्यच नाही. कित्येक आयुष्यांनी, कित्येक लोकांनी मिळून सुद्धा सुटायचा नाही असा एक प्रश्न घेऊन मी बसले आहे; अन् तो म्हणजे आम्ही कोण आहोत ? आम्ही आहोत तसे का आहोत ? हे दोन प्रश्न आहेत. त्या प्रश्नाबद्दल लिहिता लिहिता आमची नातीगोती काय आहेत, आम्ही भारतीय म्हणजे काय आहोत व शेवटी भाषिक प्रांत म्हणजे काय ? आम्ही मराठी का बोलतो ? ह्याचा विचार करता करता महाराष्ट्रावरती येऊन ठेपले. हा अभ्यास गुजरातबद्दल करता आला असता, कर्नाटकाबद्दल करता आला असता, पण मला त्या प्रांतांची तितकी माहिती नाही; आणि आत्ता मी जे तुमच्याजवळ बोलायला आले आहे त्याचे कारण म्हणजे तुम्हांला काही महाराष्ट्राबद्दल विशेष सांगावयाचे आहे ह्या बुद्धीने नाही, तर हे प्रश्न इतके व्यापक आहेत की त्याचे उत्तर एका माणसाला देता येणे शक्य नाही. मी जिथे तिथे अडते. उत्तर देताना एका दिशेने मनुष्य विचार करीत असतं. त्याला वाटत असतं काय छान उत्तर मला मिळालं. पण शेजारची बाजू जवळची असूनसुद्धा त्याला दिसत नाही. ती दुसऱ्यांना दिसत असते. तर माझी अपेक्षा अशी आहे की, मला सांगतील मंडळी की, " हां, इरावतीबाई, तुम्ही एकाच दृष्टीने विचार केला बरं का, इकडे तुमचं लक्ष गेलं नाही. " तेव्हा आपण मला ते दाखवून द्याल अशा आशेने मी इथे आले आहे. दुसरे, ह्याचा मला वारंवार अनुभव डेक्कन

* डॉ. गं. मा. फडके यांच्या स्मृतिदिनानिमित्त मुंबई येथे साहित्यसंघात दिलेली व्याख्यानमाला. अप्रकाशित.

अनुक्रमणिका

कॉलेजात येतोच. तिथे माझा विभाग एक लहानसा आहे. तिथे दोन–तीन–चार विषयांवरती मंडळी काम करीत असतात आणि माझ्या सुदैवाने एवढसं कुठे भाषा-विषयामधले हवेसे वाटले, इतिहासातले हवेसे वाटले, तर शेजारी आपला माझा सहकारी असतो आणि चटदिशी मला काय जे हवं असेल त्याचं एक उत्तर तरी मिळतं, नाही तर 'आज मला काही उत्तर देता येत नाही, मी दोन दिवसांनी तुम्हांला सांगतो काय ते!' म्हणून सोपस्कारांनी सगळ्या ग्रंथांतून बघून माझ्या प्रश्नाचे उत्तर देतात. तर घरी, पुण्याला डेक्कन कॉलेजमध्ये, मला जे सहकार्य मिळते ते ह्या इथल्या जास्ती व्यापक जगात मिळेल अशा आशेने सुद्धा मी ही व्याख्याने द्यायला आले आहे.

महाराष्ट्र काय आहे हे सांगण्यापेक्षा आम्ही कोण ह्या प्रश्नाचे उत्तर देताना भाषिक प्रांत कसे निर्माण होतात, का निर्माण होतात, ह्याचा अभ्यास मी करीत असताना, महाराष्ट्राचा अभ्यास कुठल्या तऱ्हेने मी करते आहे हे मला आपल्याला सांगायचे आहे; आणि सांगायचे कारण असे की मी थकले आहे. कुणी तरी ह्या प्रश्नाचा विचार पुढे करावा. मी चुकले असेल ते टाकावे. आणखी आता मी बोलत असताना मागून काही प्रश्न विचाराल, काही सांगाल असे मला सारखे वाटते आहे. म्हणून मी ही व्याख्यानं देण्यासाठी इथे आले आहे.

त्याचप्रमाणे महाराष्ट्राचा विचार करताना एकट्या महाराष्ट्राचा करता येतच नाही. आमचे शेजारी कोण आहेत, भारतामध्ये आपले स्थान काय आहे, हेही विचार त्याच्या अनुषंगाने येतातच. मी महाराष्ट्रीय आहे खरी, पण ह्या माझ्या महाराष्ट्रीयामध्ये इतरही सामावलेले आहेत आणि इतरांमध्ये मी सामावलेली आहे. हे कळल्याशिवाय मी महाराष्ट्रीय कशी हे कळण्याचीसुद्धा शक्यता नाही; आणि त्याच्यासाठी मी तुम्हांला सांगितले की हा प्रश्न गुंतागुंतीचा आहे. मला त्यासाठी आपल्या सगळ्यांचे साहाय्य पाहिजे आहे.

आता महाराष्ट्राबद्दल विचार करण्याआधी महाराष्ट्राच्या चतुःसीमा काय आहेत–त्याच्यामध्ये मला प्रत्येक जिल्हा किंवा प्रत्येक गाव मोजावयाचे नाही–ते सांगावयाचे आहे. तर उत्तरेकडे व पश्चिमेकडे महाराष्ट्राच्या सीमा बऱ्याच चटदिशी समजण्यासारख्या आहेत. उत्तरेकडे सातपुडा पर्वत आहे, पश्चिमेकडे अरबी समुद्र आहे. अरबी समुद्र आहे म्हटले की आपल्याला वाटते सरळ सीमा आहे. समुद्राच्या पलीकडे आपण कसे जाणार, पडलीच पाहिजे तेथे सीमा; तसे नाही. अरबी समुद्राच्या शेजारी एक पट्टी आहे–दक्षिणोत्तर पसरलेली–त्या पट्टीच्या पूर्वेला सह्याद्री पर्वताची रांग आहे. त्या पट्टीमध्ये आज मराठी भाषाच लोक का बोलतात? दुसरी का नाही बोलत? हा प्रश्न येतो. समुद्र असला म्हणजे आपली सीमा तेथे गेली असे नाही. त्या पट्टीमधलेही लोक मराठी भाषा बोलतात. तेव्हा ही जी समुद्राची पट्टी आहे तिथे लोक आज मराठी भाषा बोलतात ती का? ती पट्टी महाराष्ट्रात का येते? असा प्रश्न मनाला विचारावासा वाटतो. उत्तरेकडे सातपुडा पर्वत आहे. सातपुड्याच्या रांगाच्या रांगा

आहेत. त्याही, असे वाटते, एकप्रकारे नैसर्गिक सीमाच आहेत. नैसर्गिक सीमा म्हणजे काय? वाटते की, नैसर्गिक सीमा म्हणजे असे की, सातपुडा पर्वत जर नसता तर आपण हिंदी बोलत असतो, मध्यप्रदेशातल्या लोकांसारखे. मध्यप्रदेशापासून आपणांस वेगळी काढणारी ही रांग आहे. दिसायला उत्तर सोपे वाटते. पण सातपुड्याच्या पलीकडे विंध्य आहे. विंध्य ओलांडून सातपुड्यापर्यंत नर्मदेच्या प्रवाहाशेजारी जर हिंदी भाषिक लोक येऊ शकतात तर त्यांना काही सातपुडा ओलांडायला कठीण नव्हते. म्हणजे प्रश्न असा येतो की, ज्या काही गोष्टी अगदी साध्या आहेत म्हणून वाटतात, त्यासुद्धा तशा साध्या नसतात! विंध्याच्या तिथे जर लोक हिंदी बोलतात, नर्मदेचे खोरे जर हिंदी भाषिकांचे आहे, तर पलीकडेच डोंगरामध्ये सातपुड्याचे खोरे जे आहे ते आपल्या भाषिकांचे म्हणजे मराठी भाषिकांचे का आहे? त्याच्यानंतर दक्षिणेकडची जर आपली महाराष्ट्राची सीमा पाहिली तर महाराष्ट्र म्हणजे असा एक तिकोन येतो पहा. इकडे अरबी समुद्र, तिकडे सातपुडा. साधारणपणे जर पाहिले तर पायऱ्यापायऱ्यांनी वर चढणारा हा त्रिकोण आहे. म्हणजे पश्चिमेस समुद्रपट्टीला महाराष्ट्राची दक्षिणोत्तर लांबी सगळ्यात जास्ती आहे, आणि जसजसे आपण पूर्वेकडे जातो तसतशी दक्षिणोत्तर लांबी अगदी लहान नकाशावर तरी आपणांस दिसते. म्हणजे महाराष्ट्राची पूर्वसीमा अतिशय लहान आणि ही जी दक्षिण सीमा आहे ती अशी त्रिकोणात्मक असून, इकडे समुद्राच्या पट्टीच्या जवळ अतिशय लांबवर आपण दक्षिणेकडे पसरलेलो आहोत. आणि मग आपले पाय जे असे आखडत आखडत जाताहेत, ते वैनगंगेच्या खोऱ्याशी आपण येतो तोवर. वर्धा आणि वैनगंगेचे सबंध पात्र काही आपल्यात येत नाही. वर्धावैनगंगेचा संगम होऊन पुढे त्या गोदावरीला जिथे मिळतात तो भाग आंध्रामध्ये जातो, आणखी वरती महाराष्ट्र राहतो. या सीमा आपणांस महाराष्ट्राबाबत काय सांगतात? तर मी असे म्हणते की, ही जी दक्षिण सीमा आहे महाराष्ट्राची, ती संस्कृतोद्भव भाषा दक्षिणेकडे यायला जे सांस्कृतिक अडथळे निर्माण झाले त्यांचे प्रतीक आहे. आपल्याकडे कोकणच्या दृष्टीने विचार केला तर महाराष्ट्रापुरतेच नाही, तर खाली महाराष्ट्राच्याही दक्षिणेस सारस्वत एक भाषा बोलतात, ती संस्कृतापासूनच निघालेली आहे, आणि ती अगदी थेट मलबारच्या हद्दीपर्यंत पोहोचलेली आहे. म्हणजे वरती सबंध उत्तर हिंदुस्थानात हिमालयाच्या दक्षिणेस संस्कृतोद्भव भाषा आहेत हे लक्षात येईल. आणखी त्यांचा जर हिंदुस्थानातला विस्तार पाहू लागलो तर पश्चिमेकडून उत्तर-दक्षिण सरकता सरकता खाली संस्कृतोद्भव भाषा सगळ्यात जास्ती पश्चिमकिनाऱ्याने पोहोचली आहे. ही संस्कृतोद्भव भाषांची रेषा पूर्वेकडे मात्र वर वर जाताना इतकी जाते की, आपल्याकडे मध्येच थांबते आणि जिथे महाराष्ट्र थांबतो, तिथे आंध्राची पट्टी वरती जाते. म्हणजे पश्चिमेकडे संस्कृतोद्भव भाषा जशा खाली येतात, तशा द्राविड भाषा पूर्वेच्या किनारपट्टीने थेट गंगेच्या खोऱ्यापर्यंत मिळालेल्या आहेत. आणि मोठमोठाले द्राविड भाषांचे समूह आपल्याला या बाजूस दिसतात. असे का व्हावे? उत्तरेकडच्या त्या

अनुक्रमणिका

कोपऱ्याकडे जर आपण पाहिले, तर संस्कृतोद्भव भाषा इकडे खाली पोचल्या आहेत, जसा संस्कृतचा गड्डा वर आहे, तसा खाली द्राविडांचा गड्डा आहे, अन् त्याच्यातून ज्या त्यांच्या भाषा वरती वरती पसरत गेल्या आहेत त्या थेट गंगेला ओलांडून पूर्वेच्या बाजूने गेल्या आहेत. हे द्राविड भाषिक असे वरती गेलेले आहेत. वंशधरा नदीपर्यंत आजच्या आंध्राची सीमा समजतात. वंशधरेपलीकडेही पुष्कळ आंध्रभाषीय लोक आहेत. त्याच्या पलीकडे, अरण्यवासी लोकांची वस्ती कित्येक लक्ष आहे. असे द्राविडभाषिक लोक त्या सबंध अरण्याच्या प्रदेशातून जे वरती गेले आहेत ते अगदी शेवटी मोठ्ठा प्रदेश म्हणजे ज्याला लोक उराव म्हणतात ते बिहार आणि ओरिसा यांच्या सीमेवर आहेत. आणखी आपण वरती गेलो म्हणजे एक लहानसा समाज आहे, त्याला मालपहाडिया म्हणतात, तो गंगा ओलांडून गेलेला आहे. तेव्हा द्राविडभाषिक इकडे वरती गेले, संस्कृतभाषिक इकडे आले. याला अर्थ काय ? संस्कृतभाषिक हिंदुस्थानात केव्हा आले ? द्राविडभाषिक केव्हा आले ? ह्या प्रश्नाशी आपलाही थोडासा संबंध आहे. आम्ही आज, या अमक्या एका प्रदेशात मराठी का बोलतो ? मराठी भाषेला एक विशेष स्थान आहे. तेव्हा या दोन संस्कृतींच्या वरती—एक पाय द्राविडात व एक पाय संस्कृतीय लोकांच्यामध्ये—असे आपले स्थान आहे. हे असे टोक का ? तर मी असे म्हणेन की, आमच्या भाषेला जो सांस्कृतिक अडथळा खाली जावयाला निर्माण झाला, त्या अडथळ्याचे हे निदर्शक आहे. इकडे कर्नाटकाची मोठी संस्कृती, तिकडे आंध्राची मोठी संस्कृती ती संस्कृती. इथे नसली पाहिजे, म्हणून हे लोक खाली येऊ शकले, आपली भाषा ठेवू शकले. पण इथे मात्र संस्कृत भाषेला विरोध झाला, म्हणून ही आपली दक्षिणेकडची जी सीमा आहे, ती आपल्याला अशी दिसते. प्रश्न असा येतो, त्याचा मागून आपण असा विचार करू की, हे लोक वरती जाताहेत, आणि हे लोक खाली येताहेत ह्याला तरी अर्थ काय ? आपल्याकडे वेदांपासून थोडेबहुत वाङ्मय असल्यामुळे, आणखी त्याच्यावर बरेचसे संशोधन झाले असल्यामुळे, आपण असे धरून चालतो की, कुठेतरी हिंदुस्थानच्या या वरच्या कोपऱ्यामध्ये संस्कृत भाषिक लोक आत शिरले. आत शिरल्यानंतर त्यांना जावयाला दोन दिशा होत्या— हिमालयाच्या पायथ्यापायथ्याने गंगेच्या खोऱ्याने पूर्वेकडे जायचे आणि खाली पश्चिमेकडून, उत्तरेकडून दक्षिणेकडे उतरत उतरत जावयाचे. आपण पाहतो आहोत की ते इथे आलेले आहेत, अन् तिकडे गेलेले आहेत. अन् बरोबर याच्या उलट दिसते आहे. पण इथे द्राविड संस्कृतीची सुरुवात झाली असे मात्र म्हणता येत नाही. कारण द्राविड वाङ्मय वेदांच्याइतके जुने नाही तरी खिस्ती शतकाच्या अलीकडे पलीकडे अतिशय संपन्न वाङ्मय तामीळ भाषेत आहे. आणखी आज जगात जेवढ्या म्हणून ग्रांथिक भाषा आहेत, त्यांच्यात तामीळ भाषेइतकी अखंड परंपरा दुसऱ्या कुठच्याही भाषेची नाही. कारण तिथे तामीळ म्हणूनच ती भाषा आहे. आंध्रांचे, कर्नाटक्यांचे वाङ्मय वेदकाळाइतके जुने नाही. ते तामिळांचेच आहे. तेव्हा खिस्ती कालगणनेच्या

सुरुवातीला इथे तामीळ भाषिकांचे मोठे वाङ्मय निर्माण झालेले होते. दुसरे असे की, त्याच्याबरोबर समोर जो सीलोनचा कोपरा आहे, तियेही तामीळ भाषिक आहेत. विचार असा आपला मनात येतो, की सिलोनच्या बाजूनेच द्राविड भाषिक आले की, काय ? आणि ते सुद्धा दक्षिणेच्या या निरनिराळ्या भागांत शिरले आणि ह्या समुद्र-किनाऱ्याच्या बाजूने वरती गेले असे म्हणता येईल का ? या बाबतीत दिक् आणि काल ह्या दोन्ही परिमाणांचा सारखा विचार केला पाहिजे. तेव्हा हा दिक्‌चा विचार झाला.

आता कालाचा विचार. द्राविड भाषिक आणि संस्कृत भाषिक हे काही शत-कांच्या कालावधीत एक इकडून व दुसरे तिकडून आले, असे आपल्याला म्हणता येईल का ? बरे जर आले असे म्हणावे तर कोणावर आक्रमण करण्यासाठी हे आले ? कोणाला ते मागे हटवीत होते ? काही तरी या घटनेसंबंधाने आपल्याला माहिती मिळते का ? आणखी काही विचार करण्यासारख्या गोष्टी म्हणजे संस्कृतोद्‌भव भाषां-च्यामध्ये, ज्या भाषांमध्ये काहीही ग्रंथ लिहिले गेले नाहीत, अशी एकच भाषा आहे आणि ती म्हणजे भिल्लांची भाषा. ती गुजराती व राजस्थानी यांच्या जवळ आहे. भिल्ल लोक ती भाषा बोलतात म्हणून त्यास ' भिल्ली ' म्हणायचे आणि त्यांच्यात ग्रंथोत्पत्ती झाली नाही. म्हणजे रानटी टोळ्यांपैकी संस्कृतोद्‌भव भाषा बोलणारे अति-शय संख्येने मोठे म्हणजे भिल्लच तेवढे आहेत. याच्या उलट द्राविड भाषिकांची परिस्थिती आहे. तामीळ, तेलगू, कन्नड आणि मल्याळी या चार भाषांखेरीज पाव-दहा अशा द्राविड भाषा आहेत की ज्यांच्यामध्ये काहीही ग्रंथोत्पत्ती झालेली नाही. गोंडीमध्ये ग्रंथोत्पत्ती नाही, उरियामध्ये ग्रंथोत्पत्ती नाही. त्याच्यानंतर मध्ये आणखी एक लोक आहेत. लक्षावधींनी मोजण्यासारखी त्यांची संख्या आहे. त्यांच्यात ग्रंथोत्पत्ती नाही. बरं त्यांच्या भाषिकांना विचारले की, " काहो, हे जे अरण्यवासी द्राविड लोक आहेत, त्यांची भाषा हे ग्रांथिक भाषेचे मूळ आहे असे म्हणता येईल का ? " तर तसेही ते सांगत नाहीत. तसे जर नसेल तर मग संबंध काय ? ज्याप्रमाणे भिल्लांनी एक सांस्कृतिक भाषा उचलून त्याच्यापासून आपली भिल्ली भाषा केली, तसा प्रकार द्राविडांच्या बाबतीत झाला का ? की ते झपाट्याने इकडे सरकत होते आणि या भागा-तील मूळचे लोक आपली मूळची भाषा टाकून ती द्राविडी भाषा घेत होते ? आणि जर उत्तरेकडून सांस्कृतिक भाषिक लोक येत होते, आणि दक्षिणेकडून हे लोक वरती सरकत होते, तर मग पूर्वी हिंदुस्थानात होते कोण ? मला अमेरिकेत एकाने एक चांगलाच टोमणा मारला की, " तुम्ही लोक म्हणजे समाजशास्त्रज्ञ. तुम्हा सगळ्यांना ज्या त्या प्रदेशातील लोक बाहेरुन कोठून तरी आणावयाचे असतात ! अहो, द्राविड-भाषिक हिंदुस्थानातच होते असे का नाही म्हणत ? " म्हटले, " असतीलही, मला काही सांगता येत नाही. " पण असे वाटते की, त्यांना संस्कृत भाषिक लोकांनी मागे मागे हटविले असा त्यांना इतिहास नाही. त्यांच्या इतिहासाचे पहिले पान उलटल्या-नंतर आमच्या लक्षात येते की, ते सुद्धा आक्रमकच आहेत. संस्कृत भाषिकांच्या

इतकेच आक्रमक आहेत. मग असे म्हणायचे की काय, की पहिली हजार वर्षे हे लोक त्यांना दक्षिणेस रेटीत होते आणि मग एकदम त्यांनी आक्रमक वृत्ती धारण केली? द्राविड लोकांना बाहेरून आणण्याचा माझा आग्रह नाही. पण ह्या गोष्टींचा विचार व्हावा असे मी म्हणते. विचार करण्यासारख्या या गोष्टी आहेत. मी नेहमी म्हणते की, आपल्याला सध्या जी हिंदुस्थानची संस्कृती माहिती आहे, तिच्यात तीन भागीदार आहेत. संस्कृत भाषिक आपणाला आधी पहिल्यांदा आठवतात. मग द्राविड भाषिक आणि मग बिचारे ते मुंडारी भाषा बोलणारे लोक आहेत ते मुळी आठवतच नाहीत. पण ते आज अचलपुराजवळ बसलेले आहेत—उमरावतीच्या जवळ. म्हणजे किती पश्चिमेकडे आहेत ते पहा. आता मात्र ते सगळे अगदी पूर्वपट्टीला धरून आहेत. पण त्यांच्या सगळ्या म्हणून जेवढ्या दंतकथा आहेत त्यात ते सांगतात की, आम्ही फार फार पश्चिमेकडे होतो. आता आम्हांस हाकून हाकून पूर्वेकडे लावलेले आहे. ज्याला आपण दंतकथा म्हणतो, त्यात त्यांचा पूर्वेतिहास असेल काय? ज्यांचा उल्लेख वारंवार अनाझ, किंवा महाभारतात ज्या नागांना हाणून काढले, ते नाग कोण लोक होते? पूर्वीच्या भारतात यांच्या आधी आलेल्या संस्कृत भाषिकांचीच एक टोळी होती, की इथे राहाणारे कोणी लोक होते? तेव्हा हे आपणांस काहीच माहिती नाही. म्हणून त्या दृष्टीने विचार करावयाला लागले तर हा महाराष्ट्र आहे, हा सगळ्यात दक्षिणेकडचा सांस्कृतिक भाषा बोलणाऱ्यांचा प्रदेश आहे. तो इथे असा का आला? कधीं आला? लोक मराठी का बोलायला लागले? तेव्हा मी आता सांगितल्याप्रमाणे आम्ही कोण? मराठी बोलणारे लोक. आम्ही का मराठी बोलतो? दुसरी एखादी भाषा का बोलत नाही? आणि ज्याला आम्ही मराठी म्हणतो, ती भाषा आम्ही ह्या मुलखामध्ये कधी बोलायला लागलो? ह्याचा काही पत्ता मिळतो का आपल्याला? आत्ता तुम्हांला ह्या चतुःसीमा सांगितल्या त्या चतुःसीमेचा विचार करायला लागलं म्हणजे, नुसता महाराष्ट्राचा आकार घेतला तरी तो आकार आपल्याला इतक्या गोष्टी सांगतो आहे. म्हणजे मीच इतके प्रश्न विचारतेय आणि खरोखर त्यांच्यावर मी काही प्रकाश पाडू शकत नाही.

आता प्रश्न येतो महाराष्ट्राच्या आन्तरभागाचा. महाराष्ट्राचा आन्तरभाग अशा तऱ्हेचा आहे अन् तोही परत चटदिशी कळण्यासारखा आहे. वरची उत्तरेकडची भूमी सातपुड्याने व्यापलेली आहे असे म्हटले की सातपुड्याच्या किंवा विंध्याच्या दक्षिणेला काय आहे? तर एक तापीपूर्णेचे खोरे. आणखी पूर्णा नदी जिथून पश्चिमेकडे वळते तिथे पूर्णेच्या अगदी जवळ उगम पावलेली वरदा नदी खाली दक्षिणेकडे यायला निघते. एक लहानसाच डोंगर मध्ये आहे—पूर्णा आणि वरदेच्या मध्ये; आणि वरदेला आणखी पूर्वेकडून उत्तरेकडून येऊन वैनगंगा मिळते. तेव्हा वरदा-वैनगंगेचे खोरे आणि तापी-पूर्णेचं खोरे असे उत्तर महाराष्ट्रामध्ये. उत्तर महाराष्ट्रातला एक पश्चिम भाग आणि एक पूर्व भाग आहे. त्याच्यामध्येही मी बोलता बोलता तापी-पूर्णेचे

खोरे म्हटले आहे खरं. पूर्णा-तापीचे खोरे सलग एकत्र खोरे आहे. पण इतिहासाच्या दृष्टीने पाहिले तर त्यांच्यामधले तापीचे खोरे निराळे पडते आणि पूर्णेचे निराळे पडते. पूर्णेचे खोरे आणि वरदा–वैनगंगेचा काही भाग हे बहुतेक जुन्या काळच्या विदर्भामध्ये येत असावेत, असे वाटते. तेव्हा विदर्भाचे राज्य अतिप्राचीन काळापासून संस्कृत भाषिकांचे एक राज्य होते असे आपल्याला दिसते. विदर्भाच्या राजकन्यांची वर्णने वैदिक काळापासून अगदी थेट मालविकाग्निमित्रापर्यन्त आपल्याला माहीत आहेत. मालविका ही विदर्भाचीच राजकन्या होती, एवढेच नव्हे तर कालिदास प्रभावती गुप्ताबरोबर कदाचित् विदर्भालाच येऊन राहिला होता असे दिसते. म्हणजे थोड्या दृष्टीने विचार केला तर महाराष्ट्राचा हा भाग पूर्वीपासून संस्कृत बोलणाऱ्या लोकांच्या हातात होता, एवढेच नव्हे तर आपल्याला जेवढ्या जेवढ्या म्हणून राजकन्यांच्या गोष्टी माहीत आहेत त्या सगळ्यांनी उत्तरेकडच्या राजपुत्रांशी लग्ने केलेली आहेत. उत्तरेकडच्या राजकन्येने ह्या दक्षिणेकडच्या राजपुत्राशी लग्न केलेलं, म्हणजे मला वाटते, प्रभावती गुप्ता, ही मला तरी तेवढी एकच माहिती आहे. बाकी सगळ्यांची लग्ने, रुक्मिणी काय, इंदुमति काय, सगळ्यांची लग्ने उत्तरेकडच्या राजांशी झालेली आहेत.

त्याच्यानंतर महाराष्ट्राचा दुसरा अगदी ताबडतोब लक्षात येणारा भाग म्हणजे कोकणपट्टी. एका बाजूला सह्याद्रीचा डोंगर, दुसऱ्या बाजूला समुद्र आणि त्याच्या मधली ही अरुंद पट्टी.

त्याच्यानंतर तापी-पूर्णेच्या खालचे दुसरे खोरे म्हणजे गोदावरीचे. नाशिकपासून नांदेडपर्यंत. ह्या गोदाप्रदेशावरती त्याला नाव असे नाही आहे. पण मला असे वाटते की, महाराष्ट्राचा गाभा जर शोधायचा असला तर तो इथे आहे. महाराष्ट्राची सुरुवात कुठे झाली हा प्रश्न विचारला तर मी म्हणेन, गोदावरीच्या खोऱ्यात, मध्यभागात जिथे प्रतिष्ठान आहे तिथे. कारण गोदावरीच्या खाली गेले म्हणजे भीमा-कृष्णेचे खोरे लागते. त्याच्यामध्ये भीमा नदी आहे ती $\frac{3}{4}$ महाराष्ट्रामधून वाहाते अन् बाकीची जेव्हा ती तेलंगणात मिळते ती कृष्णेला. तो प्रवाह $\frac{3}{4}$ पेक्षा थोडासा लहानच असेल. कृष्णेचे खोरे असे आहे. कदाचित $\frac{1}{4}$ सुद्धा. हे आपणाकडे नाही आहे. सबंध पठार ओलांडून कृष्णा सागराला मिळते अन् आपल्याकडे महाबळेश्वर किंवा सांगलीच्या बाहेर आले की ती लगेच कर्नाटकाच्याच प्रदेशात जाते. तेव्हा आपल्या ज्या मोठाल्या नद्या आहेत त्यांपैकी कृष्णा आपल्याकडे अतिशय थोडी वाहते. दुसरे, हे कृष्णा आणि वेण्येचे खोरे आहे हे महाराष्ट्राच्या एका टोकाला आहे. आणखी तिकडे कन्हान आणि वैनगंगा म्हणजे वेन्ना नदी. कण्ह–बेन्ना हे तिकडे आहे. कण्हवेन्ना हे प्राकृत नाव म्हणजे आजचे कन्हान. त्याला काही कोणी कृष्णा म्हणत नाही, कन्हानच म्हणतात आणि वेन्ना म्हणून प्राकृत वाङ्मयात येणारे नाव म्हणजे ती वैनगंगा होती की काय कोण जाणे? पण तीही कण्हवेन्ना, ही कृष्णा-वेण्या म्हणजे अशा

ह्या दोन टोकाला परत त्या दोन नद्या, परत तीच नावे, जसे यॉर्क-न्यूयॉर्क असावे तशा-सारखे. वाटते की, तेच नाव परत इथे ठेवलेले. ते प्राकृत नाव आहे म्हणून ते जुने असले पाहिजे. हे अगदी संस्कृत नाव आहे हे नवीन असले पाहिजे.

गोदावरी नदीचे जवळजवळ अर्धे पात्र महाराष्ट्रात, अर्धे महाराष्ट्राच्या बाहेर आहे. पूर्णा संपूर्ण महाराष्ट्रीय आहे, तापी बरीच महाराष्ट्रातून वाहाते, बाकीची गुजराथेत जाते. ही पाच खोरी पाहिली तर त्यांच्यामध्ये गोदावरी ही महाराष्ट्राच्या मध्यभागामधले खोरे आहे. आणखी खाली कृष्णा–भीमा–नीरा यांची खोरी पाहिली तर त्यांची तोंडे दक्षिणेकडे राहिलेली आहेत. केवळ भौगोलिक दृष्ट्याच नव्हे तर ग्रामनामे, विवाहाच्या पद्धती, लोकांचे प्रकार इ० सगळ्याच दृष्टीने ही खोरी दक्षिणा-भिमुख आहेत. आणि असे असूनही हा भाग महाराष्ट्राचा झाला कसा व कधी असा प्रश्न येतो. तेव्हा तो एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

आत्ता ज्याला आपण मराठी भाषा म्हणतो ती आली कधी ? साधारणपणे विचार केला तर तापी-पूर्णा पैकी पूर्णेचे खोरे आणि वैनगंगेचे किंवा वर्धेचे खोरे ह्यांच्यामध्ये आतापर्यंत जे शिलालेख सापडले आहेत ते सगळे संस्कृत भाषेतले आहेत असे दिसून येते. अगदी ८ व्या–९ व्या शतकापर्यंत संस्कृत भाषेतले शिलालेख होते. म्हणजे राजांनी आश्रय दिलेली भाषा संस्कृत होती. तिथे अजूनपर्यंत तरी प्राचीन काळचे प्राकृत शिलालेख सापडले नाहीत. ह्याच्या उलट गोदावरी आणि कोकणपट्टी ह्यांच्यामधे प्राकृत आणि संस्कृत असे दोन्ही शिलालेख सापडले आहेत. कोकणपट्टीत संस्कृत शिलालेख आहेत, गोदावरीमध्ये शातवाहनांचे मोठमोठाले शिलालेख, नाशिकच्या परिसरातील लेण्यांमधून आढळणारे इत्यादी; आणि विशेषतः शातवाहन राजांचे शिलालेख ते सगळे प्राकृतात आहेत. आणि त्या प्राकृतापासून ज्याला महाराष्ट्री प्राकृत असे म्हणता येईल त्याच्यापासून पुढे जी भाषा उगम पावली ती मराठी.

हे महाराष्ट्रावरती राज्य करणारे, ज्यांना शालिवाहन किंवा शातवाहन राजे म्हणतात, त्यांच्याबद्दलच्या पुष्कळ कथा उपलब्ध आहेत. त्यातल्या एका कथेवर डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकरांनी बोट ठेवलं होतं. ' तू असला आहेस की, तुला काही संस्कृतसुद्धा बोलता येत नाही ' म्हणून एका राजाला त्याची एक राणी हसली. असे म्हणताच राजाला राग आला आणि तो पंडिताला म्हणाला ' मला एक भाषा शिकव रे व्याकरणा-सकट.' म्हणून वररुचीकडून तो प्राकृत भाषा शिकला. तेव्हा कोणीतरी बाहेरचा, संस्कृत भाषा येत नसलेला आणि तो दुसरी भाषा चटदिशी हस्तगत करू पाहणारा असा हा राजा होता. आणि तो प्राकृत भाषा शिकला एवढेच नव्हे, तर त्यांचे जेवढे जेवढे म्हणून शिलालेख आहेत ते सगळे प्राकृतातले आहेत. बोलले जात होते म्हणून काही ही मराठी भूमी झाली नाही. मी त्याला मराठीची पूर्वीची, मराठीचे आजेवर म्हणा हवे तर. त्या वेळेला आपण बोलत होतो त्याच्या अतिशय जवळची प्राकृत गुजराथ-मध्येही बोलली जात होती. तेव्हा तिथे एका बाजूने गुजराथी निराळी झाली आणि

एका बाजूने मराठी निराळी झाली. आपल्याला सांगता येईल का कधी झाली ती ? कौहल कवीने, माझी कल्पना आहे दहाव्या शतकामध्ये, एक काव्य लिहिले आहे आणि ते काव्य मोठे मजेदार आहे. धड प्राकृत नाही आणि धड मराठी नाही. निम्मे अधिक शब्द तर असे वाटतात की ही आपल्या मराठी क्रियापदांची रूपे आहेत. हे कसे आले ह्याच्यामध्ये ? म्हणजे तो जी भाषा सांगत होता आणि ज्या भाषेमध्ये बोलत होता ती भाषा प्राकृताला सोडून दुसऱ्या एका लोकभाषेकडे वळली होती आणि कवी तर सांगतो आहे की, मी काही हे पंडितांसाठी सांगितले नाही. पंडितांच्या बरोबरीचं माझं काव्य आहे. पण मी रसिकतेने स्त्रियांना आवडेल अशा तऱ्हेने बहुजनसमाजासाठी हे काव्य सांगतो आहे. त्याच्या कवितेची भाषा ११–१२ व्या शतकातील रासो म्हणून जे काव्य उपलब्ध आहे त्याच्यासारखी आहे. हल्लीच्या गुजरातीपेक्षा ती खूपच निराळी आहे. म्हणजे त्या काळीच प्राकृत सोडून गुजराथी वळणाची एक भाषा समाज बोलू लागला होता, याचे प्रत्यंतर देणारी कौहल कवीची आहे. आणि त्याच सुमाराला मग लहान लहान तुकडे कुठे तरी सापडायला लागतात. पहिला तुकडा आपल्या शिलालेखाचा – "श्री चावुंडराये करवियले," – इतके लहान वाक्य आहे, पण ते मराठीशिवाय दुसऱ्या कुठल्याही भाषेत असणं शक्य नाही. ते दोन शब्द आहेत. चावुंडराये हा तृतीयेचा प्रत्यय आणि करवियले हे रूप दुसऱ्या कुठच्याही भाषेत असणे शक्य नाही. आणि ती आहे आज ज्याला कर्नाटक म्हणतो तिथे पोहोचलेली. तेव्हा असे म्हणता येईल की, ९ व्या–१० व्या शतकाच्या सुमाराला लोक मराठी बोलायला लागले होते किंवा मराठीसारखी एक भाषा बोलायला लागले होते. गोदावरीच्या तीरावरती बोलायला लागले होते. कारण तो कौहल नदीचं वर्णन करतो आहे आणि पैठाण ह्या गावाचं वर्णन करतोय. तिथे मराठी भाषेचा उगम झाला असं म्हणायला आपल्याला हरकत नाही. तेव्हा गोदावरीच्या तीरी, हल्ली ज्याला आपण मराठी म्हणतो, इथे देशावरती जे मराठी बोलतो, ज्ञानेश्वरांनी ज्या भाषेमध्ये काव्य केले ती भाषा प्रतिष्ठानलाच उगम पावली असे म्हणायला आपल्याला हरकत नाही. साधारण नवव्या शतकापासून तिचा उगम झाला असेही म्हणायला हरकत नाही. त्याच्या आधीचा जो भाग होता त्याच्यामध्ये हालाने लिहिलेली सप्तशती आहे. म्हणजे ती सगळी प्राकृत काव्ये आहेत. ते आपलं आजोळचं नातं म्हणा. पण हे मराठी नव्हे. तेव्हा साधारण नवव्या शतकापासून गोदावरीच्या तीरी मराठी भाषेची सुरुवात झाली असे म्हणायला हरकत नाही आणि त्याच सुमाराला निदान राजकीय संबंधामुळे दक्षिणेकडे कुणी तरी कोरून ठेवले आहे 'चावुंडराये करवियले.'

२

तेराव्या शतकामध्ये आपल्याला मराठी भाषेमध्ये एकदम प्रौढ वाङ्मय दिसायला लागते. आणि लिहिणारे लोक होते ते सगळे पूर्व महाराष्ट्रातले होते. आणखी त्यांचे

केंद्र पैठण होते. तेराव्या शतकामध्ये आणखी एक गोष्ट झाली. म्हणजे ज्या वेळेला मराठी वाङ्मयाची अशी सुरुवात झाली त्याच वेळी मुसलमानी सत्ता इतकी शतकं महाराष्ट्राची राजधानी पैठण जी होती तिथे प्रस्थापित व्हायला लागली. मुसलमानांचे आगमन झाले आणि जरी त्यांची तिथे सत्ता प्रस्थापित झाली तरीसुद्धा कित्येक शतके वाङ्मयनिर्मिती होत होती. कारण अगदी खुद्द पैठणलाच खास मुसलमानी सत्ता असून सुद्धा अतिशय मोठा असा ग्रंथकार म्हणजे एकनाथ होऊन गेला. पण हळूहळू पूर्वेकडनं पश्चिमेकडे राजसत्ता मराठ्यांच्या दृष्टीने, महाराष्ट्राच्या दृष्टीने सरकत होती. पैठण हे तेराव्या शतकामधले राजकीय आणि वाङ्मयीनदृष्ट्या महाराष्ट्राचे प्रमुख केंद्र होते. पण इकडे तेराव्या शतकापासूनच पंढरपूरचे महत्त्वही अधिकाधिक वाढायला लागले आणि पंढरपूर हे कुठच्याही राजाचं म्हणून सुरुवातीपासून आत्तापर्यंत दैवत असे कधी झालेलं नाही. जगन्नाथाचे देऊळ, तिथले पूर्वीचे जे राजे आहेत त्यांचे असे खास समजले जाते. पहिला मान त्यांचा. किंवा खाली ह्यांचे केरळमध्ये देऊळ आहे. तेसुद्धा खुद्द राजाचेच देऊळ. तिथले जे वर्मा, मार्तंडवर्मा, आदित्य-वर्मा हे जे राजे आहेत ते त्या देवाचे अंकित म्हणून राजे आहेत. तेव्हा ह्या देव-स्थानांना विशेष महत्त्व आहे. पंढरपूरचे महत्त्व काही निराळेच आहे. राजे लोक पंढर-पूरला जात असत येत असत. पण अमक्या राजाचे दैवत म्हणून पंढरीच्या विठोबाची कधीही महती झाली नाही. आणखी पंढरपूरचं जर स्थान पाहिलं तर परत कर्नाटकाला अतिशय जवळचं आहे! विठ्ठल ह्या नावाबद्दल सुद्धा इतका वाद आहे की सांगता सोय नाही. विष्णूपासून विठू हा शब्द होतो का? तर मराठी भाषेत नाही. शक्य नाही. पण विष्णूचे विठू हे रूप कर्नाटक किंवा कानडी भाषेत होऊ शकते. आणखी राष्ट्रकूटांच्या पदरी असलेल्या पुष्पदन्त नावाच्या जैन कवीने 'हरिवंशपुराणम्' म्हणून अठराव्या शतकामध्ये ग्रंथ लिहिलेला आहे. तिथे विठू हा शब्द जवळजवळ पाच-सहादा आलेला आहे आणि गमतीची गोष्ट म्हणजे विठू म्हणून एकदा कृष्णाला म्हटले आहे, तर एकदा विष्णूला म्हटलं आहे. तेव्हा त्या वेळेला विठू हे नाव कृष्णाचे किंवा विष्णूचे अगदी प्रस्थापित झाले होते. त्याचप्रमाणे ह्या विठ्ठलमंदिराचा इतिहासही जवळ-जवळ पाचव्या शतकापासूनचा आपल्याला मिळतो. आणखी ज्याला आपण वारी म्हणतो त्याचा कदाचित उल्लेखही, मला वाटतं, साधारण ९ व्या किंवा १० व्या शतकामध्ये एका लेखामध्ये आहे! एका बेळगावच्या ब्राह्मणाला तिथल्या कानडी राजाने गाव दिलेले आहे हरिदिनवृत्तीसाठी. हरिदिन म्हणजे एकादशी आणि हरि-दिनवृत्ती म्हणजे वारी. बेळगावहून पायी चालत येऊन पंढरपूरची एकादशीची वारी करण्याबद्दल त्याला एक गाव मिळालेले होते. म्हणजे ज्याला आपण वारकरी संप्रदाय म्हणतो त्याची बीजं अशी इतकी जुनी आहेत. आणखी आपल्याला माहिती आहे की ज्ञानेश्वरांच्या वडिलांचे नावही विठ्ठलपंत होते. म्हणजे विठ्ठल हे नाव आपले आणि कर्नाटकाचे असे दोघांचे मिळून होते आणि पंढरपुराचे महत्त्व वाढत गेले. याचाच

अर्थ असा की, मराठी संस्कृती पंढरपुरामध्ये एक प्रकारे केंद्रित व्हायला लागली. मागे सांगितल्याप्रमाणे गोदावरीच्या तीरावरती जे आपण होतो ते खाली भीमा-कृष्णेच्या खोऱ्यामध्ये आलो.

कित्येक शतकं पंढरपूरच्या वारीची प्रथा असल्यामुळे महाराष्ट्राच्या सगळ्या प्रांतांतले लोक तिथे गोळा होत आणि तिथे आले म्हणजे संतांचे म्हणून जे काव्य होते ते लोकांच्या कानांवर पडत होते व मुखोद्‌गत होत होते. त्यामुळे मराठी भाषेला एकजिनसी रूप व्हायला मदत झाली. संतांच्या कार्याचा हा मोठाच विशेष होय. याचा अर्थ असा नाही की निरनिराळ्या भागांमध्ये निरनिराळ्या भाषा लोक बोलत नव्हते. वऱ्हाडमध्ये वऱ्हाडीची बोली होती; इकडे कोल्हापुरी होती, इकडे पुण्याच्या बाजूला निराळ्या तऱ्हेची भाषा बोलत होते, कोकणात आणखी एक भाषा होती. तरीसुद्धा ह्या संतांच्या काव्यामुळे एकमेकांना एकमेकांची भाषा कळायचे कार्य ह्या ठिकाणी अव्याहत तेराव्या शतकापासून जे सुरू आहे ते आजतागायत आहे. तेव्हा पंढरपूरची ही एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे! मध्ये एक काळ असा होता की ज्या वेळेला मराठी राजा असा नव्हता, पण मराठी राजा नसूनसुद्धा जे कार्य राजसत्तेखाली, राजाच्या आश्रयाखाली झाले असते ते एका दृष्टीने महाराष्ट्राच्या एका दैवताच्या आश्रया-खाली होत होते. आपण तुळजापूरची भवानी पाहिलीत तर ती कित्येक मराठे आणि ब्राह्मण ह्यांचं कुलदैवत आहे. अंबाबाई कित्येक लोकांचे कुलदैवत आहे. गंमत अशी आहे की विठ्ठल कुलदैवत अतिशय कमी लोकांचे आहे. खुद्द विठ्ठलाची पूजा करणारे जे सहा-सात तऱ्हेचे लोक तिथे आहेत बडवे, डिंग्रे, दिवटे, पुजारी वगैरे त्यांच्यापैकी कोणाचेही विठ्ठल हे कुलदैवत नाही. तेव्हा कुलदैवत अतिशय कमी लोकांचे असूनसुद्धा सगळ्यांना पूज्य असं ते दैवत होतं अन् तिथे लोक जात होते. तेव्हा ज्या अर्थी कुलदैवत नाही त्या अर्थी इथल्या मूळच्या लोकांचा तो देव नसावा. विठ्ठल किंवा विठू हे नाव ज्या अर्थी आहे तेव्हा ते वैष्णव संप्रदायाचं नाव आहे. वैष्णव संप्रदायाचा उगम खाली दक्षिणेकडे झालेला आहे आणि तिथून हळूहळू मध्ययुगामध्ये वैष्णव संप्रदाय उत्तरेकडे फैलावला, तसा तो आपल्याकडेही आला. पण मूळ वैष्णव संप्रदाया-तील विठू हे नाव इथे अगदी बहुजनसमाजाचे दैवत झाले. महाराष्ट्रातील सगळ्या जाती-जमातींच्या लोकांनी त्या पंथाचा स्वीकार केला, आणखी त्याच्यावरती काव्य केले. तेव्हा वारकरी लोकांचा विठ्ठल हा देव असतो. पण खुद्द वारकऱ्याला जर तुम्ही विचारलंत की कुलदैवत काय, तर तो आपला कुठचे तरी एखादे शंकराचे स्थान, खंडोबा किंवा देवी असे सांगतो! तेव्हा अशी ही लक्षात ठेवायची गोष्ट आहे की, राजसत्ता नाहीशी झाली होती, नवीन राजसत्तेचा उदय व्हायचा होता, असल्या ह्या मधल्या काळामध्ये पंढरपूरने हे एक मोठे कार्य केले आणि विशेष गंमत म्हणजे हा जो पुष्पदंत कवी सांगितला ना तो मान्यखेटचा. मान्यखेट म्हणजे हल्लीचे वाडी स्टेशन आहे तिथून १०–११ मैलांवर आहे, म्हणजे सोलापूरहून अतिशय जवळ आहे. तेव्हा

पंढरपूरचे हे जे दैवत आहे ते जवळजवळ, जसा सबंध सोलापूर जिल्हा आपला आहे का कर्नाटकातला हे आपल्याला माहिती नाही, तशाचपैकी हे आपले दैवत आहे.

गोदातट किंवा तापीपूर्णा किंवा वर्धा-वैनगंगा हे उत्तरेकडचे प्रदेश, त्यातल्या त्यात गोदातट प्राकृत आणि मराठी, उत्तरेकडचा प्रदेश संस्कृत राहिला आणि हा खालचा प्रदेश ज्याचे तोंड दक्षिणेकडे आहे असा हा हळूहळू मराठी होत गेला आणि ही अगदी सीमेवरची देवता वारकरी संप्रदायामुळे मराठ्यांची झाली आणि त्या-बरोबर तिने त्या मुलखालाही मराठ्यांनं केलं असं वाटतं.

त्याच्यानंतर शिवाजीच्या काळामध्ये आपली अशी सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न झाला. त्यातही मोठी मजेदार गोष्ट आहे! भोसल्यांच्या समाध्या पाहा. आज वेरूळला गेलात आणि तिथे वरती उभे राहिलात की सबंध खाली भोसल्यांच्या समाध्या दिसतात. म्हणजे भोसले ही पूर्वेकडची मंडळी आहेत. पश्चिम महाराष्ट्रात विजापूर दरबारामध्ये त्यांना जहागीर मिळाली होती पण त्यांचा असा मुलूख दिसत नाही. जसा आपल्याला वाईचे मोरे म्हणा, किंवा निंबाळकर म्हणा, ह्यांचा मुलूख दिसतो तसा भोसल्यांचा असा मुलूख नाही. भोसल्यांचा मुलूख ज्याला हल्ली मराठवाडा म्हणता येईल त्याच्यामध्ये होता. तेव्हा हे जे भोसले इकडे आले ते सुद्धा, त्यांचे डोळे दक्षिणेकडे वळलेले, अश तऱ्हेची एक मराठी कुळी आहे. हे लक्षात ठेवले म्हणजे शिवाजीचा एक भाऊ तंजावरला होता, त्यात काही नवल वाटत नाही! खरोखरच त्यांचे डोळे तिकडे होते. मी काही मराठी इतिहासाची अभ्यासक नव्हे. भोसल्यांचा शिसोदियांशी जो संबंध जोडतात त्याच्यामध्ये काही तथ्य आहेसं मला वाटत नाही. एकदा मनात असा विचार येतो की, होयसळ आणि भोसले ही नावे इतकी जवळची आहेत की त्यांचा काहीतरी संबंध होता का? त्यांच्यातलेच ते होते का? कारण होयसळ स्वतःला यादव म्हणत असत. हा प्रश्न माझा नाही. मी तुम्हांला सांगितलं की माझ्या डोक्यात आलेले विचार कदा-चित चुकीचे असतील. मी बोलून दाखवते. कारण कुठेतरी हे बीज रुजेल, कुणीतरी बघेल त्या दृष्टीनं! तेव्हा हे लोक ज्या वेळेला पश्चिमेकडे आले त्या वेळेला पैठण सुटले, पंढरपूर होतं तिथेच राहिलं. पण पंढरपूर काही राजधानीचे शहर झाले नाही. अन् आपण बघतो भोसल्यांच्या सत्तेचा जेव्हा उदय झाला तो पश्चिम महाराष्ट्रात झाला. पूर्व महाराष्ट्राचा मैदानी प्रदेश सोडून पश्चिम महाराष्ट्र ह्या लोकांनी का घेतला? इथे का भांडले? काही वर्षांपूर्वी राजपुतान्यामध्ये एक गृहस्थ भेटले. त्यांनी सगळ्या रजपूत लढाया, आणि मोठमोठ्या मराठी लढाया ह्यांचे नकाशे तयार केले होते. कुठे कोणाची फौज होती याचा आलेख काढला होता. त्यांनी माझ्यापुढे असे सांगितले की, आम्ही रजपूत अनुभवाने काहीएक धडा शिकलो नाही. सरळ सरळ मोगलांना सामना द्यायला गेलो. त्यांची शस्त्रसंपत्ती आमच्यापेक्षा मोठी होती, मैदानी लढाई त्यांची मोठी होती, आणि आमचा काही टिकाव लागला नाही. सबंध हिंदुस्थानच्या इतिहासात, काहीतरी सूत्र आपण जर धरून चाललो, तर असं म्हणता येईल की, राणाप्रतापला जे करता

आलं नाही ते शिवाजीनं केलं. कारण शिवाजीने मैदानी लढाई दिली नाही. ज्याला इंग्रजीत गोरीला वॉरफेअर म्हणतात त्याच्याशिवाय ह्या शस्त्रांनी बळकट असलेल्या लोकांशी सामना देणे शक्यच नव्हते. त्यांची शस्त्रास्त्रे आपल्यापेक्षा कितीतरी पटींनी जास्ती होती आणि त्यामुळे ज्याला हिट अँड रन म्हणतात ना तशासारखी लढाई आपल्या पश्चिम घाटामध्ये वर्षानुवर्षे पंचवीस वर्षेपर्यंत खेळता आली. ती काही तुम्हांला गोदावरीच्या काठी, जिथे डोंगर कमी कमी होत आले आहेत, तिथे खेळता आली नसती! आपल्याला असं दिसतं की शिवाजीला आपल्या आयुष्यामध्ये माझी अमकी एक राजधानी असं म्हणायलासुद्धा फुरसत नव्हती! रायगडावरती राज्याभिषेक होतो काय अन् लवकरच ते जातात काय! इतक्या थोड्या वेळात बऱ्याच गोष्टी होऊन गेल्या. मग मात्र सातारा आणि कोल्हापूर अशी अगदी ठामपणे कृष्णेला आणि कृष्णेच्या दक्षिणेला अशी मराठ्यांची राज्ये झाली. सातारा, पुणे येथे काही दिवस राज्ये राहिली आणि जेव्हा इंग्रजांनी तीही राज्ये बुडवली तेव्हा तुमची मुंबई ही महाराष्ट्राची राजधानी झाली. तेराव्या शतकापासून किंवा त्याच्या आधीपासून पैठणपासून सारखे पश्चिमेकडे सरकता सरकता आता अगदी थेट पश्चिमेच्या टोकाला राजधानी जाऊन पोहोचली आहे.

तेव्हा हे एक सूत्र घेऊन असं म्हणता येईल की, पहिल्याप्रथम गोदाकाठ, त्याच्यानंतर गोदाकाठावरून जी उडी आली ती एकदम भीमा-कृष्णेच्या खोऱ्यामध्ये आली आणि तिथून कोकण, जे बरेच वर्षे उपेक्षित होते, तिथे आता राजधानी येऊन स्थायिक झालेली आहे! ह्यामध्ये महाराष्ट्राच्या निरनिराळ्या आन्तरविभागांचे निरनिराळे कार्य निरनिराळ्या वेळेला झाले आहे असं आपल्याला दिसते.

ह्या महाराष्ट्रामधले लोक आहेत तरी कोण? हे बघत असताना मी त्यांची अगदी प्राथमिक पहाणी केली. त्यांची डोकी, नाके, डोळे ह्यांची मोजमापे घेतली. त्यांच्या रक्ताची तपासणी केली. तेव्हा तिथेही अशी एक विचित्र गोष्ट, पश्चिमेकडून पूर्वेकडे आणि पूर्वेकडून पश्चिमेकडे अशी दिसून येते. ती म्हणजे अशी की, सगळ्यांत रुंद डोक्याची माणसे आज गुजरात-काठेवाडमध्ये आहेत. आपल्या उत्तरेकडे, दक्षिणेकडे कर्नाटकाचा जो मुलूख देशावरती आहे म्हणजे किनारपट्टीला नाही, त्याच्यावरच्या माणसांचीही डोकी रुंद आहेत. आपल्यापेक्षाही बरीच रुंद आहेत. कर्नाटकाच्या किनारपट्टीला अरुंद डोक्याची माणसे आहेत. महाराष्ट्रामध्ये किनारपट्टी आणि किनारपट्टीला लागूनची काही शहरं ह्यांच्यामध्ये जरा रुंद डोक्याची माणसे आहेत. पण रुंदी गुजराथपेक्षा कमी, कर्नाटकामध्ये काही त्यांच्याइतकी. पण काही काही कर्नाटकातली माणसं अतिशय रुंद डोक्याची आहेत; आणि जसजसे महाराष्ट्रामध्ये पश्चिमेकडून पूर्वेकडे जावे तशी डोक्याची रुंदी कमी होत चाललेली आहे. म्हणजे आपल्याला असे धरून चालता येईल की, कर्नाटक काय किंवा महाराष्ट्र काय, पूर्वी अरुंद डोक्यांच्या माणसांचा प्रदेश होता आणि गुजराथ, किनारपट्टी, किनारपट्टीच्या लगतचा प्रदेश,

आणखी वरती कर्नाटक ह्यांच्यामध्ये ही रुंद डोक्याची माणसं कधी तरी नवीन काळी आलेली आहेत. जेव्हा मी नवीन काळ म्हणते तो नवीन काळ कुठचा ते काही मला सांगता येत नाही. कर्नाटकाच्या खाली गेलं की परत माणसांची डोकी अरुंद होतात. किनारपट्टी कर्नाटकापासनं खाली घेतली तर तीही अरुंद डोक्यांची आहे. फक्त महाराष्ट्राची किनारपट्टी मात्र अशी आहे की, जवळजवळ मुंबईच्या दोन्ही जाती—पाठारे प्रभु, पाठारे क्षत्रिय त्याच्यानंतर-मी माझ्या नकाशात बघून सांगते आपल्याला-अशा पाचसहा मुंबईच्या जाती, कोळी त्यांच्यामध्येच रुंद डोक्याचे असे आहेत. काही रुंद डोक्याच्या जाती व वरती देशावरती म्हणजे मराठे आहेत आणि मग मात्र जसे तुम्ही पूर्वेकडे जाल, विशेषतः नागपूरच्या बाजूकडे जाल, त्या वेळेला सगळ्या जाती सरसकट ब्राह्मणापासून ज्याला अस्पृश्य म्हणत असत त्या लोकांच्यापर्यंत सगळे अरुंद डोक्याचे आहेत. म्हणजे ह्या प्रदेशामध्ये कधीतरी रुंद डोक्याची माणसं आली. ती कोण होती, कधी आली, ह्याचा काही उलगडा होत नाही. कारण त्यांच्यामध्ये बोटाळा वाटण्यासारख्या गोष्टी खूपच आहेत.

माझ्या एका विद्यार्थ्याने पाच हजार वर्षांपूर्वीच्या हिंदुस्थानातल्या संस्कृतीमध्ये जेवढे म्हणून सांगाडे सापडले होते त्यांच्या डोक्यांचा अभ्यास करून एक पुस्तक लिहिलेलं आहे. तो म्हणतो की, अगदी थेट पंजाबपासून वर तामीळनाडपर्यंत जिथे जिथे ही संस्कृती सापडते तिथे तिथे सगळी माणसं अरुंद डोक्याची आहेत. ही जी माणसे सापडतात त्या माणसांचा, हल्ली हिंदुस्थानामध्ये जिवंत असलेल्या माणसांशी काही संबंध आहे का ? तर तो म्हणतो, हल्ली जे लोक जंगलांतून राहतात ते ह्यांच्यासारखे आहेत, बाकीचे नाहीत. तेव्हा एक असं आपल्याला धरायला पाहिजे की कधी तरी एका काळी हिंदुस्थानामध्ये जवळजवळ उत्तरेपासून दक्षिणेकडे माणसं अशी एकसंध, अमक्या एका डोक्याच्या आकाराची, असं नाक असलेली, इतकी उंची असलेली अशी होती. आज आत्ता आपल्याला निरनिराळ्या तऱ्हेची माणसं दिसायला लागताहेत. ती आली कधी ? आपल्याला माहिती आहे की पश्चिमेकडच्या बाजूने सारख्या नवनव्या टोळ्या येत होत्या. त्याच्यातलीच एखादी टोळी म्हणजे ही सध्या गुजराथमध्ये दिसणारी अरुंद डोक्याची माणसं, त्यांचेच काही वंशज इथे महाराष्ट्रामध्ये अन् त्यांचेच काही वंशज कर्नाटकामध्ये असे आपल्याला म्हणता येईल का ? त्याच्याही पलीकडे जाऊन पुढे असं म्हणता येईल का, की ही जी माणसे होती ती पश्चिमेकडून येणाऱ्या उत्तर टोळ्यांप्रमाणे पशुपालाचं जीवन जगत होती ? आपल्याबरोबर गुरं आणणारे लोक ते होते का ? त्याला बळकटी अशाने येते की द्राविड भाषेमध्ये काही काही शब्द नाहीत. तसं गुरांच्या कातड्यापासून होणारे पायतण हा जिन्नस तिकडे नाही. त्याला चप्पल वगैरे शब्द ते वापरतात तो पोर्तुगीजांकडून त्यांनी नवीन उचललेला शब्द आहे. पण आपल्याकडच्यासारखा पायतण हा संस्कृतोद्भव शब्द त्यांच्याकडे नाही. त्याचप्रमाणे चांभार—चर्मकार ह्या जातीला जे काही दोन-तीन शब्द आहेत ते

असेच संस्कृतोद्भव आहेत. म्हणजे जशाच्या तसा तो शब्द त्यांनी उचललेला आहे. आणखीही अशाच स्वरूपाच्या बऱ्याच गोष्टींवरून असं वाटतं की, ज्याला आपण द्राविड संस्कृती म्हणू त्याचा पशुपालनाशी संबंध कमी होता. वरच्या लोकांना जास्ती होता. आणि आज कर्नाटक आणि दक्षिण महाराष्ट्र ह्यांच्यामध्ये आपण खिलार किंवा अमृतमहाल अशी जवळजवळ अगदी सारख्या दिसणाऱ्या बैलांची जोपासना बघतो. पुरणपोळी हे दोन्हीकडचं नेहमीचं पक्वान्न. दुसरं पक्वान्नच नाही इकडे, बेळगाव-धारवाड-सातारा-कोल्हापूर ह्या बाजूला! अशा तऱ्हेने आम्ही भाषा दोन बोलतो. एक कानडी बोलतात. एक मराठी बोलतात. पिंड मात्र एक आहे की काय ? मी प्रश्नचिन्हच टाकते. कारण त्याच्याबद्दल मला अजून नक्की काय ते सांगता येत नाही.

दुसरा प्रश्न असा निघतो की, जर का ही अशी मोठी जमात येऊन त्याने गुजराथपासून कर्नाटकापर्यंत आपले पाय पसरले तर त्या जमातीची पूर्वीची काय भाषा होती ? ती भाषा टाकून गुजराथी, मराठी आणि कानडी अशा तीन भाषा ते का बोलतात ? असे म्हणता येईल का, की ही जमात ज्या वेळेला उत्तरेकडून दक्षिणेकडे सरकत होती त्या वेळेला द्राविड आणि संस्कृत असे अगदी निरनिराळे भाग झालेले आपल्याला माहीती आहेत. अगदी खिस्ती शकापासूनच झालेले आहेत. पण कदाचित् मराठी आणि गुजराथी असेही दोन विभाग झाले की काय हे सांगता येत नाही. तेव्हा हे लोक आले कधी आणि ज्या भागात वसले त्या भागातली भाषा त्यांनी आत्मसात केली कधी हे काही आपल्याला सांगता येत नाही. शातवाहन राजे, त्यांनी घोडे उत्पन्न केले कुंभाराच्या चित्रांच्यापासून, तेव्हा हे शातवाहन राजे बाहेरून आलेले होते, त्यांना संस्कृत माहीत नव्हते, तेच होते का काय हे लोक ? तेही सांगता येत नाही. कारण दुर्दैवाने त्या काळापासून पुढे जितके माणसांचे सांगाडे मिळायला पाहिजेत तितके मिळत नाहीत. लोक प्रेतांना जाळायला लागले होते. त्यामुळे आमच्या दृष्टीने आम्हांला ज्या तऱ्हेच्या वस्तू हव्या असतात अभ्यास करायला तेव्हा आम्हाला मडकी सापडतात, गाडगी सापडतात, त्यांनी केलेली शस्त्रास्त्रे सापडतात. पण ज्या माणसांनी ती केली त्या माणसांची डोकी आम्हांला हवी असतात, ती मात्र पुरेशा प्रमाणात मिळत नाहीत. काही डोकी मिळाली आहेत; त्यांच्यामुळे आणखी निराळे प्रश्न निर्माण होतात आणि लक्षात येते की ही गोष्ट वाटते तितकी सरळ नाही. मोहेंजोदारो आणि हरप्पा इथे जे मनुष्यांचे अवशेष सापडलेले आहेत ते आत्ता सांगितलेल्या पाच हजार वर्षांच्या नंतरचे आहेत. तिथे मात्र एकसमयावच्छेदेकरून रुंद डोक्यांची आणि लांब डोक्यांची अशी दोन्ही माणसं आढळतात. इतके दिवस लोकांना वाटत असे की, ही सिंधू संस्कृतीच आहे; पण आता अगदी थेट काठेवाड--गुजराथपर्यंत त्या लोकांचे अवशेष मिळायला लागले आहेत. म्हणजे ते लोक खाली सरकत होते आणि आपल्याबरोबर ती माणसे घेऊन येत होते का काय ह्याचंही उत्तर देता येत नाही. त्याचप्रमाणे दक्षिणेला ब्रह्मगिरी वगैरे ज्याला मेगॅलिथिक अवशेष म्हणतात ते सापडले आहेत. ते

ख्रिस्ती शकापूर्वी पाच शतके, फार फार झालं तर सहा-सात शतके जातील असे लोक म्हणताहेत त्यांच्यामध्ये काही रुंद डोक्याची माणसं आहेत का ते काही कळत नाही. पण त्यांनी आपल्याबरोबर लोखंड आणले एवढे समजते. आणि पूर्वीची जी लांब डोक्याची माणसे आहेत त्यांच्या मानाने ह्यांची डोकी रुंद दिसताहेत. त्याच्याही-पेक्षा जास्ती खोल जाता येत नाही. तेव्हा पूर्वी काही तरी लोक होते, त्याच्यानंतर त्यांच्यामध्ये सारखे दुसऱ्या तऱ्हेचे लोक यायला लागले. आणखी त्यांच्यामध्ये तिसरा. विचार करायला लागलो तर असं दिसून येतं की ते लोक द्राविड देशामध्ये न येता बहुतेक उत्तरेकडून खाली दक्षिणेकडे, परत पश्चिमेच्या बाजूने सरकत आलेले दिसताहेत! ह्याच्या पलीकडे आज काही सांगता येत नाही, ते कोण होते, काय होते, ह्याचा पत्ता काही धड लागत नाही. म्हणजे मराठी लोकांचा पिंड कोणता? एका बाजूने आम्ही बोलतो तेव्हा आपण मागे पाच हजार वर्षे, चार हजार वर्षे, दोन हजार वर्षे असे बोलतो. एका बाजूने ज्या वेळेला त्यांच्या वाङ्मयाबद्दल बोलतो तेव्हा तेराव्या शतकापासून पुढे बोलतो. आज आपण जे इथे आहोत ते त्या तेराव्या शतकातल्याच लोकांचे वंशज आहोत. त्याच्यामागे काय होते हे काही आपल्याला सांगता येत नाही.

महाराष्ट्र बनला कसा ह्याचा विचार करीत असताना असे दिसून येते की, हे किनारपट्टीने लोक आले आणि वरती चढले. मुळात ते गुरं बाळगणारे. मजा अशी आहे की गुरं बाळगणारे असं म्हणायचीसुद्धा चोरी झाली आहे! ज्या आज रुंद डोक्याच्या म्हणून मुंबईच्या जाती सांगितल्या त्यांचा गुरांशी काही संबंधच नाही! आपल्या सर्वांनाच माहिती आहे की किनारपट्टीवर गुरं चांगलं होत नाही. आमच्या कोकणची गुरंवासरं म्हणजे आमच्या इकडच्या मोठाल्या शेळ्यांसारखी दिसतात! खरोखर गुरूं उत्तम निपजायचं आणि त्याची वाढ चांगली व्हायची म्हणजे देशावरती. तेव्हा त्यांची रुंद डोकी राहिली, आणखी ते निरनिराळ्या धंद्यात पडले असे म्हणायचे का त्यांच्यानंतर आणखी लोक उत्तरेकडून येत गेले म्हणायचे, हे काही आज सांगता येत नाही. एवढे मात्र खरे की, जसजसे तुम्ही पूर्वेकडे जाता तसतशी जुनी, लांब डोक्याची मंडळी अजून तिथे आहेत असे आपल्याला दिसून येते.

महाराष्ट्र म्हणजे आहे तरी काय ह्याचा विचार आणखी एका रीतीने करता येतो. महाराष्ट्रामधील जवळजवळ तीस हजार ग्रामनामं मी जमवली. आज गेली दहा वर्षे हे काम करतेय! खरं म्हणजे आतापर्यंत ते पुरं व्हायला पाहिजे. पण बाकीच्या व्यापामुळे झालं नाही खरं! ही ग्रामनामं कुठच्या तऱ्हेची आहेत आणि कुठे कुठे आहेत ह्याचा विचार करताना काही काही मोठ्या गमतीदार गोष्टी आढळून आल्या. त्या आज मी आपल्याला सांगते.

त्या तीस हजार ग्रामनामांपैकी दर चौथे ग्रामनाम घेऊन जवळ जवळ साडेसात हजारांची मी पहाणी केली तर असे आढळून आले की, महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांत, उदा० कोकण, कृष्णा-भीमा, खानदेश जरा वेगळा काढलाय. मी आपल्याला

सांगितले की पूर्णा-तापी एक प्रवाह आहे. पण पूर्णेचे पात्र हे जुन्या संस्कृतीमध्ये आपल्याला आढळून येते. खानदेशचा मुलूख हा जरा नवीन वस्तीचा आहे. म्हणून खानदेश जरा निराळा काढला. नंतर गोदावरीचं पात्र, पूर्णेचं पात्र, वर्धा-वैनगंगेचं पात्र हे विभाग घेतले. त्यांच्यामध्ये असं दिसून आलं की, संस्कृतातला ग्राम, ज्याला आपण गाव म्हणतो, हा हल्ली ११३० खेडेगावांना शब्द लावलेला आढळला. अमकं गाव, तमकं गाव, ह्याप्रमाणे. आता हे जे पाच विभाग सांगितले, त्यांच्यापैकी ११०० साधारण गावांपैकी गोदावरीच्या काठी ४४९, नंतर पूर्णेला १३०, वर्धा-वैनगंगेमध्ये २५१, कृष्णा-भीमा १८०, कोकणात ६१ आणि खानदेशात ५९; म्हणजे आपल्याला दिसेल की 'गाव' हे संस्कृतोद्भव आहे. तेव्हा हा संस्कृतोद्भव शब्द एक मराठी संस्कृतीचा–प्राकृतापासून जिथे मराठीच उगवली त्या मी गोदावरीच्या मुलखात आणि पूर्णा–वर्धा–वैनगंगा हा जुना विदर्भ म्हणजे संस्कृत लोकांनी व्यापलेला प्रदेश तिथे, आपल्याला मोठ्या प्रमाणात वापरलेला दिसून येतो. नंतर कोकणात आणि खानदेशात मात्र सगळ्यात कमी खेडी अशी आहेत की, ज्यांच्या शेवटी गाव हा शब्द येतो.

दुसरा प्रत्यय 'पूर' आहे. त्यामध्येही, गोदावरीकाठी १९२, पूर्णेकाठी १२१, वर्धा-वैनगंगा १५१, खानदेश २०, कोकण ६०, (दरवेळेला कोकण निराळं पडत आहे) आणि कृष्णा-भीमा ६४. म्हणजे कृष्णा-भीमेमध्ये सुद्धा 'गाव, पूर' कोकणापेक्षा जास्ती आहेत. पण ह्या वरच्या मुलखापेक्षा कमी आहेत. 'पुरी' हा 'पूर' सारखाच प्रत्यय. तर तोही गोदावरीकाठी ३१, पूर्णेत ५, वर्धा-वैनगंगा ७ आणि इतर सगळे मिळून ८. म्हणजे तोही आपल्याला या तीन भागांत जास्ती दिसून येतो.

नंतर 'वाडी'. गोदावरीत ३६१ वाड्या आहेत. गोदावरीकाठी १९५, कृष्णा-भीमेकाठी ९९, आणखी कोकणात ८, पूर्णा–वर्धा–वैनगंगा मिळून जवळजवळ ५०. तेव्हा इथेही गोदावरीकाठीच ह्या गांवाचं प्राबल्य आहे. नंतर कृष्णा-भीमेकडे. ही गावे किती जुनी आहेत हे मात्र मी अजून पाहिलेले नाही.

त्याचप्रमाणे खेड, खेडे, खेडा आणि खेडी असे प्रत्यय असलेली ग्रामनामे आहेत. तीही गोदावरीकाठी सगळ्यांत जास्ती, त्याच्याखाली पूर्णा, त्याच्याखाली खानदेश. तुम्हांला माहीत असेल की सारंगखेडं, अमकं खेडं अशी खानदेशामध्ये कित्येक गावं खेड किंवा खेडं किंवा खेडी हे शेवटी असलेली अशी आहेत. खानदेशामध्ये हा प्रत्यय बहुतकरून गुजराथेतून आला असावा असं वाटतं. पण जर 'क्षेत्र' पासून आलेला म्हटला तर 'खेटक' हाही गोदावरीकाठी परत जास्ती. पूर्णा-वैनगंगा ह्यांच्याकडे शेवटी सगळ्यांत जास्ती आणि कोकणात एकच आहे म्हणे. म्हणजे आम्ही तीस हजारांतली जी सहा हजार तपासली त्याचा हा एकंदर निष्कर्ष.

आता 'वली' आणि 'ओली'. अमकवली, तमकवली, तडवली अशासारखी जी गावं आहेत त्यांच्यात मात्र बरोबर हे चित्र बदलते. एकंदर २२४ गावं अशी सापडली. कोकणात ११४, भीमा-कृष्णा ५१, आणि बाकीची सगळी मिळून ४०.

तेव्हा आपल्याला असे दिसते की, ग्राम, खेटक, पूर अशांसारखे अगदी संस्कृत पासून उद्‌भवलेले जे प्रत्यय आहेत किंवा वली किंवा ओली हे ही संस्कृतापासून नसेल असंही मी म्हणत नाही. पल्ली असेल, वलय असेल, मला सांगता येत नाही. पण निदान निराळ्या तऱ्हेची आहेत. म्हणजे तीही संस्कृतोद्‌भव असून पल्ली अशाच अर्थी जर असली तर संस्कृतामध्ये पल्ली म्हणजे साधारण गुरं-वासरं घेऊन रानामध्ये राहातात ते किंवा नेहमी संस्कृत वाङ्मयामध्ये भिल्लांचं गाव आलं की पल्ली येते. पण कोकणामध्ये वली, आवली असलेली अशी ११४ गावं आहेत; त्यांतली निम्मी कोकणच्या लहानशा पट्टीत आहेत आणि बाकी इतरत्र आहेत. तर, जरी ही संस्कृतोद्‌भव असली तरी देशावरची विशेषतः गोदाकाठी आणि पूर्णा-वर्धा-वैनगंगा यांच्या काठीं जी आहेत त्यांच्यापेक्षा अगदी सर्वस्वी निराळ्या तऱ्हेची गावं आहेत.

नंतर घर, वडे आणि वडी. तर घर म्हणजे देवघर, सायघर, दांडेघर अशी कितीतरी वरं. राजगृह सगळ्यांच्या माहितीचे आहे. घर हा प्रत्यय संस्कृतातलाच आहे. तेव्हा घर ज्याच्या शेवटी आहे अशी नावं अगदी थोडी आहेत आणि त्यांच्यापैकी ३६ म्हणजे ⅔ गावं एकट्या कोकणात आहेत. थोडीशी कृष्णा-भीमेच्या खोऱ्यांत जी आहेत ती सह्याद्रीच्या लगत आहेत सगळी. आणखी वर्धावैनगंगेमध्ये शून्य, पूर्णात शून्य, गोदावरीत ३. वडे-वडी मध्ये असेच, अगदी थोडी आहेत. वडी कृष्णे-भीमेखाली ३२ आहेत आणि बाकीच्या ठिकाणी जवळजवळ काहीच नाहीत. तेव्हा परत असे दिसून येते की, हे जे अन्तर्गत पाच विभाग आपण पाहिले ते परत परत निरनिराळ्या तऱ्हेने आपल्या दृष्टीस येतात. ज्या वेळी आपण असे म्हणतो की गोदेच्या काठी मराठी बोलायला लागले आणि ज्या वेळेला तेरावे शतक आपण धरतो, त्या वेळेला महानुभावांच्या वाङ्मयामध्ये येणारी ग्रामनामं किंवा कुठच्या स्थळी ते गेले, त्यातली बरीचशी वऱ्हाडमध्येच आहेत. तेव्हा तिथे कधीतरी महानुभावांच्या वेळेला वऱ्हाड मराठी झालेले होते. वऱ्हाड सातव्या-आठव्या शतकापर्यंत वाकाटकांचे होते आणि त्यांचे सगळे लेख संस्कृतात होते. मध्ये काहीतरी काळ असा लोटलेला असणार की, ज्या वेळेला गोदावरीच्या राजांची सत्ता वऱ्हाडपर्यंत पोहोचलेली होती. वाकाटकांच्या नंतर त्यांची शकले झाली. आणखी दोन-तीन वाकाटकांची घराणी होती. पण दक्षिणेकडच्या पैठणच्या राजांनी, प्रतिष्ठानच्या राजांनी तिथे कधीतरी आपली सत्ता बसविली असली पाहिजे. आणखी पूर्णचे खोरे, शतकानुशतके ज्या खोऱ्याचे तोंड उत्तर भारताकडे होते, ज्यातल्या सगळ्या राजकन्यांची लग्ने उत्तर भारतातील राजांशी झाली होती, ते खोरे नवव्या-दहाव्या शतकापासून दक्षिणेकडे त्याचं तोंड वळलं, आणखी तो एक महाराष्ट्राचा भाग झाला असे दिसते. पश्चिमेला गोदावरी, नंतर पूर्णा-वर्धा-वैनगंगा, त्यांच्यानंतर गोदावरी सुटल्यानंतर खाली दक्षिणेकडे आत्ता सांगितल्याप्रमाणे पंढरपूर, नंतर पुणे, कोल्हापूर इत्यादी. नंतर कोकणामध्ये देशावरच्यापेक्षा थोडीशी निराळी भाषा बोलली जात होती. ग्रामनामांवरूनही असे दिसते की, तिथल्या लोकांनी आपल्या गावाला जी नावे ठेवली

ती त्या वरच्या लोकांच्यापेक्षा काहीतरी निराळी ठेवली. काहीतरी निराळे ते लोक तिथले होते. निराळी भाषा बोलत होते आणि आपल्याला माहिती आहे, ज्याला कोकणी म्हणतात, ती कोकणी आणि वरची रत्नागिरीपासूनची कोकणी ह्यांच्यात फरक आहे. रत्नागिरीपासून जी वरची कोकणी आहे त्याला मराठीची एक उपभाषा म्हणता येईल. खालची कोकणी काय आहे ह्याच्याबद्दल अतिशय वादंग माजलेला आहे. काही अतिशय मोठे भाषाशास्त्रज्ञ ती भाषा मराठीची भाषाभगिनी आहे, मराठीला अत्यंत जवळची अशी बहीण आहे, पण ती मराठीची उपभाषा नाही असे म्हणतात. तेव्हा हे लोक कधीतरी, निदान उत्तरेकडचे, त्यातले मराठीकडे वळले. दुसरे आपल्याला असे दिसते की, अगदी किनारपट्टीच्या म्हणजे सह्याद्रीच्या घाटावरती, जिथे व्यापारी मार्गाने खालच्या बंदरातून वरती देशावर यायचे, अशा प्रत्येक ठिकाणी शातवाहनांचे मराठी शिलालेख, प्राकृत शिलालेख आहेत. ते कोकणातून देशावरती जायच्या वाटेवर आहेत. शातवाहनांचा अंमल निश्चितपणे कोकणावर होता. कोकणामध्ये अगदी शुद्ध मराठीतले शिलालेखसुद्धा सापडतात. आठव्या-नवव्या शतकापासून सापडतात. तेव्हा त्यापूर्वी कोकणही महाराष्ट्राच्याकडे वळलेले दिसून येते. अशा तऱ्हेने हे जे तीन-चार मुलूख सांगितले त्या मुलखांपैकी दोन म्हणजे एक खानदेश अन् एक हळबी लोकांचा मुलूख. कधी काळी तरी ते जंगलात होते, आणि तिथे एके काळी अहिर राजे राज्य करीत होते. पण कितपत प्रभावी हे राज्य होते हेही सांगता येत नाही. उत्खननामध्ये मोठाली गावे सापडतात. खानदेशातली गावांची नावेही मोठी आहेत. कधीतरी ते परत जंगलात गेले असे म्हणा हवे तर. त्याचप्रमाणे पूर्वेकडचा मुलूख. पूर्वी तिथे संस्कृत बोलणारे लोक होते. मध्ये तो मुलूख गोंड राजांच्या ताब्यात गेला. तो परत महाराष्ट्रामध्ये आला. तो नागपूरकर भोसल्यांच्यानंतर असे म्हणता येईल का? एकदा वाटते की असे असेल. कारण त्या गोंडांच्या मुलखामधनं मी गेले त्या वेळेला नावं विचारायला लागले तर येसूबाई, भीमाबाई अशी खास मराठी नावं. तशी म्हणाले हो, आम्ही नागपूरकर भोसल्यांच्या अंमलाखालून गेलो त्यामुळे आम्हांला ही नावे आवडायला लागली आहेत. म्हणजे तो मुलूख आपल्याकडे नव्याने आला. तसाच खानदेशचा मुलूख हा नव्याने आहे. आणि खानदेशाच्या मुलखामध्ये सुद्धा अजून पश्चिमेकडची बाजू आणि उत्तरेकडची बाजू भिल्लांची आहे. तिथे जे भिल्ल खाली आहेत, काही वरती डोंगरातले भिल्ल आहेत तेसुद्धा मराठी भाषा बोलतात. जसजसं पश्चिमेकडे जावं तशी भाषा गुजराथीच्या वळणावर जायला लागते. अन् आपल्याला माहितीच आहे की, हा मुलूख तुमचा की आमचा म्हणून भांडणं चालली आहेत. तेव्हा ह्याला मी असं म्हणते की, ज्याला आपण खानदेश म्हणतो आणि ज्याला आपण गोंडांचा मुलूख म्हणू किंवा हळबी लोकांचा मुलूख म्हणू हे दोन मुलूख असे आहेत की त्यात वन्य लोक होते. आणखी ह्या मुलखावरती उत्तर आणि दक्षिण ह्या दोन्ही दिशांचे गेल्या चारशे वर्षांमध्ये वर्चस्वासाठी प्रयत्न चालू आहेत. आता खानदेशामध्ये लेवा ही जी जात आहे ती

गुजराथेतून आलेली आहे. खानदेशात अशा किती तरी जाती आहेत. त्याचप्रमाणे ज्याला गुजर म्हणू ती गुजर जात आज खानदेशामध्ये स्थायिक झालेली चांगल्यापैकी शेतकरी लोकांची आहे. लेवा काय, लेवागुजर काय, बडगुजर काय ह्या सगळ्या पूर्वीच्या मध्य-हिंदुस्थानातल्या किंवा गुजराथेतल्याच जाती आहेत.

त्याचप्रमाणे ह्या बाजूला मध्यप्रांताकडे तुम्ही गेलात की, कोराळी आणि पवार अशा जाती आढळतात. आपल्याकडे मराठे पवार कुळीचे आहेत ते आणि तिकडे वरचे पवार आहेत ते अगदी निराळे आहेत. हे पवार स्वतःला स्वतंत्र जात समजतात. तेव्हा त्यांचे पुरुष मराठी बोलतात, त्यांच्या बायका अजून मराठी नेसणे नेसत नाहीत. आणि खूपशा हिंदी शब्दांचा वापर करतात. तेव्हा इकडे हिंदी-मराठी, तिकडे गुजराथी-मराठी असा ह्या जंगली प्रदेशामध्ये शिरकाव करण्याचा प्रयत्न गेल्या चारशे वर्षांत झाला. म्हणून ते दोन नवीन प्रदेश.

मी आपल्याला हे ग्रामनामांबद्दल सांगितले तसेच इतरही बाबतींत परत ह्या पाच प्रदेशांमध्ये फरक दिसून येतो. एक फरक असा की, पाच प्रदेश असे न म्हणता भौगोलिक दृष्ट्या जर आपण महाराष्ट्राचा विचार करायला लागलो, तर ही कोकणपट्टी, इथे १०० ते २०० इंच पाऊस चार महिन्यांत पडून जायचा. वरती देशावर आलात की सह्याद्रीची जी मावळाची पट्टी तिच्यामध्येही तसाच मोठा पाऊस. साधारण २५ ते ३० मैलांवर पाऊस इतका कमी होतो की, लोणावळं–पुणं अंतर ३०–४० मैलांचं आहे. लोणावळ्याला १५० इंच पाऊस तर पुण्याला २५ इंच पाऊस. दर मैलाला ५ इंच याप्रमाणे पाऊस कमी होतो. पुण्याच्या पलीकडची डोंगराची ओळ ओलांडून गेलं की महाराष्ट्राच्या दुष्काळ-पट्ट्यात आपण जाऊन पोहोचतो, की जिथे १० इंचांवर पाऊस पडतच नाही. त्याच्यामध्ये सबंध नगर जिल्हा येतो, सोलापूर जिल्हा येतो, काही सांगलीचा भाग येतो, साताऱ्याचा पश्चिम भाग येतो. नगर जिल्हा दुष्काळी म्हणून प्रसिद्ध असे. आता मात्र नीरा, भीमा, प्रवरा ह्या कालव्यांनी सगळ्यात महाराष्ट्रातील संपन्न शेती आणि नवे ऊस-बागाइतदार ह्या पूर्वीच्या दुष्काळपट्टीमध्ये आहेत. ह्याच्या पलीकडे तुम्ही गेलात, जरा पूर्व महाराष्ट्रामध्ये तिथे परत जास्ती पाऊस पडतो. कारण त्यांना इकडच्या मान्सूनचा शेवटचा भाग आणि तिकडून येणाऱ्या मान्सूनचा पहिला भाग असे दोन्ही मिळतात. म्हणजे नागपूरला ४५" पाऊस पडतो.

तेव्हा पाऊस कसा पडतो, पूर्वेकडून पश्चिमेकडे व पश्चिमेकडून पूर्वेकडे, असे पाहायला गेलो तर असे दिसते की, पिकांचीसुद्धा परिस्थिती अगदी निराळी. इकडे भातशेती पश्चिमेकडे, तसंच पूर्वेकडेही उत्तम भातशेती होते. नागपूरच्याही पुढे तुम्ही गेलात म्हणजे दुसरी शेतीच नाही. अगदी म्हणाल तितक्या भातखाचरांमधून तुम्ही जात असता. त्याच्यानंतर मधला प्रदेश आहे, त्याच्यामध्ये साधारण नाशिक–पुणे–सातारा ही जर पट्टी घेतली, तर तिथे पाऊस बरा पडतो. विहिरींना पाणी बारमास असू शकतं. तिथे माळी लोकांची वस्ती आहे आणि माळवदं पुष्कळ होतं. आणि विशेषतः

गेल्या काही शतकांची ही गोष्ट आहे, वाढतं मुंबई शहर आणि पुणं शहर वगैरे, ह्या शहरांमुळे माळवदाला उठावही तावडतोब मिळतो. तेव्हा ह्या पट्ट्यामध्ये माळी लोक राहातात आणि निरनिराळ्या तऱ्हेची फळबाग किंवा भाजीपाला करतात. ह्याच्या पलीकडे जे लोक आहेत, त्यांना देशावरचा शेतकरी असं म्हणता येईल. त्याचा गाभा म्हणजे ज्याला कोरडवाहू शेती म्हणतात ती करणारे होत. परत पुण्याच्या बाजूस एक लहानशी पट्टी आहे की जिथे बाजरी पिकवतात. पूर्वेकडे तुम्ही गेलात की तिथे जोंधळा हे मुख्य अन्न. त्यातही गम्मत आहे. आम्ही सगळे जोंधळा खातो, पुण्याचे लोक बाजरी खातात, नागपूरच्या बाजूला तुम्ही गेलात की गहू पिकतो. म्हणजे पिकांतही इतके निरनिराळे आहे! मला आठवतंय, पहिल्या प्रथम जेव्हा रेशन झाले त्या वेळी ही नागपूर-वऱ्हाडकडची मंडळी आली. अहो म्हणाले, जगता कसे तुम्ही? तर म्हटलं मिळतंय की धान्य. पुरेसं मिळतंय. म्हणजे? म्हणाले, तुम्ही आम्हांला हे गुरांचंच खाणं खायला सांगता की बाजरी म्हणजे! आम्ही नाही आजपर्यंत खाल्ली. तेव्हा आमच्याकडे बाजरी हे मुख्य धान्य. पुढे सातारा, सोलापूर, नगर ह्यांचं जोंधळा हे मुख्य धान्य, आणि गहू म्हणजे, दर सणावाराला पुरणपोळी करण्याइतका गहू ते पिकवतात. खपली गहू तोसुद्धा आणि मग पलीकडे गहू खाणारे आणि भात चांगल्यापैकी खाणारे लोक आहेत.

तुम्हांला दिसून येईल की कोकणामधला शेतीचा भर म्हणजे, उन्हाळ्यामध्ये शेतं तयार करायला सुरुवात होते त्यांची. कोकणातल्या लोकांची शेतं तयार होताहेत, पेरं तयार होताहेत तरी देशावरती काही पहिला पाऊस येत नाही. जून १२ ला पुण्याला पाऊस यायचा असं लोक म्हणतात; तेव्हा महिनाभर पाऊस पडून गेलेला असतो कोकणामध्ये. ह्याच्याही पलीकडे पाऊस ह्या पूर्वपट्टीमध्ये ऑगस्टमध्ये पडायचा. आणि तो ऑगस्टच्याही पलीकडला पाऊस म्हणजे थोडासा सप्टेंबरचा पाऊस आणि नंतर तिकडून येणारा नोव्हेंबरचा पाऊस असं धरलं म्हणजे हा शेवटचा महाराष्ट्राचा पट्टा म्हणजे परत शेतीचे हंगामही त्यांचे निरनिराळे असतात. कोरडवाहू शेती करणारे हे लोक असल्यामुळे शेत करायचं कधी? जेव्हा वरनं पाणी पडेल तेव्हा. इतर वेळेला लुटालूट, मुलूखगिरी करायला हे मोकळे होते. तेव्हा त्यांची ही लढाऊ वृत्ती होती! आपला देश सोडून लोकांच्या देशात लुटालूट करणे म्हणजे क्षत्रियपणा. त्याला पूर्वीच्या काळी लढाऊ वृत्ती म्हणत असत, त्यांच्यामध्ये चांगले वाकबगार लोक होते. कारण आपलं शेत पेरलं म्हणजे ते येईल तोपर्यंत किंवा ते येऊन गेल्यानंतर जो काय थोडासा पावसाळा असतो तो संपला म्हणजे ह्यांना मुलुखगिरीला निघायला काहीच हरकत नाही. कारण पुढच्या ऑगस्टपर्यंत पाऊस नाही. तेव्हा अशा तऱ्हेने ह्या मराठ्यांचा उपयोग झाला.

दुसरी गोष्ट अशी की, देशावरती, विशेषतः पश्चिम महाराष्ट्रामध्ये हे मी मराठ्यांचं आगर समजते, तेथे मराठा आणि कुणबी हा भेद करता येतो का

नाही ? हा विचार मला काही अजून करता आला नाही. ९८ कुळी घेतली तर जवळ-जवळ सगळे कुणबी आणि मराठे हे जातीतच. पंचकुळी, सप्तकुळी असे मोठाले हे घेतले तर पहिल्या काही कुळींतले मराठे आणि बाकीचे खालचे शेतकरी असं म्हणावं का काय ? आणि मी मापं घेत असताना नेहमी विचारी, तुझी जात काय ? ते सांगत माझी जात मराठा, पाटीलकीचंही वतन आहे परंतु सध्या आमचं नाही आहे, आमच्या चुलत घराण्याचं. तरी मला पटत असे की पाटीलकी वतन ह्या आडनावाला आहे. म्हणजे जेवढा जेवढा म्हणून मराठा आहे त्याचं पाटीलकीचं वतन आहे. तो त्या गावचा राजा असतो.

ही जी परिस्थिती आहे ती कोकणात नाही. कोकणामध्ये मात्र कुणबी कुठचे आणि मराठे कुठचे हे अगदी तावडतोब सांगता येते. जे मराठा आहेत ते स्वतःला मराठे म्हणवतात आणि कुणबीही आपल्याला मराठा म्हणवीत नाहीत.-' आम्ही त्यांच्यातले नाही बाई!' असं अगदी स्पष्ट सांगतात. त्यांची आडनावं निराळी आहेत. त्यांचे कुळाचार पण वेगळे आहेत. दुसरी गम्मत ही की, सबंध महाराष्ट्राचं राजकारण शिवाजीच्या वेळेपासून आजतागायत, मराठ्यांच्या कुळीत गुंतले होते. शिवाजीला औरंगजेबाशी सामना देणं जितकं जड होतं, त्याच्यापेक्षा कितीतरी पटींनी ह्या मातबर कुळींशी सामना देतादेता बिचाऱ्याच्या नाकी नऊ आले. मोरे राजे सबंध कोयनेचे राजे होते. कोयना खोऱ्यामध्ये त्यांनी बारा शंकरांची स्थानं स्थापलेली आहेत. सुंदर आहेत. हे गृहस्थ शिवाजीला राजा म्हणायला तयार नव्हते. "अहो, तुमची कुळी कुठची, आमची कुळी कुठची, भोसल्याचं नाव माहिती असण्यापूर्वीपासूनच आम्ही इथे आहोत आणि आम्ही राजे आहोत. तुम्ही काय स्वतःला राजे म्हणवता ?" तेव्हा ही प्रत्येकाची एकेका नदीच्या, डोंगराच्या मधली कुळी! त्या कुळींचा विस्तार आणखी ह्यांच्याशी झगडून झगडून, ह्यांना आपलं म्हणून, आपण मराठ्यांनी मिळून सर्वत्र एकत्र लढून हा बाहेरचा शत्रू ह्याला हाकलावं, हे एव्हढे मोठे कार्य होते. आणि ते इतका थोडा वेळ टिकले की शिवाजीच्या पाठीमागे त्याचा विचका झालेला आपण बघतो आहोत. अजूनही मराठ्यांना जोरात पुढे आणायला जो अडथळा आहे, तो हा आहे की, ते आपली कुळी विसरू शकत नाहीत. अजून, ' ती जुनी क्षत्रिय कुळी, इतका हा आमचा मुलूख, आमचे सोयरसंबंध व्हायचे ते तमक्याशीच, ' ह्यात हे मराठे गुंतलेले आहेत.

गुजराथमध्ये ह्या दिवसांमध्ये अतिशय जोराने पुढे सरसावलेला शेतकरी वर्ग पाटीदार आहे. सुदैवाने पाटीदारांना कुठल्याही तऱ्हेचं क्षत्रियत्व चिकटलेलं नाही. वाटेल ते काम नाक घासून करायला ते तयार असतात. आणखी आमच्याकडचे जे मराठे आहेत ते, ब्राह्मणांना जसं ब्राह्मणत्व चिकटलं होतं तसं, त्यांना क्षत्रियत्व आणि कुळी चिकटली असल्यामुळे ते पाटीदारांच्याइतके जोमाने पुढे सरसावलेले नाहीत. अजून ते आपलं क्षत्रियत्व आणि कुळी ह्यात अडकून पडलेले आहेत. तेव्हा महा-

राष्ट्राचा जर परत तुम्ही इतिहास पाहिलात तर असे दिसून येते की, पश्चिम महाराष्ट्रामध्ये हे निरनिराळ्या कुळींचे मराठे आहेत. अजूनपर्यंत मी मनुष्य शोधतेय. कधी तरी एखाद्या दिवशी येईल एखादा विद्यार्थी आणि मराठ्यांच्या कुळी आणि त्यांनी पूर्वीचा व्यापलेला प्रदेश असं म्हणून महाराष्ट्राचा, निदान पश्चिम महाराष्ट्रापुरता तरी आपल्याला नीट नकाशा काढता येतो का हे त्याच्या साहाय्याने मला पाहायचं आहे. मिळेल तेव्हा मिळेल. पण मला तर ते काम झेपणे शक्य नाही.

अशा तऱ्हेचे जे हे कुळींचे मराठे आहेत ते कोण होते ? परत असा प्रश्न येतो. ते आपला संबंध रजपुतांशी जोडायला बघतात. माझ्या मते रजपुतांच्या आधीचे आहेत ते. त्यातून काही रजपुतांची आडनावे आली असतील. पण रजपुतांच्या आधीच्या राजवंशांची नावे त्यांच्यामध्ये आहेत असे मला वाटते. मी निदान माझ्या ओळखीतल्या माणसांना सांगते, रजपुतांकडे तुम्ही का बघता, त्यांच्यापेक्षाही जुने राजवंश आहेत तुमचे ! त्यांच्याकडे बघा. तुम्ही इथे होता. निरनिराळ्या तऱ्हेची लहान लहान खोरी आहेत त्या खोऱ्यांचे तुम्ही राजे होता, आणि तेही रजपुतांच्या आधीपासून. तेव्हा परत हे लोक कोण, ह्यांच्या प्रत्येक कुळीचं एकेक खोरं, प्रत्येक खोऱ्यातल्या कुळीचा प्रमुख तो पाटील, वरील घराणं तो राजा, अशा तऱ्हेने ह्या महाराष्ट्राचा राजकीय दृष्टिकोणातून विचार करायला लागलो तर ह्या मराठ्यांचं राजकारण होतं तरी काय ? त्यांच्या राजकारणामध्ये हे जे अशा तऱ्हेने एक डोंगर किंवा दोन डोंगर त्यांच्यामध्ये वाहणारी नदी त्यातनं एक कूळ, दुसरीकडे गेलं की दुसरं कूळ, तिसरीकडे गेलं की तिसरं कूळ...प्रत्येक कूळ–मोठे. मी दुसऱ्यापेक्षा कमी म्हणायला तयार नाही, व्यवहारासाठीसुद्धा कमी म्हणायला तयार नाही. सगळ्या मोऱ्यांना कापून काढावे लागले शिवाजीला. तिथे काही मग दयामाया दाखवता आली नाही. तेव्हा ज्याला आपण सामाजिक परिस्थिती म्हणतो तीसुद्धा ह्या पश्चिम महाराष्ट्रातल्या खालच्या भागामध्ये, विशेषतः कृष्णेच्या खोऱ्यामध्ये निराळी दिसते. इकडे आमच्याकडे कुळींचे लोक आहेत ते आपली आडनावे सांगतात. तुम्ही मराठवाड्यात गेलात की सगळे देशमुख असतात. तुम्ही वऱ्हाडात गेलात तरीसुद्धा ते देशमुख असतात. खानदेशात पाटील. इकडे एखाद्याने आपले आडनाव पाटील सांगितले की 'पाटील खरा, पण कुळी काय', की तो सांगतो थोरात पाटील, माने पाटील, अमकं पाटील. अशा तऱ्हेने तो आपले आडनाव सांगू शकतो. तिकडे त्यांना माहिती नसतं पुष्कळ वेळेला. म्हणजे एक आपल्या वर्णाचं हे जे चाललेले असते की ब्राह्मण, क्षत्रिय अमके तमके, तर आपण मराठे व्हावे अशी एक प्रवृत्ती फार जुन्या काळापासून आहे. आणि मराठी होण्याची पहिली पायरी म्हणजे पाटील आहोत हे सांगणे. आडनाव माहिती नाही, मग हळूहळू त्या आडनावालाही कुळींचा दर्जा मिळायला लागतो. तेव्हा परत आपल्याला असे दिसून येते की, ही जी खेडेगावची व्यवस्था आहे ती बारा बलुत्यांची व्यवस्था आहे. खेडेगावापुरता पाटील मुख्य आणि बहुतेक खेडेगावामधले

घराणे पाटलाचे. जर मराठ्यांची वस्ती ४०–५०–६० टक्के असली तर एका आड-नावाची घराणी ७०–८० असतात. बाकीची २० इतर घराणी आणि दर वेळेला तुम्ही विचारा, 'अहो, वाघांचं गाव आहे, कदम कसे आले ?' तर ते बहुतेक लग्नाच्या नात्याने आलेले असतात. 'अमक्या वेळेला तमकं लग्न झालं तेव्हा आले. मामाच्या मुलाला मी माझ्याकडे आणले.' अशा तऱ्हेने ती सगळी लग्नाच्या नात्याची मंडळी असतात. तेव्हा एक घराणं मुख्य, बाकीची ही आणि बलुतदार ह्यांच्यात देणारे हे लोक आणि घेणारे इतर. बलुतदारांमध्ये कुंभार–लोहार–सुतार–चांभार–महार हे सगळे घेणारे, गुरव–ब्राह्मण–कुळकर्णी असेल तो आणि देणारे हे लोक. अशा तऱ्हेची ही बलुतदारी पद्धत होती, की ह्यांनी द्यायचं, त्यांनी घ्यायचं. आणि घेण्याच्या मोबदल्या-मध्ये हे काम ह्याचं, ते काम त्याचं असे वाटलेले असायचे. अशा तऱ्हेची प्रगल्भ बलुतदारी कोकणामध्ये दिसत नाही. थोडी थोडी बलुतदारीची चिन्हं तिथे पण आहेत. पाटील ह्या शब्दापेक्षा तिथे खोत शब्द आहे अन् तो खोत शब्द सबंध पट्टीत आहे. खोताचा अर्थ काय ? मला माहिती नाही. पण खोताच्याकडे, जसे अधिकार पाटिलकीचे असतात तशा तऱ्हेचे बरेचसे असतात. कज्जे खोताच्या अंगणात सुटतात. पण खोताचा, जो पाटलाचा मान असतो तो, बलुतदारी पद्धतीने खोताचा असतो की नाही हे कळले नाही. काही ठिकाणी इकडे खेड्यांमध्ये जशी संपन्न बलुतदारी असते तशी कोकणातून मोठमोठ्या गावीसुद्धा तितक्या तऱ्हेची दिसून येत नाही. कारागीर असतात, नाही असे नाही, पण ते घरटी घरटी जाऊन लोक काम देतील ते घेतात. त्याचं माझं वर्षाचं इतकं देणं दिलंच पाहिजे. इत्यादी इकडे बलुतदारीमध्ये वतनदार हा शब्द पाटीलच स्वतःला वापरतो असं नाही. आम्ही ह्या गावचे वतनदार महार आहोत असे ते सांगतात. म्हणजे वतनदार हा शब्द पाटलाचा जसा तसाच बलुतदारांचा असतो आणि त्यांना वतनाची जमीन असते. आणि आमच्या पाहाणीत असे आढळून आले आहे की, एका कुणाचे तरी मर्तिक चाललं होतं. पाटीलबुवा आले, 'मर्तिकाची बातमी नाही का गेली तुमच्या सग्यासोयऱ्यांकडे !' 'नाही महारमंडळी येत नाहीत.' 'बोलावणं पाठवलं का रे बुवांनो ? बातमी नको पोहचवायला ? सरपण नको आणायला ?' 'तीन वर्षं बलुतं दिलेलं नाही म्हणाले.' 'एक वर्ष दुष्काळ होता.' ठीक आहे म्हणाले, 'घेत नाही बलुतं.' दुसऱ्या वर्षी पीक आलं तर म्हणाले, 'गेल्या वर्षीच्या दुष्काळाची कसर काढतोय.' यंदा पीक आलं तरीसुद्धा दिलं नाही. 'पाटील ज्या वेळेला जामीन राहिले, ह्या घराण्याकडून मी तुम्हांला बलुतं देववतो,' तेव्हा महारांनी सगळं काम केलं. म्हणजे वतनदारीमुळे जे हक्क प्राप्त होतात तेसुद्धा हक्क ह्या निरनिराळ्या जातींना प्राप्त झालेले होते. म्हणजे मोठ्या राज्ययंत्रणेखालची जी सगळ्यात लहान राज्ययंत्रणा जे खेडेगाव ते आपल्याला कोकणात दिसून येत नाही आणि देशावर दिसून येते.

अपूर्ण

# भासाचे अविमारक

के. ना. वाटवे

---

## नाटककार–परिचय

स्वप्नवासवदत्ताचा कर्ता कविश्रेष्ठ भास. हा अत्यंत प्राचीन आहे. ज्यांच्या नाट्य-कृती उपलब्ध झाल्या आहेत, अशा नाटककारांतील हा आद्य नाटककार असे म्हटले तरी चालेल. ख्रिस्तपूर्व पहिल्या किंवा चौथ्या शतकात होऊन गेलेल्या कालिदासाने आपल्या मालविकाग्निमित्रात भासाचा उल्लेख मोठ्या आदराने केला आहे. तेथे तो म्हणतो, " प्रथितयश अशा भास, कविपुत्र, सौमिल्ल इत्यादी नाटककारांच्या कलाकृतींना बाजूस सारून विद्यमान असलेल्या कालिदास कवीचे हे नाटक पाहण्याचा ओढा प्रेक्षकांना कसा वाटणार ? " यानंतर सातव्या शतकात होऊन गेलेल्या बाणभट्टाने आपल्या ' हर्षचरिता 'त भासाच्या नाटकांची वैशिष्ट्ये सांगितली आहेत आणि त्यांची देवालयांशी तुलना केली आहे. बाण म्हणतो, " भासाची नाटके सूत्रधाराने आरंभ केली आहेत. त्यांत पुष्कळ पात्रे आहेत, गुंतागुंतीची कथानके आहेत व पताकास्थानेही आहेत. "

राजशेखराने ( १० वे शतक ) आपल्या सूक्तिमुक्तावलीत असे म्हटले आहे की, " पूर्वी काही मार्मिक परीक्षकांनी भासाची सबंध नाटके त्यांची परीक्षा पाहण्यासाठी अग्नीत टाकली. त्यांपैकी ' स्वप्नवासवदत्त ' हे एकच नाटक न जळता तसेच राहिले. " वाक्पतिराजाने (इ. स. ७३२) आपल्या ' गौडवहो ' या प्राकृत ग्रंथात भासाला ' ज्वलनमित्र ' म्हणजे ' अग्नीचा मित्र ' म्हटले आहे. जयदेवाने आपल्या प्रसन्नराघवात ( १२ वे शतक ) भासाला कविताकामिनीचा ' हास ' असे म्हटले आहे. तसेच अभि-

नवगुप्त, भोजदेव, शारदातनय, रामचंद्र, गुणचंद्र इत्यादी ग्रंथकारांनी भासाचा व स्वप्न-वासवदत्ताचा उल्लेख केला आहे.

या सर्व उल्लेखांवरून अतिप्राचीन काळी भास नावाचा एक मोठा नाटककार होऊन गेला व त्याने ' स्वप्नवासवदत्त ' नावाचे सर्वोत्कृष्ट नाटक लिहिले होते हे निश्चित कळते. त्याचप्रमाणे त्याची काही इतरही नाटके असावीत असेही दिसते. पण भासाचे एकही नाटक परवापर्यंत प्रत्यक्ष उपलब्ध नव्हते. परंतु १९१२ साली दक्षिण भारतात तिरुअनंतपुरम् ( त्रिवेंद्रम् ) येथे म. म. टी. गणपतिशास्त्री यांना ताडपत्रांवर लिहिलेली भासाची एकूण तेरा नाटके सापडली. ही नाटके त्रिवेंद्रम्‌ची तेरा नाटके अशा नावाने प्रसिद्ध आहेत. ती तेरा नाटके पाच गटांत पुढीलप्रमाणे आहेत—

( १ ) ऐतिहासिक अथवा उदयनराजासंबंधी — ' प्रतिज्ञायौगंधरायण ', ' स्वप्नवासवदत्त '.

( २ ) स्वतंत्र अगर कल्पनेवर आधारलेली—' अविमारक ', ' चारुदत्त '.

( ३ ) महाभारतावर आधारलेली—' दूतघटोत्कच ', ' दूतवाक्य ', ' कर्णभार ', ' मध्यमव्यायोग ', ' पंचरात्र '; ' ऊरुभंग '.

( ४ ) हरिवंशावर आधारलेले—' बालचरित ' आणि

( ५ ) रामायणावर आधारलेली—' प्रतिमा ', ' अभिषेक '.

म. म. टी. गणपतिशास्त्र्यांनी ही तेरा नाटके प्रसिद्ध करून ती सर्व भासाचीच अनुपलब्ध नाटके आहेत असे जाहीर करताच संशोधकांच्या क्षेत्रात आनंद आणि आश्चर्य प्रगट झाले. पण संशोधकांमध्ये या नाटकांसंबंधी तीन पक्ष पडले. गणपतिशास्त्र्यांच्या मते ही तेराही नाटके भासाची आहेत असे मान्य करणारा पहिला पक्ष, ही नाटके भासाची नाहीत असे सिद्ध करणारा दुसरा पक्ष आणि निःसंदिग्ध असे काहीच मत न देता ही तेरा नाटके एकाच नाटककाराची नसून त्यांतील स्वप्नवासवदत्ता-सारखी काही नाटके भासाची आहेत असा समन्वयवादी तिसरा पक्ष. गेल्या तीस-पस्तीस वर्षांपर्यंत ही चर्चा चालली आहे. पण या प्रश्नावर अद्याप एकमत नाही. स्वप्नवासवदत्त हे नाटक भासानेच लिहिले हे मात्र निश्चित आहे.

**भासाचा काल**—आता भासाचा काल कोणता हा दुसरा विवाद्य प्रश्न. कालिदासाने भासाचा उल्लेख केला असल्यामुळे तो कालिदासापूर्वी वरीच वर्षे होऊन गेला असला पाहिजे हे निश्चित. कालिदास खिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला असावा असे एक मत आहेच. याखेरीज भासाच्या उपलब्ध तेरा नाटकांवरून काही अंतर्गत पुरावा उपलब्ध होतो. उदयन, प्रद्योत आणि दर्शक या भासाच्या नाटकांत येणाऱ्या व्यक्ती ऐतिहासिक असून त्यांचा काळ इ. पू. ६ व्या शतकाइतका प्राचीन आहे, हे व्हिन्सेंट स्मिथ या इतिहासज्ञाने मान्य केले आहे. ' प्रतिज्ञा ' व ' अविमारक ' यांत उल्लेखिलेले काशिराज्य खिस्तपूर्व ५ व्या शतकाच्या अगोदर नष्ट झाले होते.

राजगृह ही मगधाची राजधानी दर्शकाच्या काळातील म्हणजे फार प्राचीन काळची. तिचा उल्लेख स्वप्नवासवदत्तात आहे. उत्तरकाळात ही राजधानी पाटलिपुत्राला नेण्यात आली. 'प्रतिमे'मध्ये भासाला माहीत असलेले अर्थशास्त्र बृहस्पतीचे आहे. यावरून भास हा कौटिल्याच्या पूर्वी होऊन गेला असे सिद्ध होते. कौटिल्याचा काळ इ. स. पू. ४ थे शतक असा ठरवला आहे. भासाच्या भाषेत आर्ष प्रयोग आहेत. यावरून तो निदान कात्यायनपूर्व असावा (इ. स. पू. ३५०). त्याच्या नाटकात 'महाब्राह्मण' हा शब्द चांगल्या अर्थाने येतो. पण नंतरच्या वाङ्मयात मात्र 'भ्रष्ट ब्राह्मण' या अर्थी तो रूढ झाला आहे. भासाच्या नाट्यतंत्रावरूनही ते प्राचीन असावे असे वाटते. दशरूपकांपैकी व्यायोग हा रूपकप्रकार फार प्राचीन काळी रूढ असला पाहिजे. जुन्या काळी भासा-व्यतिरिक्त त्याचा दुसऱ्या कोणीही उपयोग केला नाही. भासाने रंगवलेली सामाजिक व धार्मिक परिस्थिती व त्याला परिचित असलेले इतर वाङ्मय यावरून त्याच्या कालाचे प्राचीनत्व सिद्ध होते. या सर्व व इतर पुराव्यांवरून भास हा इ. स. पूर्व ४ थ्या किंवा ५ व्या शतकात होऊन गेला असावा असे संशोधकांचे मत आहे.

भासाच्या प्राचीनत्वामुळे त्याची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. भासाने आपल्या नाटकांत आपल्या नावाचा उल्लेखही केला नाही. त्यामुळे भासाची माहिती त्याच्या नाटकांतील अंतर्गत पुराव्यावरूनच काढली पाहिजे. त्याच्या नाटकां-वरून असे दिसते की, भास हा वर्णाश्रम-व्यवस्थेवर श्रद्धा ठेवणारा ब्राह्मण असावा. तो एखाद्या राजाचा आश्रितही असावा असे त्याच्या भरतवाक्यावरून दिसते. तो उत्तरभारताचा रहिवासी असावा असेही वाटते; कारण त्याच्या नाटकांतील पात्रे व इतर वातावरण हे उत्तर भारतातलेच आहे. तो चांगला शास्त्रपारंगत दिसतो. 'प्रतिमे'त त्याने वेदवेदांगे व अनेक शास्त्रे यांचा उल्लेख केला आहे. त्याची वृत्ती विनोदी दिसते. मानवी मन आणि निसर्ग यांचा त्याचा अभ्यास सूक्ष्म होता.

भासाची नाटके त्यांतील काव्य व नाट्यगुण यांमुळे इतकी श्रेष्ठ होती की, त्यांचा पुढील नाटककारांवर प्रभाव पडला. शूद्रकाचे मृच्छकटिक हे भासाच्या चारुदत्तावरूनच लिहिले आहे. कालिदासाच्या नाटकांवर भासाची भरपूर छाप पडली आहे. प्रतिमेतील घटना, स्वप्नवासवदत्तातील कल्पना आणि प्रसंग, अविमारकातील शृंगारिक भाग यांचा परिणाम मालविकाग्निमित्र व शाकुंतल यांवर झाला आहे. भवभूतीच्या तीनही नाटकांवर आणि हर्षाच्या रत्नावली, प्रियदर्शिका व नागानंद या नाटकांवर भासाच्या स्वप्नवासवदत्तादी नाटकांचा प्रभाव स्पष्टपणे पडलेला आढळून येतो. अशा रीतीने हा प्राचीन नाटककार पुढील नाटककारांचा स्फूर्तिदाता नाटककार आहे हे निर्विवाद आहे.

## अविमारक

**राजा** — राणीसाहेब, नेहमी प्रसन्न असणारं तुमचं मुख आज अधिक प्रसन्न दिसत आहे. कशाचा आनंद झालाय् एवढा ?

अनुक्रमणिका

**राणी** — महाराजांनीच सांगितलं ना की, कुरंगीला मागणी घेऊन दूत आलाय म्हणून ? तेव्हा लवकरच जावयाचं तोंड पाहायला मिळेल म्हणूंन आनंद झाला आहे.

वैरन्त्य नगरीवर कुंतिभोज राजा राज्य करीत होता. त्याची कन्या कुरंगी रूप-गुणांनी अप्रतिम असल्यामुळे तिला लहानपणापासूनच मागण्या येत होत्या. ती उपवर झाल्यानंतर मात्र राजा आणि राणी दोघांनाही तिच्या विवाहाची चिन्ता लागून राहिली. एक दिवस यासंबंधी विचारविनिमय करण्यासाठी राजाने राणीला बोलावले. कुंतिभोज मुलीच्या विवाहातील अडचणी राणीला समजावून सांगत होता. तो म्हणाला, जावयाच्या गुण, संपत्ती वगैरेंचा विचार न करताच पित्याने जर आपली मुलगी स्वतःच्या इच्छे-प्रमाणे कोणालाही देऊन टाकली तर ती, एखादी पूर आलेली नदी उसळत्या पाण्याच्या योगाने जसा दोन्ही तीरांचा नाश करते, तद्वतच आपल्या अवखळपणामुळे दोन्ही कुळांना बट्टा लावते.

राजाराणींचे संभाषण चालू असतानाच त्यांना बाहेर कोलाहल ऐकू आला. कुरंगी त्या वेळी उद्यानात गेली असल्यामुळे राणीला काळजी वाटू लागली. इतक्यात अमात्य कौंजायन काही निवेदन करण्यासाठी आत आला आहे असे सैनिकाने सांगितले. राजाच्या आज्ञेवरून कौंजायनाने उपस्थानगृहात प्रवेश केला. त्याला संभ्रांत अवस्थेत पाहून राजा म्हणाला, " गडबडून जाऊ नका, सावकाश, स्वस्थ बसा आणि काय घडले ते नीट सांगा. " कौंजायनाने सांगायला सुरुवात केली. " महाराज, आपण मला कुरंगी-बरोबर उद्यानात पाठवले होते, त्याप्रमाणे आम्ही उद्यानात गेलो. तेथे पुष्कळ वेळ क्रीडा करून दासदासींशी गप्पा मारून कुरंगी परत फिरणार, तेवढ्यात त्या ठिकाणी माहुताला जमिनीवर लोळवून धुळीने माखलेला वेगवान मदोन्मत्त हत्ती आला. "

राजाला दम धरवेना. त्याने विचारले, " बाकी सारं जाऊ दे, कुरंगी खुशाल आहे ना ? " कौंजायनाने 'होय' म्हणताच निर्धास्त बनलेला राजा त्याला म्हणाला," आता अगदी सगळं सविस्तर सांग. " " कौंजायनाने पुढे सांगितले, हत्तीला पाहून सर्व नोकर-चाकर लोक पळून गेले, बायका आरडाओरडा करू लागल्या. आम्ही उद्यानातली साधनसामग्री व्यवस्थित आहे की नाही हे पाहण्यात गुंतलो असतानाच राजकन्येच्या वाहनावर तो हत्ती धावून आला.

एवढ्यात एक सुंदर परंतु निगर्वी, तरुण असूनही निरहंकारी, शूर परंतु दाक्षिण्य असलेला, कोमल असूनही बलवान असा तरुण तेथे आला आणि त्याने राजकन्येला अभय देऊन निःशंकपणे त्या हत्तीवर हल्ला चढविला. आपल्या हातांच्या प्रहारांनी त्याने हत्तीला जेरीस आणले तेव्हा राजकन्येला सोडून हत्ती त्याच्यामागे धावला. आम्ही लगेच वाहनात घालून राजकन्येला राजवाड्यात आणले. त्या तरुणाची माहिती करून घेण्यासाठी भूतिक तिथे थांबला आणि मी पुढे आलो. "

एवढ्यात भूतिक अमात्यही तेथे आला. त्याने पुढचे निवेदन केले. तो म्हणाला, " महाराज, तो तरुण त्या हत्तीशी अगदी लीलया खेळत होता. परंतु लोक आपल्याकडे पाहात आहेत हे लक्षात येताच लज्जेने खाली मान घालून तो निघून गेला. मी त्याचा मागोवा घेतला. त्याच्या गुणांची नि कुलाची माहिती काढून आणण्यासाठी प्रच्छन्नपणे मी त्याच्या मागोमाग गेलो. " राजा पुढे म्हणाला, " आम्ही ऐकलं होतं की तो चांडाल कुळातला आहे. " भूतिक लगेच म्हणाला, " महाराज, हे शक्य वाटत नाही. त्याचे दिव्य सौंदर्य, बोलणे, क्षात्रतेज, कोमलता असूनही प्रचण्ड शक्ती हे सर्व गुण पाहिल्या-नंतर त्याला चांडाल कुळातला म्हणणे म्हणजे आमची शास्त्रे व्यर्थ ठरवल्यासारखीच आहेत. "

राजाच्या मनात त्याला जावई करण्याचा विचार आला म्हणून त्याने विचारले, " त्याला पत्नी आहे ? " भूतिकाने सांगितले, " सारे काही आहे, पण पत्नी नाही. त्याचा पिताही मी पाहिला. व्यायामाने शरीर सुदृढ बनविलेला, पिळदार बांध्याचा, मनगटाजवळ धनुष्याच्या दोरीच्या आघातांची खूण असलेला असा तो ढगाआड दडलेल्या सूर्याप्रमाणे गुप्तपणे वावरणारा राजा असावा असे मला वाटते. " राजाही आता त्याच्या उच्च कुळाबद्दल निःशंक झाला आणि ' त्याचा आणखी तपास लावा ' अशी आज्ञा त्याने केली.

कुरंगीच्या विवाहाचा प्रश्न अद्यापि राजाच्या मनात रेंगाळत होताच. काशिराजा-कडून मागणी घेऊन दूत आला होता. त्याचे काय करायचे ? असे राजाने विचारताच अमात्य भूतिक म्हणाला, " महाराज, आजवर शेकडो दूत आले आहेत आणि अजून येतीलही. कन्यापिता त्यामुळे पुष्कळांना वंदनीय ठरतो. सर्व पहिलवान जसे निशाण वर डोळा लावून असतात, तद्वतच सर्व राजे राजकन्येची इच्छा करीत असतात. तात्पर्य, सर्वांकडे लक्ष देऊ नये. महाराज, गुणवत्ता पाहून आणि वर्तमान भूत-भविष्य यांचा विचार करून काय ते ठरवावे." कौंजायनाला राजाने त्याचे मत विचारताच तो म्हणाला, " महाराज, या सर्व मागण्यांमध्ये सौवीरराज आणि काशिराज आपले मेव्हणे असल्या-मुळे त्यांच्याशी संबंध करणे चांगले असा मी विचार केला आहे. त्यात सौवीरराजाने आपल्या मुलासाठी पूर्वीच कुरंगीला मागणी घातली होती. त्या वेळी ती लहान आहे म्हणून आपण परत पाठवली. आता काशिराजानेही दूत पाठविला आहे. त्या दोघांत कोणाची निवड करावी हे आपण ठरवावे. "

भूतिकाने लगेच सांगितले, " सौवीरराज आणि काशिराज दोघेही मेव्हणे असले तरी सौवीरराज राणीसाहेबांचे भाऊ आहेत. त्यामुळे ते अधिक श्रेयस्कर असे मला वाटते," राजाच्याही मनात तेच होते. परंतु त्याला एक शंका होती. "सौवीरराजाने आता परत दूत का बरे पाठविला नाही ? " या त्याच्या प्रश्नाला भूतिकाने उत्तर दिले, "गुप्तहेरांनी जी माहिती मिळविली आहे त्यावरून तो राजा सपरिवार कधीच दृष्टीला पडत नाही.

त्याचे अमात्य राज्यकारभार चालवितात. याचे कारण काहीच कळत नाही. मात्र राजकुलात प्रवेशाला बंदी आहे. "

सौवीरराजाचे काय झाले असावे याची राजालाही चिन्ता लागून राहिली. तो विचार करू लागला–'सौवीरपती कामाच्या आहारी गेला असावा किंवा वाईट मंत्र्यांनी त्याला बंदिवासात तरी टाकले असावे ? तो आजारी तर पडला नसेल ? किंवा एखाद्या ब्राह्मणाचा शाप लागल्यानंतर त्यासाठी शांती करण्यासाठी तो गुप्त राहिला आहे ? अशा नाना शंकाकुशंका त्याच्या मनात येऊ लागल्या. त्यासंबंधी आणखी माहिती तावडतोब काढून आणण्याची आज्ञा त्याने भृतिकाला दिली. काशिराजाने पाठविलेल्या दूताचे काय करावे हा प्रश्न अजून सुटला नव्हताच. त्याच्या मागणीला होकार द्यावा असे कौंजायनाने सुचविले. " अमात्य नुसते कार्यावर लक्ष ठेवतात, प्रेमभावनेकडे नेहमी दुर्लक्ष करतात " असे खेदोद्गार राजाने काढले. सौवीरराजाकडे त्याचा जास्त ओढा होता. त्यामुळे काय करावे अशा चिन्तेत तो दंग असतानाच दहा घटिका झाल्याची सूचना सेवकाने दिली. म्हणून तो विचार अर्धवट टाकून राजा स्नान करण्यासाठी उठला.

सौवीराधिपती कुन्तिभोजाच्या नगरीमध्ये प्रच्छन्नपणे राहात होता. शापभ्रष्ट झाल्यामुळे त्याला चांडालाचे जीवन कंठावे लागत होते. त्याचा मुलगा अविमारक हाही चांडालवेषात त्याच्याजवळ राहात होता. कुरंगीची हत्तीच्या तावडीतून त्यानेच सुटका केली होती. त्या वेळी तिचे रूप पाहून प्रथमदर्शनीच तो तिच्यावर मोहित झाला होता. त्या दिवसापासून तो सारखे तिचेच चिन्तन करू लागला. त्याला खाणे-पिणे, गप्पा, काही सुचेनात. ' ती राजकन्या आणि आपण चांडाल ' या विचाराने तो अधिकच बेचैन झाला. त्याचा मित्र विदूषक संतुष्ट याला हे सारे ठाऊक होते. तोही त्याच्याबरोबर प्रच्छन्नपणे राहात होता.

राजपुत्राच्या अवस्थेचा विचार करीत करीत एक दिवस तो हिंडत असतानाच राजवाड्यातली दासी चंद्रिका हिने त्याला पाहिले. त्याचा विदूषकीपणा सर्वविश्रुत होताच. त्याची गंमत करण्यासाठी तो जवळ येताच चंद्रिका वर पाहात बोलली, " काय ग कौमुदिके, अजून नाही मिळाला ब्राह्मण ? " विदूषकाने विचारले, " काय ग, कशाला हवाय तिला ब्राह्मण ? " " दुसऱ्या कशाला ? जेवायला ! " असे चंद्रिकेने उत्तर देताच जेवण म्हटल्याबरोबर विदूषकाच्या तोंडाला पाणी सुटले. तो म्हणाला, " अग, मग मी काय बौद्धभिक्षू आहे होय ? " चंद्रिका उत्तरली, " तू ब्राह्मण आहेस पण अवैदिक आहेस. " त्यावर विदूषक म्हणाला, " मी अवैदिक कसा ? ऐक तर, रामायण नावाचं एक नाट्यशास्त्राचं पुस्तक आहे. त्यातले पाच श्लोक, एका वर्षाच्या आत मी वाचले. एवढंच नव्हे तर त्यांचा अर्थही मला ठाऊक आहे. शिवाय वाचायला येणारा आणि अर्थ माहीत असणारा ब्राह्मण अगदी विरळा. "

चंद्रिकेने त्याच्या बुद्धिमत्तेचे तोंडभर कौतुक करून म्हटले, " मग सांग बरं या अंगठीवरची अक्षरे कुणाच्या नावाची आहेत ? " आता मात्र आपले बिंग फुटणार याची कल्पना विदूषकाला आली. प्रसंगावधान राखण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला, "अग, ही अक्षरे माझ्या पुस्तकात कधीच नव्हती ! " चंद्रिका म्हणाली, " जर या अंगठीवरची अक्षरं तुला सांगता नाही आली तर बिनदक्षिणेचे भोजन मिळेल. " विदूषक म्हणाला, " चालेल चालेल ! " एवढ्यात त्याची खोडी काढण्यासाठी चंद्रिकेने त्याच्याजवळची अंगठी पाहायला मागितली. " ही बघ, फारच सुंदर आहे " असे म्हणत भोळ्या संतुष्टाने ती तिच्या हातात दिली. त्याला चकवून पळून जाण्यासाठी चंद्रिका खोटेच म्हणाली, " अगो बाई, राजकुमार इकडे येताहेत वाटतं ! " विदूषकाला ते खरे वाटले आणि " कुठाय् राजकुमार " असे म्हणत तो वळून पाहू लागला; तेवढ्यात लोकांच्या गर्दीत मिसळून चंद्रिका पळून गेली. तिला शिव्यांची लाखोली वाहात तिची खोडी अविमारकाला सांगण्यासाठी विदूषक त्याच्याकडे जायला निघाला.

इकडे अविमारक राजकन्येचे चिन्तन करीत खिन्न मनाने बसला होता. तिच्या सौंदर्याचे वर्णन तो करीत होता. " साऱ्या स्त्रियांच्या सौंदर्याचा आदर्श म्हणून तिला ब्रह्मदेवाने निर्माण केले असावे, किंवा चंद्राच्या सौंदर्यानेच हे स्त्रीरूप घेतले असावे, अथवा सागरात झोपणाऱ्या श्रीकृष्णाला भिऊन लक्ष्मीच या स्त्रीचे रूप घेऊन या राजाकडे राहात असावी " असे विचार करीत तो बसला. मनाला या विषयापासून वळविण्याचा अनेक वेळा विचार त्याने केला; परंतु पुनःपुन्हा तोच विचार त्याला सतावू लागला. शेवटी मनाला वळविणे शक्य नाही हे ओळखून त्याने तिच्या चिन्तनात वेळ घालविण्याचे ठरवले.

अविमारक चिन्तनात दंग असतानाच कुरंगीची दाई आणि सखी नलिनिका त्याच्याकडे आल्या. कुरंगी त्याला पाहिल्यापासून झुरणीला लागली हे त्यांच्या लक्षात आले होते. लज्जेमुळे ती जरी आपणहून काही बोलली नसली तरी तिच्या हावभावां-वरून, वागणुकीवरून ती प्रेमविव्हल झाली आहे हे त्यांनी ओळखले. ती अलंकार घाले-नाशी झाली, तहानभूक विसरली, गप्पांमध्ये रस घेईनाशी झाली, सारखी दीर्घ निःश्वास टाकू लागली, काहीतरी असंबद्ध बोलू लागली. मध्येच हसणे, मध्येच रडणे असे तंद्रीत असल्यासारखे वागू लागली. तिची प्रिय मैत्रीण नलिनिका हिला मात्र तिने आपले गुपित सांगितले होते, आणि म्हणूनच अविमारकाला भेटण्यासाठी त्या दोघी त्याच्याकडे आल्या होत्या.

तो अकुलीन आहे याची दोघींनाही खंत वाटत होती. तथापि " तो अकुलीन असणे अशक्य आहे; कारण तशा प्रकारच्या उत्कृष्ट गुणांनी युक्त असलेला मनुष्य कुलीनच असणार. काहीतरी कारणाने तो आपले खरे स्वरूप लपवीत असला पाहिजे " असे अमात्यांनी राणीला सांगताना धात्रीने ऐकले होते. तो आशेचा किरण मनात

बाळगूनच ती नलिनिकेबरोबर आली. नलिनिका म्हणाली, " त्याच्या कुलाबद्दल च संदेह दूर झाला तर त्याच्याइतका गुणवान दुसरा जावई कोणीच नाही." इतक्यात कोठून तरी आवाज आला, " त्याच्याजवळ रूप, गुण, ज्ञान, बल यांचे वैभव जर आहे आणि अकुलीनांचे जवळ असे उच्च गुण कधीच आढळत नाहीत, तर याचे उच्च कुल योग्य वेळी नक्कीच कळेल. म्हणून याच्या कुलाची शंका सोडून दे आणि इष्ट साध्य करण्याच्या मागे लाग."

धात्री आणि नलिनिकेने चमकून इकडे तिकडे पाहिले. बोलणारे कोणीच दिसले नाही. ही दैवाचीच अपौरुषेय वाणी आहे अशी दोघींची खात्री झाली आणि त्याच्या कुलाबद्दलचा संदेह अशा प्रकारे दूर झाल्यामुळे आनंदित होऊन त्या अविमारकाजवळ गेल्या. धात्रीने अविमारकाला कुशल विचारले. परंतु तो आपल्याच तंद्रीत होता. तिच्या सौंदर्याचे गुणगान करण्यात तो दंग झाला होता. त्याचे स्वैर बोलणे ऐकून कुरंगीप्रमाणेच तोही तिच्यासाठी झुरतो आहे हे त्यांच्या लक्षात आले आणि त्यांना आनंद झाला. त्याच्या मनात कुरंगीबद्दल प्रेम आहे किंवा नाही याची त्यांना इतका वेळ खात्री नव्हती. आता ती खात्री पटली आणि त्यांचे काम अधिक सुकर झाले.

धात्रीने परत एकदा विचारले, " आपले ठीक आहे ना ? " अविमारकाने चमकून पाहिले. समोर धात्री आणि नलिनिका उभ्या होत्या. आपले स्वगत यांनी ऐकले तर नसेल ना, अशा चिंतेने तो गडबडून गेला. " कसला विचार चालला आहे ? " धात्रीने विचारले. " शास्त्राचा " अविमारकाने खोटेच सांगितले. धात्रीने विचारले, " एकान्तात चिंतन करण्याजोगे असे कोणते रमणीय शास्त्र आहे ? " अविमारकाने उत्तर दिले, " योगशास्त्र." योगशब्दातील श्लेषार्थ लक्षात घेऊन धात्री म्हणाली, " योगशास्त्रच असू दे." अविमारकाला " आपले गुपित यांना कळले असावे अशी भीती वाटू लागली. त्याने चटदिशी विचारले, " तुम्हांला काय म्हणायचे आहे ? " धात्रीने उत्तर दिले, " आम्ही योगाच्या इच्छेनेच तुमच्याकडे आलो आहोत. तुम्हांला योग पसंत आहे असे दिसते. तेव्हा राजवाड्यातल्या एकांतात अगदी एकनिष्ठपणे योग चालविता येईल. तेथे आणखी कोणीतरी याहून अधिक योगचिंतनात दंग झाले आहे, त्याबरोबरच तुम्ही योगचिंतन करावे."

त्यांच्या या बोलण्यावरून कुरंगीकडून या दासी आल्या असून आपले इच्छितच त्या बोलून दाखवीत आहेत हे त्याच्या लक्षात आले. "माझे भाग्य अजून शिल्लक आहे तर ! " असे म्हणत तो आसनावरून उठला आणि त्यांना म्हणाला, " अहो, माझे प्राणच तुम्ही मला परत दिले. कुरंगीचे भयचकित दृष्टीच्या विषाने युक्त असे सुंदर, कोमल पण तितकेच कठोर मुख पाहून मला मूर्च्छा आली होती. तिच्यातून तुमच्या या वाक्यामृताने मी आज जागा झालो आहे."

" आजच तुम्ही कन्यान्तःपुरात प्रवेश करावा " असे सांगून धात्री पुढे म्हणाली

" कन्यान्तःपुराचे रक्षक अमात्य भूतिक काशिराजाच्या दूताबरोबर त्याच्याकडे गेले आहेत." आपला मार्ग निर्विघ्न आहे हे लक्षात आल्यावर अविमारक म्हणाला, " औषध मिळाल्यानंतर कोणता रोगी दिरंगाई करील ? " त्याने राजवाड्याची अंतःपुराची रचना समजावून घेतली आणि सर्व दारांचे अडसर रात्री काढून ठेवायला त्यांना सांगितले.

अविमारकाचा निरोप घेऊन त्या दोघीजणी गेल्या. एवढ्यात त्याला शोधीत विदूषक तिथे आला. धात्री आणि नलिनिका अविमारकाकडे येऊन गेल्या असे त्याने ऐकले होते. त्यांचे त्याच्याकडे काय काम असावे असा विचार करीत तो अविमारकापाशी आला. प्रेमविव्हल अविमारक पांडुरका पडला आहे हे त्याला जाणवले. " पण तो सुंदर असल्यामुळे तो फिक्कटपणाही त्याला शोभतो आहे " असे पुटपुटत अविमारकाजवळ विदूषक आला. अविमारकाने त्याला उशिराचे कारण विचारताच संतुष्ट उत्तरला, " तू आपला खोटे आमंत्रण देऊन फसविलेल्या ब्राह्मणासारखा अहोरात्र चिंतन करण्यात दंग झाला आहेस. मी बापडा दिवसभर गावात भटकून रात्री भोगसुख न मिळालेल्या सामान्य गणिकेसारखा शेजारी झोपायला येतो. "

त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून अविमारक म्हणाला, " मित्रा, तुला एक आनंदाची वार्ता सांगायची आहे. " " काय, आपला ऋषिशाप संपला की काय ? " संतुष्टाने विचारले. " मूर्खा, निश्चित घडणाऱ्या गोष्टीबद्दल आनंद कसला ? " अविमारक म्हणाला, " कुरंगीची धात्री आणि नलिनिका आल्या होत्या, त्यांनी माझ्या दुःखाचे औषध आणून दिले." विदूषकाने विचारले, " कुठे आहे बघू ? " अविमारक म्हणाला, " बघशील योग्य वेळी. आज नुसतेच ऐक. आज मला कन्यान्तःपुरात प्रवेश करायला सांगितले आहे." विदूषक हसून म्हणाला, " स्वतःच्या जिवाला धोका देण्यासाठी कशाला जातोस ? अरे, कुंतिभोजाचे मंत्री फार वाईट आहेत. " यावर अविमारक उत्तरला, " तुलासुद्धा शंका वाटते ? मी एकट्याने मोठमोठी सैन्ये पराभूत केली. ज्या मी अग्निरूप धारण करून आलेल्या राक्षसालासुद्धा मारले त्या मला माणसांची काय पर्वा ? "

अविमारकाचा पक्का निश्चय झालेला पाहून विदूषक म्हणाला, " मला सोडून नको जाऊस. मीही तुझ्याबरोबर येणार. अरे, वेळप्रसंगी आरडाओरडा करायला तरी दुसरं माणूस पाहिजे." त्याला अडवीत अविमारक म्हणाला, " मित्रा, अरे तुला शास्त्र ठाऊक नाही का ? शास्त्रात असे म्हटले आहे की, परगृही एकट्यानेच जावे, खलबत दोघांनी करावे आणि युद्धभूमीवर पुष्कळांनी जावे. तेव्हा कन्यान्तःपुरात मला एकट्यालाच जायला हवे. माझी मुळीच काळजी करू नकोस. " संतुष्ट म्हणाला, " ठीक तर. रात्र होईपर्यंत गावात माझ्या एका मित्राकडे आपण थांबू या. नंतर तू जा. "

सायंकाळचे आन्हिक आटोपून राजाच्या आज्ञेने शयनगृहात जाऊन तेथून गुप-

अनुक्रमणिका

चूप गावात यायचे अविमारकाने ठरविले. इतक्यात चेटी स्नानाचे पाणी काढल्याची वर्दी देऊन गेली. संध्याकाळ झाली म्हणून दोघेही उठले. सूर्यास्तामुळे आकाशाची शोभा आगळीच दिसत होती. पूर्व दिशा अंधकाराने माखली होती, तर पश्चिम दिशेला संध्येचा रक्तिमा पसरला होता. अशा प्रकारे दोन स्वरूपांत विभागलेले आकाश अर्धनारीनटेश्वराची आठवण करून देत होते.

थोड्याच वेळात अंधार पडला. अविमारकाकडून परतल्यानंतर जरा मोकळा वेळ सापडल्यावर नलिनिका कुरंगीकडे यायला निघाली. परंतु तिच्या आधीच मागधिका येऊन कुरंगीशी बोलत होती. अविमारकाच्या प्रेमाच्या तंद्रीत असल्यामुळे मागधिका म्हणजे नलिनिकाच आहे असे समजून कुरंगीने तिला विचारले, " काय ग, तो काय म्हणाला ? " चेटीने विचारले, " तो कोण ? " आपल्या गुपिताचा आपणच स्फोट करीत आहोत हे लक्षात येताच स्वतःला सावरीत कुरंगी म्हणाली, " कन्यान्तःपुरातला चेट ". मागधिकेच्या काही लक्षात येईना. ती म्हणाली, " चेट मला भेटला होता, पण काही बोलला नाही. " कुरंगी त्यावर म्हणाली, " आता राणीसाहेबांना सांगते की, हा कन्यान्तःपुराला चेट मला पोपटाचा पिंजरा करून देत नाही म्हणून. "

वेळ मारून नेण्यासाठी कुरंगीने पोपटाच्या पिंजऱ्याची सबब काढली. पण चेटाने तो पिंजरा तिला केव्हाच दिला होता. चेटीने तिला तसे सांगताच आपले बोलणे आपल्या अंगाशी आलेले पाहताच वैतागून कुरंगी म्हणाली, " अग बडबडे, आणखी एक पिंजरा आहे का ? "

रात्रीची वेळ झाली म्हणून कुरंगीने वर प्रासदात जायची इच्छा व्यक्त केली. इतक्यात विलासिनी आली. मागधिकेने तिला पुढे जाऊन अंथरूण घालण्यास सांगितले. विलासिनीने " केव्हाच घालून ठेवली आहेत " असे सांगितले. " तू इतकी आळशी आहेस की, सकाळची अंथरुणे तशीच ठेवली असशील " असे म्हणत ते पाहण्यासाठी कुरंगीला घेऊन मागधिका प्रासादात आली. शिलापट्टकावर बाहेरच बिछाना पाहून प्रथम मागधिकेला वाटले हेच विलासिनीने घातलेले अंथरूण असावे. नंतर मात्र आता गेल्यावर व्यवस्थित बिछाना पसरलेला पाहून थट्टेच्या सुरात मागधिका विलासिनीला म्हणाली, " तू फारच हुशार झाली आहेस. असाच हुशार चेट तुला नवरा मिळो. " त्यांच्या या गप्पा चालू असताना कंटाळलेली कुरंगी शिलापट्टकावर बसली.

नलिनिकेकडून अविमारकाबद्दल काहीच वार्ता न आल्यामुळे ती उद्विग्न झाली होती. तिला खूष करण्यासाठी मागधिकेने एक सुंदर गोष्ट सांगण्याची तोड काढली. कुरंगीला कशातच गोडी वाटेना. तिने मागधिकेला म्हटले , " मला नको तुझी गोष्ट. क्षणभर झोपू दे इथेच. " असे म्हणून शिलपट्टकावरच्या बिछान्यावर कुरंगी लवंडली. विलासिनीने मागधिकेला ती नवीन गोष्ट सांगायला सांगितले. कुरंगी झोपेत ऐकत होतीच. त्यांच्या दोघींच्या त्या गप्पांवरून काशिराजाच्या मुलाला जयवर्म्याला कुरंगी

द्यायचे राजाने ठरवले असल्याचे कुरंगीला कळले. " छे छे, हे खोटे आहे. माझी मी समर्थ आहे निर्णय घ्यायला ! " कुरंगी मनाशी पुटपुटली. नागधिकेच्या सांगण्या-वरून आपली मुलगी लहान आहे म्हणून जावयालाच इकडे आणावे असे राणीने सांगितले आणि त्यानुसार शुभ मुहूर्त पाहून जावयाला आणण्यासाठी अमात्य भूतिक दूताबरोबर गेला हेही कुरंगीला कळले.

आजचे मरण उद्यावर गेले असा विचार कुरंगीने स्वतःशी केला आणि आपल्या अवस्थेचा विचार ती करू लागली. आपल्याला काहीतरी होत आहे, भूक लागत नाही, अलंकार घालावेसे वाटत नाहीत, काहीतरी गोड दुःख मनाला होत आहे, याची जाणीव तिला झाली होती; आणि त्या तंद्रीत ती एकदम म्हणाली, " नलिनिके, काय ग हे ?" नलिनिका जिना चढत होती. कुरंगीजवळ उभी असलेली विलासिनी लगेच म्हणाली, " मी विलासिनी आहे, नलिनिका नाही." इतक्यात नलिनिका तिथे आली कुरंगीच्या मनाचा गोंधळ तिच्या लक्षात आला आणि तिला सावरण्यासाठी ती म्हणाली, "माझ्या पावलांचा आवाज जिना चढताना बाईसाहेबांनी ऐकला म्हणून त्या ' नलिनिके ' म्हणाल्या."

चौघींच्या इकडच्या तिकडच्या गप्पा मारून झाल्या आणि चांदणे पडल्यानंतर विलासिनी आणि मागधिका चौसोपीत बसण्यासाठी निघून गेल्या. कुरंगीजवळ नलि-निका बसली. अविमारकाच्या आगमनाच्या बातमीने कुरंगीला जरा धीर आला होता. म्हणून शिलापट्टकावर पडल्यापडल्या तिचा डोळा लागला. तिचे अंग चेपत नलिनिका तिच्याजवळ बसली.

रात्र बरीच झाली होती. अशा वेळी चोराचा पोशाख करून हातात खड्ग आणि दोरी घेऊन अविमारक प्रासादापाशी आला. निःस्तब्ध रात्रीची भयानकता त्याला जाणवत होती. रस्ते म्हणजे जणू अंधार वाहून नेणाऱ्या नद्याच वाटत होत्या आणि इमारतींच्या रांगा त्याच्या काठची वाळवंटे वाटत होती. दशदिशांत पसरलेल्या या अंधकारात आपण पोहत आहोत असे अविमारकाला वाटत होते. एका खिडकीतून त्याला वीणासंगीत ऐकू आले. एका स्त्रीच्या गाण्याला वीणेचे झंकार साथ देत होते.

इतक्यात दुसऱ्या एका घरात एका रडणाऱ्या स्त्रीची समजावणी करणाऱ्या पतीचा आवाज त्याने ऐकला. इतक्यात घुबडाने चीत्कार केला आणि त्या मानिनीने घाबरून पतीला आलिंगन दिले. प्रेमपीडित होऊन बडबडत चाललेला एक युवक त्याला दिसला. अविमारक थोडा पुढे आला आणि त्याला प्रकाश दिसला. प्रथम त्याला वाटले चांदणेच पडले आहे आणि नंतर खिडक्यांतून बाहेर पडणाऱ्या दिव्यांचा प्रकाश त्याच्या लक्षात आला. आपल्याला कुणी पाहू नये म्हणून प्रकाश टाळून तो पुढे सरकला, तोच त्याला एक चोर दिसला.

तो पावलांचा आवाज न करता प्रकाश टाळीत येत होता. त्याच्या तावडीत

सापडू नये म्हणून अविमारक एका कोपऱ्यात अंग चोरून उभा राहिला आणि चोर पुढे निघून जाताच बाहेर आला. जरा पुढे जाताच राजवाड्याचे राखणदार त्याला दिसले. त्यांना टाळण्यासाठी तो विटसभेत शिरला. तिथून त्याने प्रासादाचे निरीक्षण केले. तो चांगलाच उंच होता. माणसाच्या सामर्थ्याची सत्त्वपरीक्षा त्यावर चढण्याने झाली असती. अविमारकाने जवळच्या दोरीचा फास वर फेकून एका कपिशीर्षाला –दगडाला–घट्ट अडकवला. पहिल्याच प्रयत्नात दोरी घट्ट बसलेली पाहून आपल्या कार्यातील यशस्वितेची त्याला खात्री पटली. दोरीवरून चढून तो राजवाड्यात उतरला. विविध विभागांनी नटलेला तो प्रासाद खूपच उंच होता. जणू पृथ्वीवरून आकाशाकडे तो धाव घेत होता. दोरीच्या साहाय्याने तो खाली उतरला. दोरी हत्तीशाळेत फेकून दिली. हत्तींच्या मदाचा उग्र गंध त्याला येत होता. वीणावादनाचा आवाज त्याला ऐकू आला आणि दिव्यांच्या प्रकाशात इकडेतिकडे फिरणारे राखणदार दिसले.

थोड्याच वेळात सारे शांत झाले. नलिनिकेने सांगितलेल्या खुणांप्रमाणे दारुपर्वत, उपस्थानसभा ओलांडून तो पुढे आला आणि त्याला कन्यान्तःपुराची इमारत दिसली. त्यावर जाळ्यांचे नक्षीकाम होते आणि त्याच्या रचनेत लाकडाचा उपयोग पुष्कळ ठिकाणी केलेला दिसत होता. त्यामुळे तो चढून जाणे अविमारकाला सोपे वाटले. ती अवघड असला तरी प्रियेच्या इतक्या जवळ आल्यानंतर तसेच निघून जाणे म्हणजे कमलनालावरच्या काट्यांना भिऊन तहानेल्याने पुष्करिणीपासून पाणी न पिताच निघून जाण्यासारखे आहे असा विचार करून अविमारक प्रासादावर चढला.

दासींनी सांगितलेल्या खुणांनुसार त्याला एक पुष्करिणी दिसली. रत्नखचित शिलातलांवर हंस झोपले होते. पाचू आणि मोत्यांच्या वेली तयार केलेल्या होत्या, आणि प्रवाळांचे स्तंभ उभे होते. रत्नांच्या तेजाने दिव्यांचे तेज फिके पडले होते. या वैभवाच्या योगाने या प्रासादाने स्वर्गसुद्धा खाली आणला आहे असे अविमारकाला वाटले. कारंजे ओलांडून तो पुढे येताच शिलापट्टकावर झोपलेली कुरंगी आणि तिच्याजवळ बसलेली नलिनिका त्याला दिसली.

चोराचा वेष फेकून देऊन आणि चांगला वेष परिधान करून अविमारक नलिनिकेजवळ आला. निजलेल्या कुरंगीकडे तो अनिमेष डोळ्यांनी पाहात होता. नलिनिकेने त्याला बसायला सांगितले. नलिनिकेने कुरंगीला उठवू का म्हणून विचारताच तो म्हणाला, " नको नको, मला दोनच डोळे आहेत. मी सहस्रनेत्र नाही. आणि चिरकाल ही अभिलाषा मनात धरल्यामुळे आज माझी दिङ्मूढ अवस्था झाली आहे. तेव्हा प्रथम माझ्या नेत्रांना मदनाचे यथेच्छ सुख उपभोगू दे. " त्यांच्या कुजबुजीने कुरंगीला जाग आली. तरी ती डोळे मिटून तशीच पडून राहिली. तिने नलिनिकेला विचारले, " तो कठोर माणूस काय म्हणाला ग ? " कुरंगी भ्रमात होती आणि तो भ्रम आपल्याविषयीचा आहे हे कळताच अविमारकाला परमानंद झाला. अर्धी रात्र टळून गेल्याचे

नलिनिकेने कुरंगीला सांगताच कुरंगी म्हणाली, " खूप वेळ बसलीस. दमली असशील. ये, मला आलिंगन दे. " नलिनिकेने अविमारकाला खूण करून पुढे व्हायला सांगितले आणि ती स्वतः कुरंगीचे पाय चेपू लागली. डोळे मिटलेल्या कुरंगीने नलिनिका समजून अविमारकाला आलिंगन दिले.

नलिनिका तिचे पाय चेपतच होती. " नलिनिकेने तर आपल्याला आलिंगन दिले आहे. मग आपले पाय कोण चेपत आहे ? " असा प्रश्न पडून कुरंगी उठली आणि तिने स्वतःला अविमारकाच्या बाहुपाशात पाहिले. ती घाबरून दूर झाली. शीलभ्रष्टतेचे भय तिला वाटू लागले. अविमारक तिच्या पायांशी बसून म्हणाला, " प्रिये, माझ्या मनात सतत तुझा वास असल्यामुळे आज तू मला नवीन नाहीस. वाऱ्याने हलणाऱ्या लतेप्रमाणे का थरथर कापतेस ? भीती सोडून दे आणि मजवर कृपा कर. मी तुझ्या पायांशी आसरा घ्यायला आलो आहे. " नलिनिकेने त्याला उठायला सांगितले. इतक्यात धात्री तेथे आली आणि " आत बिछाना घालून ठेवला आहे " असे म्हणाली. कुरंगीला आपल्या हातांनी उठवीत अविमारकाने तिच्याबरोबर आतील महालात प्रवेश केला.

अविमारक आणि कुरंगी यांची ही चोरटी रतिक्रीडा सुरू होऊन वर्ष झाले. वर्षभर अविच्छिन्नपणे दोघांनी सुखोपभोग घेतला. परंतु एक दिवस ही गोष्ट राजाला समजली. तथापि सुदैवाने अविमारक राजवाड्यातून निर्विघ्नपणे बाहेर पडला. अविमारक निघून गेला आणि काशिराजाच्या मुलाला जयवर्म्याला घेऊन भूतिकामात्य परत आला. कुरंगीच्या विवाहाची तयारी सुरू झाली.

राजवाड्यातून बाहेर पडल्यानंतर घरी न जाता अविमारक दूर निघून गेला. शरीराने दूर असला तरी त्याचे मन कुरंगीकडेच धाव घेत होते. आता तिची काय अवस्था झाली असेल ? कोणालाही तोंड दाखवायची तिला लाज वाटत असेल, राजाने तिला कदाचित बंदिवासात टाकले असेल, रात्रीच्या वेळी मी दिसलो नाही म्हणजे ती वेशुद्ध पडेल, अशा शंका त्याच्या मनात येत होत्या. काय करावे याचा त्याला मोठा प्रश्न पडला. " तिने कशाचाही विचार न करता आपले जीवित मला अर्पण केले तेव्हा मीही तिच्यासाठी आता आत्मत्याग करणेच योग्य आहे " असे ठरवून तो प्राणघाताला प्रवृत्त झाला. अरण्यात भटकत असताना त्याने एके ठिकाणी वणवा पाहिला आणि अग्नीला वंदन करून त्याने स्वतःचे शरीर त्यात झोकून दिले.

परंतु अग्नीत प्रवेश केल्यानंतरही त्याला अग्नीने जाळले नाही. उलट चन्दना-प्रमाणे शीतल असा ज्वालांचा स्पर्श त्याला झाला. ' हा अग्नी मला पित्याप्रमाणे पुत्र समजून आलिंगन का बरे देतो आहे ? ' असे म्हणत तो अग्नीतून बाहेर आला. अग्नी जाळत नाही तेव्हा आत्मघाताचा दुसरा उपाय शोधून काढला पाहिजे असा विचार करीत अविमारक पर्वतावर हिंडू लागला. पर्वताच्या एका उंच शिखराने त्याचे लक्ष वेधून घेतले. त्या शिखरावरून खाली उडी टाकण्याचा विचार करून त्यापूर्वी स्नान करण्याच्या इराद्याने तो पाण्याजवळ गेला. स्नान करून तो जपाला बसला.

त्याच वेळी एक विद्याधराचे जोडपे क्रीडा करीत तेथे आले. त्या पर्वताच्या उंच शिखरावरून हवेतून जाताना पृथ्वीचे विलोभनीय दृश्य विद्याधर आपल्या प्रियेला दाखवीत होता. मोठमोठे पर्वत हत्तीच्या छाव्यांप्रमाणे भासत होते. समुद्र छोटी छोटी तळी वाटत होते. वृक्ष शेवाळ्यासारखे दिसत होते आणि नद्या भांगाप्रमाणे भासत होत्या. त्यांना प्रासाद ठिपक्यांएवढे दिसत होते. मलयपर्वतावर जायचा त्यांचा विचार होता. परंतु सौदामिनी–विद्याधरपत्नी–दमली होती म्हणून ते दोघेही एका पर्वताच्या शिखरावर उतरले. फुले गोळा करत असतानाच त्यांना तिथे जप करण्यात मग्न झालेला अविमारक दिसला.

त्याच्या अप्रतिम सौंदर्यावरून तो मन्त्रभ्रष्ट विद्याधर असावा असे त्यांना वाटले. जप संपताच अविमारकाने शिखरावरून उडी मारली. तेवढ्यात विद्याधराने त्याला अलगद झेलले. हा कोण असावा? असा विचार अविमारक करू लागला. त्याला वाटले, मृत्यू जवळ आला म्हणजे माणसाला असेच कोणी कोणी दिसतात, तशापैकीच हा दृष्टिभ्रम असेल. परंतु आपण शुद्धीवर आहोत त्यामुळे आपल्याला असा दृष्टिभ्रम होण्याची शक्यता नाही, तेव्हा हा खरोखरच कोणीतरी पुरुष असावा असा विचार करून अविमारकाने त्याला ' तू कोण? ' म्हणून विचारले. विद्याधराने आपली सर्व माहिती सांगून अविमारकाला त्याची माहिती विचारली. अन्तकाळी खोटे बोलू नये म्हणून ' मी सौवीरराजपुत्र अविमारक आहे ' असे त्याने सांगितले. विद्याधराने त्याला त्या पर्वतावर एकटाच येण्याचे प्रयोजन विचारताच काय उत्तर द्यावे याची अविमारकाला पंचाईत पडली. काही न बोलता तो खाली मान घालून बसून राहिला.

आपल्या सिद्धविद्येच्या योगाने चिंतन करून विद्याधराने अविमारकासंबंधी सर्व ज्ञान मिळविले. हा अग्निपुत्र असून कुरंगीच्या प्रेमात पडला आहे. तेथून तो आत्महत्येसाठी येथे आला आहे. हे सर्व ओळखून त्याच्या या कार्यात साहाय्य करण्यासाठी तो अविमारकाला म्हणाला, " आजपासून आपण मित्र बनलो आहोत. " असे म्हणून आपल्याजवळची अंगठी अविमारकाला देत विद्याधर म्हणाला, " हिच्या योगाने अदृश्य बनून तू अन्तःपुरात प्रवेश कर. उजव्या बोटात घातल्यावर तू अदृश्य होशील आणि डाव्या बोटात घालताच परत दृश्य बनशील. " स्वतः त्या अंगठीचा प्रभाव दाखवून विद्याधराने अविमारकाची खात्री पटविली.

अविमारकाने त्याजवळ कृतज्ञता व्यक्त करताच विद्याधर म्हणाला, " एखादे रत्न मिळाल्यानंतर सज्जनाला जितका आनंद होतो, त्याहूनही अधिक आनंद ते सत्पात्री दान केल्यानंतर होतो. म्हणून खरोखर मीच तुझा आभारी आहे. " विजेप्रमाणे झळाळणारे खड्गही विद्याधराने त्याला दिले, परंतु अंगठीने कार्यभाग सिद्धीस जाईल या विचाराने अविमारकाने ते विद्याधराला परत दिले, अविमारकाच्या व्यक्तिमत्त्वामुळे विद्याधर भारावून गेला होता. त्याला आपली आठवण ठेवावयास सांगून आणि पुन्हा

अडचणीच्या वेळी मदत करण्याचे आश्वासन देऊन विद्याधर पत्नीसमवेत निघून गेला. अंगठी घेऊन अविमारक पर्वतावरून खाली उतरला.

अविमारकाच्या अचानक निघून जाण्याने त्याचे आईवडील दुःखी झाले होते. विदूषक त्याला शोधत वणवण हिंडत होता. हिंडून हिंडून दमल्यानंतर विश्रांती घेण्यासाठी विदूषक त्याच पर्वताच्या पायथ्याशी असलेल्या एका झाडाखाली निजला. अविमारक संतुष्टाचाच विचार करीत पर्वतावरून खाली उतरला आणि झाडाच्या सावलीत कोण झोपले आहे हे पाहण्यासाठी तिथे आला. एवढ्यात विदूषक जागा झाला आणि दोन चिरविरही मित्रांचे मीलन झाले. अंगठीचा प्रभाव अविमारकाने विदूषकाला दाखविला आणि तिच्या योगाने आपण प्रासादात कन्यान्तःपुरात प्रवेश करणार आहोत असे त्याला सांगितले. ती अंगठी घालणाऱ्याचा हात धरणाराही अदृश्य होतो असे विद्याधराने अविमारकाला सांगितले होते. म्हणून विदूषकालाही अदृश्य करून आपल्याबरोबर न्यायचे अविमारकाने ठरविले आणि विदूषकाला आपला हात धरण्यास सांगितले. हात धरताच विदूषकही अदृश्य झाला. त्याला या अदृश्य होण्याची मोठी गंमत वाटली. "मला शरीर आहे की नाही हे थुंकी लावून पाहतो" असे म्हणून विदूषक हात सोडू लागला. अविमारकाने त्याची खूप मनधरणी करून, 'उशीर करू नको' असे त्याला सांगितल्यानंतर तो सरळपणे अविमारकाबरोबर नगरीत आला. दोघांनीही अदृश्यरूपात राजवाड्यात प्रवेश केला.

इकडे अविमारक गेल्यापासून कुरंगी परत झुरणीला लागली होती. तिच्या रोगाचे कारण नलिनिकेखेरीज कोणत्याच दासीला ठाऊक नव्हते. त्यांनी अनेक प्रकारचे शीतल उपचार सुरू केले होते. तिच्यासाठी निरनिराळी मनोविनोदने आणून ठेवली होती. या साऱ्याला ती कंटाळली होती. क्षणभर गच्चीवर जाऊन हे सारे टाळावे या उद्देशाने ती नलिनिकेला घेऊन गच्चीवर आली. आकाशात ढग जमलेले पाहताच तिच्या विरहवेदना अधिकच तीव्र झाल्या.

अविमारक आणि विदूषक अदृश्यरूपाने तिथे आले. अविमारकाच्या विरहाने कृश झालेली कुरंगी अविमारकाला अधिकच सुंदर दिसत होती. तिने मागधिकेला उपस्नानाचे साहित्य घेऊन येण्यास सांगण्यासाठी नलिनिकेला पाठविले. तेवढ्यात हरिणिका राणीने दिलेले औषध घेऊन आली. 'त्याने शीर्षवेदना लगेच थांबेल' असे तिने म्हणताच "आज तिला बरे आहे असे राणीसाहेबांना सांग" असे सांगून कुरंगीने हरिणिकेला निरोप दिला. प्रासादाच्या गच्चीवर गळफास लावून आत्महत्या करण्याचा निर्णय कुरंगीने घेतला होता. मृत्यूपूर्वी प्रियसखीला शेवटचे भेटावे म्हणून कुरंगीने नलिनिकेला गाढ आलिंगन दिले. अविमारकाला तिच्या कृतीचा काहीच अर्थ कळेना. नलिनिकेला स्नानाचे साहित्य घेऊन येण्यासाठी कुरंगीने खाली पाठविले. तिचा खालीवर होणारा श्वास, बावरून इकडे तिकडे पाहणारी नजर, डोळ्यांतले पाणी हे सारे पाहून ती काय करणार आहे हे अविमारकाला उमगेना.

अनुक्रमणिका

एवढ्यात आपले उत्तरीय गळ्याभोवती गुंडाळून ती ते आवळू लागली. तोच अंगठी डाव्या बोटात सरकवून अविमारक दृश्य झाला. पुढे होऊन त्याने तिला उठविले. त्याला पाहताच ती चकित झाली. आपण स्वप्नात तर नाही ना असे तिला वाटू लागले. " हे सारे सत्य आहे " असे सांगून अविमारकाने तिला आलिंगन दिले.

स्नानाचे साहित्य घेऊन नलिनिका वर आली. परंतु तिला दार बंद दिसले. हरिणिकेने दार बंद केले असावे असे वाटून तिने हरिणिकेच्या नावाने हाका मारायला सुरुवात केली. विदूषकाने दार उघडले. त्याला तिथे अनपेक्षितपणे पाहून नलिनिका आश्चर्यचकित झाली. " अग बाई, हा कोण पुरुष ? " असे ती उद्गारली. ते ऐकताच आपला विदूषकीपणा व्यक्त करीत विदूषक म्हणाला, " चांगलं ओळखलंस मला. काय हे राजवाड्यातले लोक ! दुसरा कोण बरे मला पुरुष म्हणेल. अग मी स्त्री आहे. "

त्याच्या उत्तराने नलिनिका भांबावून गेली. इतक्यात तिला अविमारक दिसला. त्याला वंदन करून तिने विचारले, " हा माणूस कोण ? "

" अग, मी पुष्करिणी नावाची चेटी आहे ! " विदूषक उत्तरला. " ह्या ब्राह्मणाला मी यापूर्वी बाजारात पाहिले आहे " असे नलिनिका म्हणताच विदूषक तिला म्हणाला, " बरोबर आहे तुझे. यज्ञोपवीत आहे म्हणून मी ब्राह्मण, वल्कल नेसले तर संन्यासी होईन आणि वस्त्र सोडल्यानंतर श्रमणक बनेन. " त्याची बडबड थांबवीत नलिनिकेने अविमारकाला विचारले, " दिवसाढवळ्या अनेक राजपुरुष हिंडत असतानाही तुम्ही येथे कसे येऊ शकलात ? "

" सारे काही संतुष्ट सांगेल. " अविमारकाच्या या शब्दातली सूचना नलिनिकेच्या ध्यानात आली. संतुष्टाला घेऊन तेथून जाण्याची ती सूचना होती. म्हणून ती संतुष्टाचा हात धरून त्याला ओढीत म्हणाली, " चल रे ब्राह्मणा." " जेवायला देणार असलीस तर येतो " असे विदूषकाने म्हटल्यानंतर त्याला ती म्हणाली, " सगळे अलंकार देईन पण चल. "

" तुपाचे नुसते नाव घेऊन पित्त शांत होत नाही. नुसते ' देईन ' म्हणून काय उपयोग ? माझ्या हातात ठेव आधी ते दागिने " विदूषक म्हणाला.

तिने दागिने काढून दिले तरी विदूषक तिथून हालेना. ' कुरंगीचा निरोप घेऊन येतो ' अशा सबबी सांगू लागला. शेवटी नलिनिका त्याला ओढत घेऊन जाऊ लागली. त्यावर विदूषक म्हणाला, " अग, ओढू नकोस. मी किती नाजूक आहे ! " नलिनिका म्हणाली, " मला माहीत आहे तुझा कोमलपणा. चल लवकर. " असे म्हणत फरपटत ओढत ती त्याला घेऊन गेली.

वर्षाऋतूतले पहिले मेघ आकाशात जमले होते. त्यांचे सौंदर्य अविमारक कुरंगीला दाखवीत होता. एवढ्यात धारा कोसळू लागल्या. त्या पाहून अविमारक म्हणाला, " आकाशाच्या सागरावरच्या या मेघरूपी लाटा गर्जना करीत आहेत. मेघांतून धारांचे

अंकूरच जणू बाहेर पडत आहेत आणि राक्षसीच्या वक्र भुवईप्रमाणे विजा चमकत आहेत. यौवनाचा उपभोग घेण्याचा हा काल प्राप्त झाला आहे." मुसळधार पाऊस सुरू होताच दोघेही आतील महालात गेले.

अविमारकाशी अशा प्रकारे पुनर्मीलन होऊन कुरंगी आनंदात काळ कंठू लागली. एवढ्यात काशिराजाचा मुलगा जयवर्मा याला घेऊन अमात्य भूतिक नगरात आला. राजाने त्याच्याशी कुरंगीचा विवाह लावायचे ठरविले होते. कुरंगीच्या आईने याला जरी मान्यता दिली असली तरी प्रथमपासूनच आपल्या भावाच्या सौवीरराजाच्या मुलाकडे तिचा ओढा होता. जयवर्मा आल्यानंतर तिच्या मनाने परत एकदा उचल खाल्ली आणि "सौवीरराजपुत्राची वार्ता काय आहे ते कळेपर्यंत कुरंगीचा जयवर्म्याशी विवाह लावायचा नाही" असा हट्ट राजापाशी धरला. लग्न अगदी जवळ येऊन ठेपल्यानंतर त्यात अडथळा आणणारा हा हट्ट ऐकून राजा अधिकच रागावला.

या साऱ्या विचित्र घटनांमुळे कुरंगीच्या दासींना तिच्या विवाहाची चिन्ता लागून राहिली होती. इतक्यात नलिनिकेने येऊन सांगितले, "आज सौवीरराजाच्या अमात्यांकडून एक दूत आला होता. त्याने महाराजांना सांगितले की, 'सौवीरराजा सकुटुंब याच नगरीत प्रच्छन्नपणे राहात आहे.' आणि हे ऐकताच आर्यभूतिकाबरोबर महाराज त्याच्या शोधासाठी गेले आहेत." या बातमीने साऱ्यांनाच धीर आला आणि राणीला ही बातमी सांगण्यासाठी त्या निघून गेल्या.

सौवीरराजाचा एक वर्षाचा अज्ञातवास संपला होता. त्याच्या शोधात निघालेल्या कुंतिभोजाला तो भेटला. ते दोघे बालपणापासूनचे मित्र होते. खूप दिवसांनी भेट झाल्यामुळे त्यांना खूप आनंद झाला होता. दोघांनी एकमेकांना आलिंगन दिले. सौवीरराजाच्या मुखावर चिन्तेची छटा, सद्गदित वाणी आणि डोळ्यांत पाणी पाहून कुंतिभोजाने विचारले, "या आनंदाच्या प्रसंगी तुला कसले दुःख होत आहे?" सौवीरराजा उत्तरला,

"माझ्या हृदयात पुत्राविषयीचा असलेला शोक आज तू भेटताच अश्रुरूपाने निघून जात आहे." कुंतिभोजाला काहीच उलगडा होईना. एवढ्यात भूतिकाने "सौवीरराजपुत्र अविमारक बऱ्याच दिवसांपासून घरातून नाहीसा झाला आहे" असे त्याला सांगितले. पुत्रशोकाने सौवीरराजाची झालेली विव्हल अवस्था पाहून विषयान्तर करण्यासाठी भूतिकाने विचारले, "हे अज्ञातवासाचे संकट तुमच्यावर कसे आले?" सौवीरराजाने सारी हकीगत सांगितली.

"मी एकदा मृगया करीत असताना,चण्डभार्गव नावाचा अत्यंत कोपिष्ठ ऋषी तेथे आला. त्याच्या शिष्याला वाघाने मारले होते. परंतु याची ऋषीला काहीच कल्पना नव्हती. मी दिसताच त्याने क्रोधाविष्ट होऊन कडक शब्दांत माझी निर्भर्त्सना करायला सुरुवात केली. माझा निष्कारण होत असलेला अवमान मला असह्य झाला आणि मी

त्या ऋषीला म्हणाले, ' काय घडले ते काही न सांगताच रागावून निर्दोष अशा माझी निर्भर्त्सना करणारा तू ब्रह्मर्षी नाहीस. ब्रह्मर्षीच्या रूपातला चांडाल आहेस.' माझ्या या बोलण्याने त्याचा राग आणखीनच वाढला आणि ' मला चांडाल म्हणणारा तूच चांडाल होशील ' असा शाप त्याने मला दिला. शेवटी मी त्याची बरीच मनधरणी केल्यानंतर ' एक वर्षभर चांडाल वेषात प्रच्छन्नपणे राहिल्यानंतर तू शापमुक्त होशील ' असा उःशाप देऊन तपःसामर्थ्याने शिष्याला जिवंत करून तो निघून गेला. आज माझ्या शापाला वर्ष पूर्ण झाल्यामुळे मी शापमुक्त झालो आहे. "

हे सर्व निवेदन ऐकल्यानंतर कुंतिभोज सुन्न झाला. तथापि आपत्ती टळल्याचा त्याला आनंद झाला. सौवीरराजाच्या मुलाचे नाव विष्णुसेन होते असे कुंतिभोजाला आठवत होते. ' अविमारक नाव कसे पडले ? ' असे त्याने विचारताच भूतिकाने " शैशवात असतानाच बोकडाचे रूप घेऊन आलेल्या एका भयंकर राक्षसाला याने ठार मारले; तेव्हापासून याला सारे अविमारक म्हणू लागले " असे सांगितले.

अविमारक कुठे गेला असावा या चिन्तेत सर्वजण मग्न असतानाच नारदमुनींनी तेथे प्रवेश केला. कुंतिभोजाचा पिता दुर्योधन याने नारदांना चिरकाल संतुष्ट ठेवले होते तेव्हापासून नारदांचा या घराण्याशी संबंध होता. सर्व घटना जाणल्यानंतर कुंतिभोजावर आलेली अडचण दूर सारावी या हेतूने नारद तेथे आले आणि ' तुमची चिंता दूर करण्यासाठी मी आलो आहे ' असे त्यांनी सांगितले. अर्घ्यपूजा वगैरे झाल्यानंतर कुंतिभोजाने अविमारकासंबंधी निवेदन करण्यास नारदांना सांगितले. नारदमुनी म्हणाले, " कुंतिभोजाची मुलगी कुरंगी हिला हत्तीच्या तावडीतून सोडवताना तिच्या अप्रतिम लावण्यावर मोहित होऊन त्याने तिच्यावर प्रेम केले. तीही त्याच्याकडे आकृष्ट झाली. पूर्वीच दैवाने त्यांचा विवाह लावला होता. आता तो सुखोपभोग घेत राजवाड्यातच राहात आहे. " अविमारकाच्या गांधर्वविवाहाची ही वार्ता ऐकल्यानंतर साऱ्यांनाच आश्चर्य वाटले. तो जिवंत आहे या बातमीने सर्वांना आनंद झाला. अविमारक आणि कुरंगीचा शास्त्रविहित विवाहसमारंभ घडवून आणण्याचे कुंतिभोजाने ठरविले.

परंतु एक अडचण मध्ये आली. काशिराजपुत्र जयवर्मा विवाहासाठी येऊन हजर झाला होता. त्याची मागणी मान्य केली होती. त्याचे काय करायचे ? त्याची आई सुदर्शना, कुंतिभोजाची बहीण, हिला कसे समजावयाचे हा प्रश्न कुंतिभोजापुढे उभा राहिला. नारदमुनींनी तोही सोडविला. अविमारक हा सुदर्शनेलाच अग्नीपासून झाला होता. परंतु सौवीरराजाची पत्नी तिची बहीण सुचेतना हिचा मुलगा प्रसवकाळीच मरण पावला म्हणून सुदर्शनेने आपला मुलगा तिला दिला. तोच पुढे सौवीरराजाने आपला पुत्र म्हणून वाढविला असे सांगून अविमारकाच्या आतापर्यंतच्या सर्व हालचालींची माहिती नारदांनी दिली. त्यानंतर कुरंगी जयवर्म्यापेक्षा वयाने मोठी असल्याचे सांगून तिच्या धाकट्या बहिणीचा सुमित्रेचा जयवर्म्याशी विवाह लावा अशी आज्ञा नारदांनी केली.

कुंतिभोजांनी ती मान्य केली. एवढ्यात वरवेष चढवलेला अविमारक, कुरंगी वगैरे तेथे आले. आपल्या कृत्याची लाज अविमारकाला वाटत होती. चारित्र्यभ्रष्टतेचा दोष सर्व आपल्याला लावतील असा विचार करीत तो तेथे आला. सर्वांनीच त्याचे स्वागत केले. नारदांनी त्याला " सपत्नीक अशा तुझे कल्याण असो " असा आशीर्वाद दिला. कुंतिभोजाने " सहनशीलतेने ब्राह्मणश्रेष्ठांना, दयेने आश्रितांना, तत्त्वज्ञानाने आत्म्याला आणि पराक्रमाने राजांना जिंक " असा आशीर्वाद दिला. " मला आनंदित करणारा तूही पुत्रदर्शनाने आनंदित होशील " असा पित्याने–सौवीरराजाने–आशीर्वाद दिला, सुदर्शनाही पुष्कळ काळानंतर पहिल्या मुलाचे मुख पाहायला मिळाल्यामुळे सुखावली. नारदाने विवाहाची तयारी करण्याचा आदेश दिला आणि सर्वत्र आनंदी-आनंद झाला.

## मूळ आधार

सहा अंकांत विभागलेली ही अविमारक नाटकाची कथा नाट्यकथांमध्ये नावीन्य-पूर्ण वाटते. जरी अन्यत्र अनेकवेळा चवळलेला तोच प्रेमरस याही नाटकात ओतला आहे तरी इतर अनेक नवनवीन अद्भुतरम्य प्रसंगांनी तो नटवलेला आहे. या नाटकाचे कथानक त्याच स्वरूपात अन्यत्र कोठेही आढळत नाही. कीथ वगैरे पाश्चात्त्यांच्या मते मात्र भासाने कथासरित्सागरामधून अविमारकाचा कथाभाग उचलला असावा. परंतु कथासरित्सागरातील कथेमध्ये या नाटकाचे फारच थोडे साम्य आढळते. एव्हढी संपूर्ण कथानक भासाने स्वतःच्या प्रतिभेनेच रचले आहे असेच म्हणावे लागेल. एखाद्‌दुसऱ्या प्रसंगाची अन्य वाङ्मयातून उसनवारी केली तरी सर्व संविधानकरचना भासाची स्वयं-निर्मित आहे आणि ती त्याच्या कल्पकतेचे द्योतक आहे.

अपूर्व कथारचनेमुळेच या नाटकाला ' प्रकरण ' म्हणावे लागेल. कथानक सामान्य पात्रांशी सम्बद्ध किंवा सामाजिक नसले तरी स्वतंत्रपणे रचलेले नावीन्यपूर्ण आहे. जातककथांमधील ' एळकमारक ' कथेवरूनही या नाटकाची मध्यवर्ती कल्पना घेतली असावी असे काहींचे मत आहे. या नाटकाचा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रात असल्याचे पहिल्या भागाच्या उपोद्घातात नमूद केले आहे.

## संविधानक रचना

[ अविमारक हे या नाटकाच्या नायकाचे नाव नाटकाला दिले असून नाटकाची सर्व कथा त्याच्याभोवतीच फिरताना दिसते. अविरूपधारी राक्षसाचा त्याने अगदी लहान असताना वध केला म्हणून त्याचे नाव अविमारक पडले. ते नाव त्याचे प्रचण्ड बल दर्शविते. ]

सहा अंकांमध्ये विकसित होणारे हे प्रकरण म्हणजे एका राजपुत्राची आणि राजकन्येची प्रेमकथा आहे. अनपेक्षित घडलेल्या दृष्टिभेटीत ही प्रेमकथा सुरू होते आणि

दोघांच्या मीलनात ती संपते. म्हणून कुरंगी आणि अविमारक यांचा विवाह हे या नाटकाचे अंतिम साध्य आहे असे म्हणता येईल.

पहिल्याच अंकात दोघांच्या दृष्टिभेटीत संविधानकाच्या फळाचे बीजारोपण होते. दुसऱ्या आणि तिसऱ्या अंकांत त्याचा क्रमशः विकास दाखवला आहे. चौथ्या अंकात संघर्षाचा प्रसंग घालून फलप्राप्तीत अडथळा निर्माण केला आहे. पाचव्या अंकात तो अडथळा दूर होऊन फलप्राप्तीच्या आशेचा किरण दिसतो आणि सहाव्या अंकात दैवी साहाय्य मिळून फळप्राप्ती होते. अशा प्रकारे थोडक्यात प्रत्येक अंकाचे स्वरूप दाखविता येईल.

वडिलांच्या अपराधाची शिक्षा भोगणारा अविमारक शापभ्रष्ट अवस्थेत मनाला विरंगुळा वाटावा म्हणून उद्यानात हिंडत होता आणि त्याच वेळी एका सुंदर रमणीवर एक हत्ती चाल करून जाताना त्याने पाहिला. तिला हत्तीच्या तावडीतून त्याने सोडविले. मदोन्मत्त हत्तीला अडवण्याचे सामर्थ्य अग्निपुत्र अविमारकाखेरीज दुसऱ्या कोणाजवळही नव्हते आणि तशा संकटकाळी अविमारक उद्यानात असणे हा केवळ दैवयोगच म्हणायचा. अविमारकाने कुरंगीला वाचवले तेव्हा तिच्या अतुलनीय लावण्यावर तो जसा मोहित झाला, तशीच कुरंगीही त्याच्या सौंदर्यावर आणि पराक्रमावर भाळली. पहिल्या अंकातली ही नायकनायिकांची दृष्टिभेट अशी योगायोगाने घडली आहे. ही दृष्टिभेट प्रत्यक्ष रंगभूमीवर घडवली नसून भासाने एका पात्राच्या निवेदनाद्वारे श्रोत्यांच्या मनश्चक्षूसमोर उभी केली आहे.

उपवर कन्येच्या विवाहाची चिन्ता करणाऱ्या आईवडिलांच्या रमणीय संभाषणाने या पहिल्या अंकाची सुरुवात होते. आपल्या रूपगुणवान मुलीला चांगले स्थळ मिळावे म्हणून विचार करण्यात दंग झालेल्या राजाराणींच्या संभाषणात सर्वसामान्य उपवर मुलीच्या आईवडिलांचे पडसाद ऐकू येतात. इतक्यात त्यांच्या संभाषणाचा ओघ थांबवून अमात्याच्या निवेदनातून कुरंगीवर झालेल्या हत्तीच्या हल्ल्याचे रसभरित वर्णन भास राजाराणींना आणि आपल्याला ऐकवतो.

अविमारकाच्या अद्वितीय रूपगुणांनी कुरंगीच काय पण तिच्याबरोबर तेथे असलेला अमात्यही मोहित झाला. त्याचे गुणवर्णन भूतिकाने राजापुढे करताच ' त्या तरुणाचे लग्न झाले आहे का ? ' असा प्रश्न राजाने विचारणे अगदी साहजिकच वाटते. अशा अलौकिक गुणसंपत्तीने नटलेल्या तरुणाच्या कुलशीलाची माहिती मोठ्या उत्सुकतेने राजाने विचारली आणि इथेच सारे अडले. त्याची चांडालासारखी राहणी पाहून साऱ्यांनाच आश्चर्य वाटले. हीन कुळातला असल्यामुळे आपल्याला हा योग्य असा जावई होणार नाही असा विचार राजाने केला. तथापि " तो चांडाल असणे शक्य नाही, आपले खरे स्वरूप तो लपवीत असला पाहिजे. " हे भूतिकाचे म्हणणे त्यालाही पटले होते. म्हणून त्याच्या कुलशीलाचा अधिक तपास करण्याची आज्ञा त्याने दिली.

तथापि या एका वरावर भिस्त ठेवून भागणार नव्हते. तो खरोखरच चांडाल निघाला तर त्याच्याबद्दलचा विचार सोडून द्यायला हवा होता. शिवाय कुरंगीला अनेक मागण्या आल्या होत्या. त्यांचाही निर्णय करायला हवा होता असा विचार करून राजाने कौंजायन आणि भूतिक या दोघांशी या मागण्यांबाबत सल्लामसलत केली. अनेक ठिकाणच्या मागण्यांमधून एक वर निवडायचा म्हणजे मोठे कठीण काम होते. त्यातल्या त्यात नात्यातला पाहावा असे अमात्यांनी सुचविले. नात्याच्या दृष्टीने जवळचे दोन वर निवडले. दोही राजाच्या दोघेन बहिणींचे दोन मुलगे. त्यांतही एक, राजाच्या बहिणीचा आणि राणीच्या भावाचा मुलगा म्हणून अधिक जवळचा, म्हणून नियोजित वर म्हणून राजाने त्याची निवड केली ती अगदी सयुक्तिक वाटते.

परंतु वरनिश्चिती होऊनही परत अडचण आली. राजाने निवडलेला वर, त्याचे आईवडील सारेच बेपत्ता होते. ते कोठे राहतात, काय करतात यासंबंधी कोणालाच माहिती नव्हती. तेव्हा आता ती माहिती काढण्यासाठी दूत पाठवायला हवेत असा विचार करून राजाने तशी आज्ञा दिली. दोन वर निवडले आणि दोघांतही काहीतरी अडचणी निघाल्या. "कन्या पितुर्हि सततं बहु चिन्तनीयम्" असे कुंतिभोज सुरुवातीलाच म्हणाला होता ते खरे ठरले. पण कन्येच्या पित्याला स्वस्थ बसून चालणार नाही. वरसंशोधन चालूच ठेवले पाहिजे. राजाने पुढे विचार चालू ठेवला. दुसऱ्या बहिणीचा मुलगा जयवर्मा अजून शिल्लक होता आणि त्याच्याकडून नुकतीच मागणी आली होती. अशा परिस्थितीत त्याची मागणी मान्य करावी असा सारासार विचार करून मंत्र्यांनी राजाला सल्ला दिला आणि या वरचर्चेबरोबरच पहिला अंक संपला.

कथानकाच्या मूळ सूत्राच्या विकासाच्या दृष्टीने पहिल्या अंकाच्या या उत्तरार्धात फारच थोडी प्रगती दिसते. कुरंगी आणि अविमारक यांची दृष्टिभेट हा एकच प्रसंग या अंकात कथानकाच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचा म्हणून म्हणता येईल. तथापि राजा आणि अमात्य यांमध्ये झालेल्या या चर्चेला कथाविकासात एक वेगळेच महत्त्व आहे. कथेची पार्श्वभूमी यातूनच आपल्याला कळते. तसेच जयवर्म्याच्या मागणीला मान्यता देण्याच्या रूपाने संघर्षाचे सूक्ष्म बीज येथेच भासाने पेरून ठेवले आहे. कथानकात गतिमानता नसली तरी संभाषणाचा अकृत्रिम ओघ आणि त्याचे सर्वसामान्य स्वरूप यांमुळे पहिला अंक आकर्षक झाला आहे.

दुसऱ्या अंकाची सुरुवात विदूषक आणि चंद्रिका यांच्या विनोदी संभाषणाने होते. अविमारकातील विदूषकाचे पात्र भासाने सर्व संस्कृत नाट्यसृष्टीत अमर करून ठेवले आहे. त्याच्या विनोदी स्वभावचित्राची चुणूक आपल्याला या संभाषणातच दिसते. रामायणाला नाट्यशास्त्र म्हणणारा आणि त्यातले पुरे पाच श्लोक एका वर्षात वाचून संपविणारा विदूषक किती विद्वान असेल याची कल्पनाच करणे चांगले! त्याचा खादाडपणा सगळ्यांना ठाऊक आहे. त्याच्या भाबडेपणाचा फायदा घेऊन चंद्रि-

केने त्याला फसविले आणि तोही तिची खोडी सांगण्यासाठी भाबड्यासारखा अविमारका-कडे निघाला.

दुसऱ्या अंकाच्या मुख्य भागाला अविमारकाच्या स्वगताने सुरुवात झाली आहे. प्रेमाने त्याच्या झालेल्या अवस्थेचे वर्णन विदूषकाने आधी ऐकविलेच आहे. त्याचा प्रत्यय आता अविमारकाला पाहताच येतो. कुरंगीचे सौंदर्य हाच त्याच्या चिन्तनाचा एकमेव विषय झाला. अहोरात्र कुरंगीशिवाय दुसरे काहीही त्याला सुचत नव्हते. तिच्या चिन्तनापासून मनाला परावृत्त करण्याचा त्याने अनेक वेळा प्रयत्न केला. पण 'ओढाळ' मन त्याला दाद देईना. शेवटी "तिचेच चिंतन करावे" असा निर्णय घेऊन तो पुन्हा तिच्या चिंतनात दंग झाला. प्रेमविव्हल झालेला हा दुसऱ्या अंकातील अविमारक शाकुंतलाच्या दुसऱ्या अंकातील दुष्यन्ताची आठवण करून देतो.

अविमारकाप्रमाणेच कुरंगीचीही प्रेमातुर अवस्था झाली आहे याची खबर दुसऱ्या अंकातच मिळते. तिचा आत्यंतिक मनस्ताप, मदनदाह शांत करण्यासाठी तिची अविमारकाशी गाठ घालून देणे हा एकच उपाय आहे असे ओळखून, तिची प्रियसखी नलिनिका आणि धात्री अविमारकाकडे आल्या. तिच्या अप्रतिम लावण्याने तोही तिच्या-साठी झुरत असावा हा त्यांचा तर्क खरा ठरला; आणि मग 'रत्नं समागच्छतु कांचनेन' असा विचार करून त्यांनी अविमारकाला रात्री कन्यान्तःपुरात यायचे निमंत्रण दिले आणि त्यानेही ते मोठ्या आनंदाने स्वीकारले. प्रासादाची रचना नलिनिकेने त्याला समजावून सांगितली. अशा प्रकारे संविधानकविकासातल्या एका महत्त्वाच्या टप्प्याची पूर्वतयारी दुसऱ्या अंकात केली आहे.

आता अविमारकाचा रात्री चोरून प्रवेश आणि कुरंगीशी प्रेमसाधना तिच्या-वर शीलभ्रष्टतेचा आरोप आणतात. तो बालविण्यासाठीच भासाने दैववाणीची योजना दुसऱ्या अंकात केली आहे. अविमारकासारखा पती रूपगुणांनी कुरंगीला अनुरूपच होता. प्रश्न होता तो त्याच्या कुलाचा; आणि जर तो कुलीन असेल तर त्याने केलेला चोरप्रवेश आणि कुरंगीशी लावलेला गांधर्वविवाह दोघांवरही शीलभ्रष्टतेचा आरोप आणू शकणार नाहीत. म्हणून धात्री आणि नलिनिका त्याच्या कुलाबद्दल चर्चा करीत होत्या तोच आकाशवाणीने त्याच्या उच्च कुलाची ग्वाही देऊन इष्ट कार्याच्या तयारीला लागा असा आदेश त्यांना दिला. अशा प्रकारचा प्रसंग भासाने रचला आहे.

दुसऱ्या अंकातच श्रोत्यांना अविमारक हा चांडाल नसून एका शापभ्रष्ट राजाचा मुलगा आहे याची कल्पना येते. त्यामुळे फलप्राप्तीची आशा निर्माण होते. अलौकिक रूपगुणांनी आणि कुलाने परस्परांना अनुरूप असल्यानंतर आणि परस्परांत उत्कट प्रेम असल्यानंतर त्यांनी गांधर्वविवाह करणे अनुचित मुळीच नाही अशी श्रोत्यांची मनो-भूमिका दुसऱ्याच अंकात तयार होते. अविमारकाबरोबर विदूषकही प्रच्छन्नपणे प्रासादात आला असता तर गुपित कदाचित फुटले असते. आणि मीलनापूर्वीच अविमारक आणि

कुरंगीची तारातूट झाली असती. प्रेमाच्या उत्कटतेचा उच्च बिंदू दाखविण्यास त्यामुळे भास असमर्थ झाला असता. म्हणून "परगृही एकस्यानेच प्रवेश करावा" असे शास्त्र-वचन सांगून अविमारकाने विदूषकाला परावृत्त केल्याचा प्रसंग दुसऱ्या अंकाच्या शेवटी रेखाटला आले.

प्रेमसाफल्याचे चित्र रेखाटणाऱ्या तिसऱ्या अंकात प्रेमाने भ्रमिष्ट बनलेली कुरंगी सुरुवातीला दिसते. तो काय म्हणाला? हा प्रश्न ती समोरच्या दासीला विचारते आणि आपले गुपित फुटते आहे याची जाणीव होऊन तिने बोलणे फिरविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी तिची झालेली धांदल फार सुंदर रीतीने भासाने चितारली आहे. त्याचप्रमाणे दोन दासींमधला खेळकर संवाद घालून नैसर्गिक वातावरण निर्माण करण्यात भासाने फारच कौशल्य दाखविले आहे. त्यांच्या संभाषणातून जयवर्म्याला आणायला दूता-बरोबर अमात्यभूतिक गेला होता ही माहिती प्रेक्षकाला मिळते आणि संघर्षाची परत एकदा जाणीव होते. आता कुरंगीचा जयवर्म्याशी विवाह होणार की, अविमारकाशी, या प्रश्नाने उत्सुकता चाळवली जाते. तथापि जयवर्मा यायला बराच अवकाश असल्याने तोपर्यंत कुरंगी आणि अविमारक आपल्या प्रेमात साफल्य मिळवितील असा तर्क मन करू लागते.

आणि या तर्कानुसार तिसऱ्या अंकाच्या उत्तरार्धात रात्रीच्या वेळी चोरवेषात राजवाड्यात प्रवेश करणारा अविमारक दिसतो. राजवाड्यात शिरण्यापूर्वी त्याला दिसणाऱ्या अनेक रात्रिप्रसंगांचे–वीणावादन, प्रियाराधन, चोर, रक्षक वगैरे–वर्णन करून तो प्रवेश भासाने बराच लांबवला आहे. कथाविकासाच्या दृष्टीने निष्प्रयोजन वाटला तरी संस्कृत नाट्यसृष्टीत अनन्यसाधारण असल्यामुळे हा प्रवेश महत्त्वाचा आहे. प्रसंग सारेच नैसर्गिक आणि उत्सुकता वाढविणारे आहेत. अविमारक सुखरूपपणे कन्यान्तःपुरात पोचलेला पाहण्याची प्रेक्षकांची उत्कंठा या प्रवेशात भासाने ताणून धरली आहे.

प्रासादावर दोरखंडाच्या साहाय्याने चढणाऱ्या अविमारकाची तो इष्ट स्थळी पोचेपर्यंतची प्रत्येक हालचाल टिपून भासाने जिवंत चित्र डोळ्यासमोर उभे केले आहे. गच्चीवर येताच चोरवेष टाकून अविमारकाला सभ्यवेष धारण करायला लावण्यात भासाची सूक्ष्म दृष्टी दिसून येते. चोरवेषातच तो त्यांना भेटला असता तर कदाचित त्याला न ओळखून त्यांनी 'चोर चोर' म्हणून आरडाओरडा केला असता आणि सारेच ओम्‌फस् झाले असते. शिवाय प्रियेची पहिली भेट घ्यायची ती काय चोरवेषात? असा विचार करून भासाने त्याला तो वेष उतरायला लावले. पण मुळातच त्याला चोरवेष कशाला घ्यायला लावले? याचे उत्तर असे होऊ शकेल की, एक तर राजवाड्यावर चढणे वगैरे अवघड कामांसाठी चोरवेष केव्हाही सोयीचा होता आणि दुसरे म्हणजे यदाकदाचित सापडला तर त्याला त्याच्या खऱ्या स्वरूपात कोणी ओळखू नये म्हणूनही हा वेष भासाने दिला असावा.

गच्चीवर उतरल्यानंतर मीलनासाठी आतुर असूनही झोपलेल्या प्रियेला उठविण्याचा उतावीळपणा अविमारकाने केला नाही. कारण त्यामुळे झोपेत असताना सखी समजून त्यालाच कुरंगीने दिलेल्या आलिंगनाचे सुख मिळाले नसते आणि भासालाही एका रमणीय प्रसंगयोजनेला मुकावे लागले असते. त्याला आपली सखी समजून आलिंगन देणारी कुरंगी मालतीमाधवातल्या पाचव्या अंकातील मालतीची आठवण करून देते.

तिसऱ्या अंकात अशा प्रकारे दोन प्रेमी जीवांचे मीलन दाखवून कथाविकासातला महत्त्वाचा टप्पा भासाने दाखविला आहे.

कथानकाचे अंतिम साध्य एका अर्थाने येथेच सिद्ध झाले असे म्हणता येईल. दोघांच्या परस्परांवरील प्रेमाची परिणती त्यांच्या मीलनात झाली – गांधर्वविवाहात झाली. परंतु हे चिरमीलन नव्हते. अशी चोरभेट किती दिवस चालणार ? शिवाय या विवाहास त्यांच्या आईवडिलांची आणि इतरांची संमती हवी म्हणून तिसऱ्या अंकातील मीलन हे खऱ्या अर्थाने मीलन नव्हे. त्याला नैतिक आणि शाश्वत स्वरूप येण्यासाठी या मीलनात विघ्न यायला हवे, असा विचार करून भासाने चौथ्या अंकात संघर्षाचा समावेश केला आहे. कुरंगी आणि अविमारक यांच्या मीलनानंतर एक वर्ष झाले. अविच्छिन्न रतिसुख दोघांनी उपभोगले. परंतु हे गुपित केव्हातरी फुटणे अगदी साहजिकच होते आणि त्याप्रमाणे एके दिवशी राजाला ही बातमी लागली.

सुदैवाने अविमारक राजवाड्यातून सुखरूप सुटला. कुरंगी आणि अविमारक यांच्या परस्पर प्रेमात मीलनामुळे उत्कटता आली होती. दोघांना आता एकमेकांशिवाय जीवन असह्य होते. राजवाड्यातून बाहेर पडताच निराशेने झाकळलेल्या अविमारकाला परत घरी जावेसे वाटले नाही. आपल्या विरहाने कुरंगीची काय अवस्था झाली असेल याचा तो विचार करू लागला आणि आपल्यासाठी तिने सर्वांचा त्याग केला, आपल्याला सर्वस्व अर्पण केले, ते जाणवताच आता तिच्याविना जगण्यात काहीच अर्थ नाही अशा विचाराने जीविताचा त्याग करायला तो प्रवृत्त झाला.

चौथ्या अंकात त्याचे आत्महत्येचे दोन्ही प्रयत्न अयशस्वी झालेले दिसतात. पहिला अग्निप्रवेशाचा. अविमारक हा अग्निपुत्र आहे ही त्याच्या तेजस्वितेची गमक घटना प्रेक्षकांना जाणवून देण्यासाठी भासाने हा अग्नीत शिरून आत्महत्येच्या प्रयत्नाचा प्रसंग रचला आहे. दुसऱ्या वेळी पर्वताच्या उंच शिखरावरून उडी मारणाऱ्या नायकाला वाचविण्यासाठी भासाला विद्याधराची मदत घ्यावी लागली. अविमारकाच्या अलौकिक तेजाने आणि सौंदर्याने विद्याधराला हा आपल्यापैकीच एक आहे असे वाटले आणि म्हणून त्याला साहाय्य करण्यासाठी विद्याधर पुढे झाला. त्याने अविमारकाला अदृश्य करणारी अंगठी दिली आणि त्यामुळेच पाचव्या अंकात अविमारकाचे आपल्या प्रियेशी पुनर्मीलन झाले. चौथ्या अंकातील अंगठीच्या प्रसंगाने कथाविकासाला पुन्हा

गती प्राप्त झाली आहे. निराश नायकाला आशेचा नवा मार्ग सापडला आणि फल प्राप्तीच्या दिशेने त्याची वाटचाल सुरू झाली. चौथ्या अंकाच्या शेवटी परत एकदा विदूषकाला रंगभूमीवर आणून वातावरणात हलकेपणा आणण्याचा प्रयत्न भासाने केला आहे.

पाचव्या अंकाच्या सुरुवातीलाच विरहदुःखाने व्याकुळ झालेली नायिका नायकाप्रमाणेच आत्मघाताला प्रवृत्त झालेली दिसते. नायकाइतकीच तिच्या मनातील प्रणयाची उंची दाखविण्यासाठी भासाने तिलाही आत्मघात करण्यास उद्युक्त केले आहे. या जगातून निघून जाण्यापूर्वी आपल्या प्रिय मैत्रिणीची कडकडून भेट घ्यावी अशी कुरंगीची उत्कट इच्छा, फास आवळण्याच्या वेळी दासींपैकी कोणीही जवळ असू नये यासाठी प्रत्येकीची काहीतरी काम सांगून पाठवणी करण्याची तिची धडपड या साऱ्या गोष्टी भासाचे मानसशास्त्रीय सूक्ष्मावलोकन दर्शवितात.

कुरंगीने गळ्याभोवती उत्तरीयाचा फास आवळण्याच्या वेळी अविमारकाचे तेथे अदृश्य रूपाने हजर राहून तिला वाचविणे हा योगायोग म्हणजे केवळ त्या अंगठीची करामत होय. प्रियकरासाठी प्राणत्याग करणाऱ्या कुरंगीला प्रियकरानेच जीवदान दिले आणि फलप्राप्तीची आशा निर्माण झाली. नायक आणि नायिका दोघेही मृत्यूच्या उंबरठ्यापर्यंत जाऊन परत आले. परस्परांच्या दृष्टीने त्यांचे मीलन झाले. आता लौकिक, सामाजिक दृष्टीने व्हायला हवे होते आणि ते होण्यात आता दोन अडचणी शिल्लक होत्या. एक म्हणजे अविमारकाच्या उच्च कुलाची सर्वांना माहिती होणे आणि दुसरी म्हणजे विवाहासाठी आलेल्या जयवर्म्याची काहीतरी सोय करणे.

सहाव्या अंकात सर्व तुटलेले धागे एकत्र आणून या दोन अडचणींचा परिहार करून अंतिम फलप्राप्ती झाली आहे. परंतु ती मिळविण्यासाठी भासाला दैवी आधार घ्यावा लागला आहे. सौवीरराजाचा शाप संपला होता आणि कुंतिभोजाला तो आपल्याच राज्यात राहत आहे अशी वार्ता कळली होती. म्हणून त्याचा पत्ता काढून कुंतिभोज त्याला भेटला. त्याच्याच मुलाशी—विष्णुसेनाशी कुरंगीचा विवाह करण्याची कुंतिभोजाची मनोमन इच्छा होती. इतके दिवस सौवीरराजाचा ठावठिकाणाच नसल्यामुळे ती पुरी होऊ शकली नाही आणि आता सौवीरराजा भेटला पण त्याचा मुलगाच बेपत्ता झाला त्यामुळे कुंतिभोज निराश झाला होता. त्याच्या दूतांनाही विष्णुसेनाचा पत्ता अजून लागला नव्हता. इकडे जयवर्मा राजवाड्यात येऊन दाखल झाला होता. विवाहाची तयारी सुरू होतीच. आता कथानकाचे इष्ट फल म्हणजे कुरंगीचा अविमारकाशी विवाह घडवून आणणे. हे फल मिळविण्याचा दुसरा काहीही उपाय शिल्लक नाही असे पाहून भासाने नारदाकडे मध्यस्थीचे काम दिले.

नारदाने अचानक प्रकट होऊन अविमारकासंबंधी सर्व माहिती कुंतिभोजाला दिली. त्याचा कुरंगीशी गांधर्वविवाह केव्हाच झाला आहे. इतकेच नव्हे तर कुंति

भोजाला हवा असलेला जावई–विष्णुसेन–हाच आहे हे सारे नारदाने सांगून सर्व गोष्टींचा उलगडा केला. अविमारक आणि कुरंगीचा विवाह अशा प्रकारे सर्वसंमत झाला. आता अडचण फक्त जयवर्म्याची. त्याची आई सुदर्शना कुंतिभोजाची बहीण. तिला अचानक फिरलेल्या या बेतामुळे काय वाटेल ? शिवाय जयवर्मा जावई म्हणून येऊनही बसला आहे त्याचे काय ? भासाने मोठ्या चाणाक्षपणे या अडचणीतूनही मार्ग काढला आहे. सुदर्शनेला आपल्या मुलाला जावई केले नाही याचे दुःख होऊ नये म्हणून अविमारक हा तिलाच अग्नीपासून झालेला मुलगा असून तिच्या बहिणीचा मुलगा प्रसवकाळीच मरण पावल्यामुळे, त्याला तिने बहिणीला दिले होते असा प्रसंग भासाने कथेत घातला. सुदर्शना जन्मदात्री आई तर सुचेतना ही पालनपोषण करणारी आई. दोघी मातांना अविमारक सारखाच प्रिय. त्यामुळे त्याच्या कुरंगीशी झालेल्या विवाहाने दोघींना आनंद झाला.

जयवर्मा कुरंगीपेक्षा वयाने लहान असल्यामुळे त्याचा तिच्याशी विवाह होण्याची शक्यताच दूर करून काशिराजाला संतुष्ट ठेवण्यासाठी कुरंगीच्या धाकट्या बहिणीशी सुमित्रेशी त्याचा विवाह लावण्याची योजना भासाने केली. अशा प्रकारे सहाव्या अंकात सर्व इष्ट साधून कथा-नकविकासाचा शेवटचा टप्पा गाठला आहे. या अंकातील कथानक गतिमान आहे. प्रसंगांमागून प्रसंग घडतात आणि सारे संशय दूर होतात. कथानकाची क्रमाक्रमाने उकल होते.

आता येथे असा प्रश्न उरतो की, नारदाच्या मध्यस्थीची आवश्यकता खरोखरच होती काय ? वास्तविक सौवीरराजा शापमुक्त झाल्यानंतर, त्याची आणि कुंतिभोजाची गाठ पडल्यानंतर अविमारकाचा शोध लागला असता. कारण अविमारकाला केव्हातरी शापमुक्ततेची वार्ता लागली असती आणि तो अपाणहून प्रकट झाला असता. त्यामुळे नारदाच्या मध्यस्थीशिवाय हा विवाह घडून आला असता. अशा प्रकारे सरळपणे नाटकाचे साध्य घडवून आणण्याचे सोडून, नारदांची योजना भासाने का केली असावी हे कळत नाही. समर्थन करायचेच झाले तर करता येईल. परंतु ते फारसे मनाला पटत नाही. कारण नारद ज्या गोष्टी सांगण्यासाठी तेथे अवतरले त्या गोष्टी उशीरा का होईना, अविमारकाने सांगितल्या असत्याच. अशा प्रकारे नारदांची मध्यस्थी बहुशः निष्प्रयोजन वाटते. सुदर्शनेला अविमारक हा आपलाच पुत्र आहे याची आठवण करून देण्यासाठी आणि जयवर्मा कुरंगीपेक्षा लहान आहे हे सांगण्यासाठी नारदांचा उपयोग होतो. एऱ्हवी नाही.

सहा अंकांमधून क्रमाक्रमाने विकसित होणाऱ्या या संपूर्ण कथानकाचे आकलन केल्यानंतर एक गोष्ट ध्यानात येते ती म्हणजे, काही परिणाम घडवून आणण्यासाठी भासाने वास्तवापासून दूर जाऊन अद्‌भुत, दैवी गोष्टींचे साहाय्य घेतले आहे. आकाशातून उडणाऱ्या विद्याधराकडून अविमारकाला वाचविणे, अदृश्य करणारी अंगठी

अविमारकाला सापडणे आणि नारदाने पृथ्वीतलावर येऊन अंतिम फल घडवून आणणे या गोष्टी भासाची अद्‌भुताची आवड–वेड–दाखवतात. परंतु हे वेड या नाटकाच्या सौंदर्याला मारक ठरले आहे. कारण ही अद्‌भुत वलये पुसून टाकली तर संपूर्ण कथानकाचा प्रवाह अगदी नैसर्गिक आणि वास्तव वाटतो. एकदोन ठिकाणी जरी योगायोगानेच घटना घडत असल्या तरी वास्तवात योगयोग असतातच.

याच्या जोडीला या नाटकाचे दुसरे प्रमुख आकर्षण म्हणजे त्यातील खेळकर वास्तव वाटणारे संवाद. कोठेही कृत्रिमता, बोजडपणा नाही; उलट प्रत्येक ठिकाणी मनोविश्लेषणाची पार्श्वभूमी आहे. इतर अनेक संस्कृत नाटकांत दिसणारी तीच प्रेमकथा या नाटकात अगदी खेळीमेळीच्या नैसर्गिक वातावरणात रंगली आहे. कालिदासाप्रमाणे भासाने जरी निसर्गाची पार्श्वभूमी या प्रेमकथेसाठी उभारली नसली तरी विदूषक, नलिनिका यांसारखी जिवंत पात्रे निर्माण करून ती उणीव भरून काढण्याचा भासाने प्रयत्न केला आहे.

अशा प्रकारे नावीन्यपूर्ण कथा, उत्कृष्ट खेळकर संवाद आणि सचेतन पात्रे यांमुळे अविमारक हे भासाच्या उत्तम नाटकांपैकी एक आहे असे म्हणता येईल.

क्रियैक्य, कालैक्य आणि स्थलैक्य या ग्रीक तत्त्वांच्या दृष्टिकोनांतून पाहिले असता सर्व क्रिया एकध्येयाभिमुख असल्यामुळे या नाटकात क्रियैक्य साधले आहे. तसेच सर्व घटना वैरन्त्य नगरीत आणि तिच्या आसपास घडल्यामुळे स्थलैक्यही राखले आहे असे म्हणता येईल. पहिल्या अंकातील घटना आणि शेवटच्या अंकातील घटना यांमध्ये एक वर्षाचा काळ गेल्यामुळे कालैक्य मात्र दिसत नाही.

भासाच्या या प्रणय-प्रधान सुंदर नाटकाची छाप कालिदास, श्रीहर्ष, भवभूती इत्यादींच्या प्रणय-प्रधान नाटकांवर पडली आहे ही गोष्ट सहज लक्षात येते. प्रियकराच्या पराक्रमामुळे, साहसामुळे, प्रेयसीच्या मनात प्रेम अंकुरित होणे, प्रेमाच्या उत्कटतेने विरह असह्य होऊन–किंवा निराशेने–प्रेयसीने आत्महत्येस प्रवृत्त होणे, गैरमाहितीमुळे प्रेयसीने प्रियकराला–सखी समजून–आलिंगन देणे, नारदांकरवी मीलन घडवून आणणे वगैरे प्रसंग विक्रमोर्वशीय, रत्नावली, प्रियदर्शिका, मालतीमाधव वगैरे नाटकांत भासाच्या अनुकरणाने आले आहेत. यावरून अविमारकाचे अनन्यसामान्य वैशिष्ट्य दिसून येते.

## स्वभाव – परिपोष

**अविमारक** — हा या नाटकाचा नायक. सुदर्शनेला अग्नीपासून झालेला मुलगा. परंतु त्याला तिच्या बहिणीने सुचेतनेने लहानपणापासून वाढविल्यामुळे आणि सुदर्शनेने तो तिला देऊन टाकल्यामुळे तो सौवीरराजाचा आणि सुचेतनेचा मुलगा असेच सारेजण समजत होते. याचे खरे नाव विष्णुसेन आहे. परंतु श्रीकृष्णाप्रमाणे अगदी लहानपणी अविरूपधारी मायावी राक्षसाला याने आपल्या हातांनी ठार

मारल्यामुळे त्याचे नाव ' अविमारक ' पडले. हा त्याच्यातील अग्नीच्या बीजाचा प्रभाव त्याच्या या नैसर्गिक तेजस्वितेचा प्रत्यय तो मदोन्मत हत्तीच्या तावडीतून कुरंगीला सोडवतो तेव्हाही येतो. तो अग्निपुत्र असल्यामुळेच अग्नी त्याला जाळीत नाही. सौंदर्य आणि सामर्थ्य या दोन्ही बाबतीत तो दिव्य, अलौकिक आहे.

विद्याधरालाही त्याच्या अप्रतिम लावण्यामुळे तो दिव्य पुरुष वाटतो. तारुण्याच्या भरात असूनही त्याच्यात उन्मत्तपणा नाही, गर्व नाही असे त्याचे वर्णन कौंजायन करतो. म्हणून अविमारक हा धीरोदात्त नायक आहे असे म्हणता येईल. नाटकात जे जे घडते त्या सर्वांचा त्याच्याशी संबंध आहे. संपूर्ण नाटकभर त्याचे व्यक्तिमत्त्व व्यापून राहिले आहे. म्हणून तो खऱ्या अर्थाने नाटकाचा नायक आहे. पहिल्या अंकात एक बलाढ्य शूर पुरुष म्हणून नाटकभर त्याची ओळख होते, तर दुसऱ्या अंकात यौवनाच्या उंबरठ्यावर घसरलेला, एका सुंदरीसाठी वेडा झालेला एक युवक या स्वरूपात तो दिसतो.

तिसऱ्या अंकात मोठ्या साहसाने रोमिओच्या थाटात प्रेयसीचा महाल चढणाऱ्या प्रणयी वीराच्या स्वरूपात तो भेटतो तर चौथ्या अंकात विरहाग्नीने होरपळलेला उत्कट प्रेमाची परासीमा गाठलेला जितक्या बलिष्ठ शरीरसामर्थ्याने तितक्याच उत्कट, कोमल, हळुवार भावनांनी युक्त असा प्रेमापोटी जीव द्यायला निघालेला तरुण म्हणून आपण त्याला पाहतो. पाचव्या अंकात प्रेयसीला मृत्युच्या दाढेतून बाहेर काढणारा हा भाग्यवान युवराज सहाव्या अंकात सर्वांचा प्रिय आणि परमभाग्यवान ठरतो.

दिव्य आणि मानुष यांचा सुंदर संगम अविमारकाच्या स्वभावचित्रात झालेला आहे. सामर्थ्य आणि सौंदर्य याबाबतीत तो जितका दिव्य आहे तितकाच पहिल्याच कटाक्षात रमणीच्या प्रेमात पडून तिच्यासाठी झुरणारा, आणि प्रेमवेडा होऊन प्राणत्याग करणारा अविमारक भावनाशील मानुष वाटतो. राजपुत्र असूनही संगीत, चौरविद्या, यांचेही सूक्ष्म ज्ञान त्याला आहे असे दिसते. वीणेच्या स्वराच्या घनतेवरून ती वीणा पुरुष वाजवीत असला पाहिजे इतका अंदाज बांधण्याइतके नादज्ञान त्याला आहे. सत्यवचन, मित्रप्रेम, एकनिष्ठा यांसारख्या नैतिक गुणांचा त्याच्या ठायी वास अगदी अस्पष्टरीत्या भासाने दाखवला आहे.

परंतु त्याचे स्वभावचित्र प्रामुख्याने दोनच ठळक रंगात दिसते. एक म्हणजे त्याचे अतुलनीय शौर्य आणि दुसरे म्हणजे कुरंगीवरील त्याचे गाढ प्रेम यापलीकडे त्याच्या गुणांचा विकास कोणत्याही तऱ्हेने दाखविला नाही यामुळे त्याच्या नाटकभर अस्तित्वामुळेच केवळ त्याचा ठसा मनावर राहतो. त्याच्याजवळ जे काही चांगले आहे आणि त्याला जे काही चांगले मिळते ते सारे त्याच्या परम भाग्याचे फळ आहे. त्यात त्याचे स्वतःचे असे कर्तृत्व फार थोडे आहे असेच म्हणावे लागेल.

**विदूषक**— अविमारकापेक्षाही उठावदार विदूषकाचे चित्र झाले आहे. काही

विद्वानांच्या मते संस्कृत नाट्यशास्त्रातील सर्व विदूषकांचा आदिपुरुष ' अविमारका ' तील विदूषक आहे. संस्कृत नाट्यशास्त्रातील विदूषकाची कल्पना सर्वांगांनी सार्थ करणाऱ्या या विदूषकाचा थाट काही आगळाच आहे. याच्याइतका विनोदी ' विदूषकी ' विदूषक संस्कृत नाटकात अन्यत्र आढळत नाही. इतर संस्कृत नाटकातील विदूषकांनी याचेच अंशतः अनुकरण केले असावे असे वाटते. जयदेवाने भासाचे " हास " म्हणून केलेले वर्णन केवळ अनुप्रासाच्या वेडातून जन्माला आले नसून यथार्थ आहे याची साक्ष आपल्याला संतुष्ट पटवतो. इतरांना तो आपल्या भावड्या स्वभावामुळे एक करमणूक होऊन बसला आहे. त्यामुळे गंमत म्हणून कोणीही त्याची खोडी काढते. रस्त्यातून जाता जाता सहज, मजा म्हणून चंद्रिका त्याची गंमत करते आणि त्याला फसवून त्याची अंगठी घेऊन पळून जाते.

त्याला त्याच्या ब्राह्मण्याचा अभिमान आहे तो फक्त भूक भागविण्यापुरता. जेथे जेथे भोजन असेल तेथे तेथे जानवे पुढे करीत हा हजर होतो; आणि जानव्याखेरीज त्याच्याजवळ ब्राह्मण्याची दुसरी काहीही खूण नाही हे तोच एकदा बोलता बोलता कबूल करतो. नलिनिकेला तो म्हणतो, " जानवे आहे म्हणून मी ब्राह्मण, भगवी कफनी घातली की संन्यासी होईन आणि वस्त्रच नेसले नाही म्हणजे दिगंबरपंथी श्रावक होईन.' '

याला सदा भूक लागलेली असते. त्याच्या खादाडपणामुळेच चंद्रिका त्याला फसवू शकते. चिरविरहानंतर अविमारक कुरंगीला भेटतो तेव्हा तिथे हजर असलेला हा संतुष्ट स्नानाची तयारी करणाऱ्या दासीला म्हणतो, " अग स्नान राहू दे बाजूला फराळाचे ताट घेऊन ये आधी. कुरंगीला भूक लागली असेल. " नलिनिका त्याला खाली नेऊ लागताच " खायला देणार असलीस तर येईन. " अशी अट तिला तो घालतो.

आपली विकृत बडबड आणि वेडेवाकडे हावभाव यांच्या योगाने नाटकभर प्रेक्षकांना हसत ठेवण्याचे काम त्याने केले आहे. रामायणाला ' नाट्यशास्त्र ' म्हणून एका वर्षात त्यातले पाच श्लोक पाठ करण्याइतकी कुशाग्र बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता त्याच्याजवळ आहे. प्रत्यक्ष वाचायची वेळ येताच वाचता येत नसल्यामुळे " एतदक्षरं मम पुस्तके नास्ति " असे म्हणण्याइतके प्रसंगावधानही त्याच्याजवळ आहे. नलिनिका " हा पुरुष कोण ? " असे त्याच्याकडे पाहून म्हणताच तो तिला उपहासाने म्हणतो, " खुळे, मी काही पुरुष नाही. बाई आहे. पुष्करिणी नावाची चेटी आहे मी. " सरळपणे यायला तयार होत नाही म्हणून नलिनिका जेव्हा त्याला ओढत खाली नेऊ लागते, तेव्हा हा तुंदिलतनु विदूषक तिला म्हणतो, " अग अशी ओढू नकोस. मी किती नाजूक आहे ! "

अविमारकावरचे त्याचे उत्कट प्रेम त्याच्या शोधार्थ तो वणवण भटकतो तेव्हा दिसते. राजवाड्यात चोरून प्रवेश करतानाही " वेळ आली तर मी आरडाओरडा करण्यासाठी तरी तुझ्याबरोबर येतो " असे तो म्हणतो.

अशा प्रकारे भोळाभाबडा, निर्बुद्ध, पण सरळ-निष्कपट मनाचा हा विदूषक प्रेक्षकांची मने जिंकतो यात शंकाच नाही.

**कुंतिभोज**—वैरन्त्यनगरीचा राजा कुंतिभोज हा नायिकेचा-कुरंगीचा-पिता. कुरंगीच्या विवाहाच्या चिंतेत असतानाच तो आपले पितृहृदय व्यक्त करतो. प्रजेप्रमाणेच स्वतःच्या कुटुंबाचीही काळजी तो वाहतो. कुरंगीला योग्य स्थळ मिळावे यासाठी अनेक मागण्या येऊनही त्यातील योग्य वराची निवड तो मंत्र्यांच्या सल्ल्याने करतो. सर्व दृष्टींना त्याला इष्ट असलेला वर नाही असे पाहिल्यानंतर तो स्वस्थ बसत नाही, तर त्यापेक्षा किंचित कमी पात्रतेच्या दुसऱ्या वराची लगेच योजना करतो. विवाहाचे गांभीर्य त्याला ठाऊक आहे.

कुरंगीला रूपगुणांनी उत्कृष्ट असा पती मिळावा अशा इच्छेनेच त्याचे मन अविमारकाकडे धाव घेते, परंतु तो कुलीन नाही असे कळताच कुंतिभोज माघार घेतो पहिल्या अंकानंतर एकदम सहाव्या अंकात आपल्याला त्याचे दर्शन होते. तेव्हा तो आपला राजेपणा विसरून नगरात राहात असलेल्या आपल्या बालमित्राला सौवीरराजाला भेटायला येतो. अविमारकाचा पत्ता लागल्यानंतर सारे मनासारखे घडल्यामुळे तो हरखून जात नाही. आपली बहीण सुचेतना, तिचा विवाहासाठी आणलेला मुलगा जयवर्मा यांच्या भावनांची त्याला चाड आहे. नारदाची मोठ्या आदराने पूजा करून राजाचे ब्राह्मण पूजेचे व्रतही त्याने पाळले आहे.

असे असूनही कुंतिभोज ही अगदी सामान्य दर्जाची स्वभावरेखा वाटते.

**कुरंगी** - कुंतिभोजाची मुलगी. राजकन्या कुरंगी. ही या नाटकाची नायिका तिच्या अप्रतिम सौंदर्याच्या पहिल्या दर्शनातच अविमारक तिच्यावर फिदा झाला आणि तीही त्यावर भाळली. तिच्या कोमल शरीराप्रमाणेच भावनाही कोमल आहेत. म्हणून एकंदरीत सर्वसामान्य नायिकांप्रमाणेच हीही आहे असे म्हणता येईल.

राजकन्येला साजेसा किंचित हट्टीपणा, निष्क्रियता, बुजरेपणा हे सारे गुण तिच्यात आहेत. प्रेमाची उत्कटता पराकोटीला गेल्यानंतरही त्याच्या सिद्धीसाठी ती स्वतः काहीही हालचाल करीत नाही. तिच्या सख्याच तिची अवस्था जाणून तिच्यासाठी सारी खटपट करतात.

अविमारकाच्या स्वभावचित्रात दोन, तर कुरंगीच्या स्वभावचित्रात एकच एक रंग भरला आहे आणि तो म्हणजे अविमारकावरील तिच्या यौवनोचित उत्कट प्रेमाचा' प्रेम करणाऱ्या कुरंगीशिवाय कुरंगीचे दुसरे कोणतेही स्वरूप नाटकात दिसत नाही. अविमारकाचा विरह असह्य होऊन ती आत्महत्या करायला निघते तेव्हा प्रेमाच्या उत्कटतेबरोबरच तिची भावविवशता व्यक्त होते. संस्कृत नाट्यसृष्टीत शकुंतला, वसंतसेना, सीता यांसारख्या काही नायिका सोडल्या, तर साऱ्याच नायिका अशा कुरंगी-

प्रमाणेच निष्क्रिय आणि प्रणयभावनेत मश्गुल दिसतात.

**नलिनिका**—कुरंगीची प्रियसखी नलिनिका नाटकात नसती, तर कुरंगीचे प्रेमसाफल्य झालेच नसते असे म्हणावे लागेल. एकट्या नलिनिकेला कुरंगीचे रहस्य ठाऊक होते आणि तिनेही आपल्या आईच्या मदतीने कुरंगी-अविनारक यांचे मीलन अगदी गुप्तपणे घडवून आणले. क्षणोक्षणी कुरंगीची काळजी वाहणारी, तिच्यासाठी झटणारी तिच्यावर मनोमन प्रेम करणारी नलिनिका जिवंत स्वभावरेखा वाटते. ती जितकी खेळकर, विनोदी तितकीच चाणाक्ष आहे.

ती जिना चढत असतानाच भ्रमात असलेली कुरंगी विलासीनिलाच 'नलिनिका' म्हणून हाक मारते. विलासिनी लगेच 'मी नलिनिका नाही विलासिनी आहे' असे म्हणताच कुरंगीची मनातली चलबिचल इतर दासींच्या लक्षात येऊ नये म्हणून "माझ्या पावलांचा पायऱ्या चढतानाचा आवाज ओळखून राजकन्येने मलाच हाक मारली. चूकून नव्हे" असे स्पष्टीकरण नलिनिका पुढे होऊन देते. चिरकाल विरह सहन केल्यानंतर अदृश्य रूपाने परत प्रासादात आल्यानंतर अविमारक जेव्हा कुरंगीला भेटतो तेव्हा त्याला पाहिल्यानंतर "तुम्ही अचानक इथे कसे?" असे नलिनिका आश्चर्याने विचारते. त्यावर "ते सर्व हा संतुष्ट तुला सांगेल" असे अविमारक उत्तर देतो. ते ऐकताच मीलनोत्सुक अविमारक आपल्याला आणि विदूषकाला तेथून जाण्याची सूचना करीत आहे हे चाणाक्ष नलिनिकेच्या लगेच लक्षात येते. झोपेत कुरंगीने तिला अलिंगन द्यायला सांगताच मोठ्या चतुराईने ती अविमारकाला अलिंगन द्यायला सांगते. तिच्या या क्रियाशीलतेकडे पाहिल्यानंतर कोणत्याही नायिकेला वाटेल "सखी असावी तर अशी!"

याखेरीज विचारी अमात्य भूतिक आणि कौंजायन, उदात्त स्वभावाचा विद्याधर, मूकपणे शाप भोगणारा सौवीरराज, एऱ्हवी भांडणे लावून विघ्ने आणणारा पण येथे कार्य सिद्धीला कारणीभूत झालेला नारद, त्याचबरोबर नलिनिकेला मदत करणारी प्रेमळ धात्री, कुरंगीच्या कामसू आणि खेळकर दासी मागधिका व विलासिनी, कुरंगीची वत्सल आई, सुदर्शना या सर्वांची स्वभावचित्रे फारच संक्षिप्त पण उठावदार झाली आहेत.

## सुभाषिते :

(१) जामातृसंपत्तिमचिंतयित्वा
पित्रा तु दत्ता स्वमनोभिलाषात्
कुलद्वयं हंन्ति मदेन नारी
कूलद्वयं क्षुब्धजला नदीव ॥ १.४

**अर्थ**—जावयाच्या गुणवैभवाचा अजिबात विचार न करता पित्याने स्वतःच्या

अशा प्रकारे भोळाभाबडा, निर्बुद्ध, पण सरळ–निष्कपट मनाचा हा विदूषक प्रेक्षकांची मने जिंकतो यात शंकाच नाही.

**कुंतिभोज**—वैरन्त्यनगरीचा राजा कुंतिभोज हा नायिकेचा–कुरंगीचा–पिता. कुरंगीच्या विवाहाच्या चिंतेत असतानाच तो आपले पितृहृदय व्यक्त करतो. प्रजेप्रमाणेच स्वतःच्या कुटुंबाचीही काळजी तो वाहतो. कुरंगीला योग्य स्थळ मिळावे यासाठी अनेक मागण्या येऊनही त्यातील योग्य वराची निवड तो मंत्र्यांच्या सल्ल्याने करतो. सर्व दृष्टींना त्याला इष्ट असलेला वर नाही असे पाहिल्यानंतर तो स्वस्थ बसत नाही, तर त्यापेक्षा किंचित कमी पात्रतेच्या दुसऱ्या वराची लगेच योजना करतो. विवाहाचे गांभीर्य त्याला ठाऊक आहे.

कुरंगीला रूपगुणांनी उत्कृष्ट असा पती मिळावा अशा इच्छेनेच त्याचे मन अविमारकाकडे धाव घेते, परंतु तो कुलीन नाही असे कळताच कुंतिभोज माघार घेतो पहिल्या अंकानंतर एकदम सहाव्या अंकात आपल्याला त्याचे दर्शन होते. तेव्हा तो आपला राजेपणा विसरून नगरात राहात असलेल्या आपल्या बालमित्राला सौवीरराजाला भेटायला येतो. अविमारकाचा पत्ता लागल्यानंतर सारे मनासारखे घडल्यामुळे तो हरखून जात नाही. आपली बहीण सुचेतना, तिचा विवाहासाठी आणलेला मुलगा जयवर्मा यांच्या भावनांची त्याला चाड आहे. नारदाची मोठ्या आदराने पूजा करून राजाचे ब्राह्मण पूजेचे व्रतही त्याने पाळले आहे.

असे असूनही कुंतिभोज ही अगदी सामान्य दर्जाची स्वभावरेखा वाटते.

**कुरंगी** - कुंतिभोजाची मुलगी. राजकन्या कुरंगी. ही या नाटकाची नायिका तिच्या अप्रतिम सौंदर्याच्या पहिल्या दर्शनातच अविमारक तिच्यावर फिदा झाला आणि तीही त्यावर भाळली. तिच्या कोमल शरीराप्रमाणेच भावनाही कोमल आहेत. म्हणून एकंदरीत सर्वसामान्य नायिकांप्रमाणेच हीही आहे असे म्हणता येईल.

राजकन्येला साजेसा किंचित हट्टीपणा, निष्क्रियता, बुजरेपणा हे सारे गुण तिच्यात आहेत. प्रेमाची उत्कटता पराकोटीला गेल्यानंतरही त्याच्या सिद्धीसाठी ती स्वतः काहीही हालचाल करीत नाही. तिच्या सख्याच तिची अवस्था जाणून तिच्यासाठी सारी खटपट करतात.

अविमारकाच्या स्वभावचित्रात दोन, तर कुरंगीच्या स्वभावचित्रात एकच एक रंग भरला आहे आणि तो म्हणजे अविमारकावरील तिच्या यौवनोचित उत्कट प्रेमाचा' प्रेम करणाऱ्या कुरंगीशिवाय कुरंगीचे दुसरे कोणतेही स्वरूप नाटकात दिसत नाही. अविमारकाचा विरह असह्य होऊन ती आत्महत्या करायला निघते तेव्हा प्रेमाच्या उत्कटतेबरोबरच तिची भावविवशता व्यक्त होते. संस्कृत नाट्यसृष्टीत शकुंतला, वसंतसेना, सीता यांसारख्या काही नायिका सोडल्या, तर साऱ्याच नायिका अशा कुरंगी-

प्रमाणेच निष्क्रिय आणि प्रणयभावनेत मश्गुल दिसतात.

**नलिनिका**— कुरंगीची प्रियसखी नलिनिका नाटकात नसती, तर कुरंगीचे प्रेमसाफल्य झालेच नसते असे म्हणावे लागेल. एकट्या नलिनिकेला कुरंगीचे रहस्य ठाऊक होते आणि तिनेही आपल्या आईच्या मदतीने कुरंगी-अविमारक यांचे मीलन अगदी गुप्तपणे घडवून आणले. क्षणोक्षणी कुरंगीची काळजी वाहणारी, तिच्यासाठी झटणारी तिच्यावर मनोमन प्रेम करणारी नलिनिका जिवंत स्वभावरेखा वाटते. ती जितकी खेळकर, विनोदी तितकीच चाणाक्ष आहे.

ती जिना चढत असतानाच भ्रमात असलेली कुरंगी विलासीनिलाच ' नलिनिका ' म्हणून हाक मारते. विलासिनी लगेच ' मी नलिनिका नाही विलासिनी आहे ' असे म्हणताच कुरंगीची मनातली चलबिचल इतर दासींच्या लक्षात येऊ नये म्हणून " माझ्या पावलांचा पायऱ्या चढतानाचा आवाज ओळखून राजकन्येने मलाच हाक मारली. चूकून नव्हे " असे स्पष्टीकरण नलिनिका पुढे होऊन देते. चिरकाल विरह सहन केल्यानंतर अदृश्य रूपाने परत प्रासादात आल्यानंतर अविमारक जेव्हा कुरंगीला भेटतो तेव्हा त्याला पाहिल्यानंतर " तुम्ही अचानक इथे कसे ? " असे नलिनिका आश्चर्याने विचारते. त्यावर " ते सर्व हा संतुष्ट तुला सांगेल " असे अविमारक उत्तर देतो. ते ऐकताच मीलनोत्सुक अविमारक आपल्याला आणि विदूषकाला तेथून जाण्याची सूचना करीत आहे हे चाणाक्ष नलिनिकेच्या लगेच लक्षात येते. झोपेत कुरंगीने तिला अलिंगन द्यायला सांगताच मोठ्या चतुराईने ती अविमारकाला अलिंगन द्यायला सांगते. तिच्या या क्रियाशीलतेकडे पाहिल्यानंतर कोणत्याही नायिकेला वाटेल " सखी असावी तर अशी ! "

याखेरीज विचारी अमात्य भूतिक आणि कौंजायन, उदात्त स्वभावाचा विद्याधर, मूकपणे शाप भोगणारा सौवीरराज, एन्हवी भांडणे लावून विघ्ने आणणारा पण येथे कार्य सिद्धीला कारणीभूत झालेला नारद, त्याचबरोबर नलिनिकेला मदत करणारी प्रेमळ धात्री, कुरंगीच्या कामसू आणि खेळकर दासी मागधिका व विलासिनी, कुरंगीची वत्सल आई, सुदर्शना या सर्वांची स्वभावचित्रे फारच संक्षिप्त पण उठावदार झाली आहेत.

## सुभाषिते :

( १ ) जामातृसंपत्तिमचिंतयित्वा
पित्रा तु दत्ता स्वमनोभिलाषात्
कुलद्वयं हन्ति मदेन नारी
कूलद्वयं क्षुब्धजला नदीव ॥ १.४

**अर्थ**—जावयाच्या गुणवैभवाचा अजिबात विचार न करता पित्याने स्वतःच्या

अशा प्रकारे भोळाभाबडा, निर्बुद्ध, पण सरळ-निष्कपट मनाचा हा विदूषक प्रेक्षकांची मने जिंकतो यात शंकाच नाही.

**कुंतिभोज**—वैरन्त्यनगरीचा राजा कुंतिभोज हा नायिकेचा-कुरंगीचा-पिता. कुरंगीच्या विवाहाच्या चिंतेत असतानाच तो आपले पितृहृदय व्यक्त करतो. प्रजेप्रमाणेच स्वतःच्या कुटुंबाचीही काळजी तो वाहतो. कुरंगीला योग्य स्थळ मिळावे यासाठी अनेक मागण्या येऊनही त्यातील योग्य वराची निवड तो मंत्र्यांच्या सल्ल्याने करतो. सर्व दृष्टींना त्याला इष्ट असलेला वर नाही असे पाहिल्यानंतर तो स्वस्थ बसत नाही, तर त्यापेक्षा किंचित कमी पात्रतेच्या दुसऱ्या वराची लगेच योजना करतो. विवाहाचे गांभीर्य त्याला ठाऊक आहे.

कुरंगीला रूपगुणांनी उत्कृष्ट असा पती मिळावा अशा इच्छेनेच त्याचे मन अविमारकाकडे धाव घेते, परंतु तो कुलीन नाही असे कळताच कुंतिभोज माघार घेतो पहिल्या अंकानंतर एकदम सहाव्या अंकात आपल्याला त्याचे दर्शन होते. तेव्हा तो आपला राजेपणा विसरून नगरात राहात असलेल्या आपल्या बालमित्राला सौवीरराजाला भेटायला येतो. अविमारकाचा पत्ता लागल्यानंतर सारे मनासारखे घडल्यामुळे तो हरखून जात नाही. आपली बहीण सुचेतना, तिचा विवाहासाठी आणलेला मुलगा जयवर्मा यांच्या भावनांची त्याला चाड आहे. नारदाची मोठ्या आदराने पूजा करून राजाचे ब्राह्मण पूजेचे व्रतही त्याने पाळले आहे.

असे असूनही कुंतिभोज ही अगदी सामान्य दर्जाची स्वभावरेखा वाटते.

**कुरंगी** - कुंतिभोजाची मुलगी. राजकन्या कुरंगी. ही या नाटकाची नायिका तिच्या अप्रतिम सौंदर्याच्या पहिल्या दर्शनातच अविमारक तिच्यावर फिदा झाला आणि तीही त्यावर भाळली. तिच्या कोमल शरीराप्रमाणेच भावनाही कोमल आहेत. म्हणून एकंदरीत सर्वसामान्य नायिकांप्रमाणेच हीही आहे असे म्हणता येईल.

राजकन्येला साजेसा किंचित हट्टीपणा, निष्क्रियता, बुजरेपणा हे सारे गुण तिच्यात आहेत. प्रेमाची उत्कटता पराकोटीला गेल्यानंतरही त्याच्या सिद्धीसाठी ती स्वतः काहीही हालचाल करीत नाही. तिच्या सख्याच तिची अवस्था जाणून तिच्यासाठी सारी खटपट करतात.

अविमारकाच्या स्वभावचित्रात दोन, तर कुरंगीच्या स्वभावचित्रात एकच एक रंग भरला आहे आणि तो म्हणजे अविमारकावरील तिच्या यौवनोचित उत्कट प्रेमाचा' प्रेम करणाऱ्या कुरंगीशिवाय कुरंगीचे दुसरे कोणतेही स्वरूप नाटकात दिसत नाही. अविमारकाचा विरह असह्य होऊन ती आत्महत्या करायला निघते तेव्हा प्रेमाच्या उत्कटतेबरोबरच तिची भावविवशता व्यक्त होते. संस्कृत नाट्यसृष्टीत शकुंतला, वसंतसेना, सीता यांसारख्या काही नायिका सोडल्या, तर साऱ्याच नायिका अशा कुरंगी-

प्रमाणेच निष्क्रिय आणि प्रणयभावनेत मश्गुल दिसतात.

**नलिनिका**—कुरंगीची प्रियसखी नलिनिका नाटकात नसती, तर कुरंगीचे प्रेमसाफल्य झालेच नसते असे म्हणावे लागेल. एकट्या नलिनिकेला कुरंगीचे रहस्य ठाऊक होते आणि तिनेही आपल्या आईच्या मदतीने कुरंगी-अविमारक यांचे मीलन अगदी गुप्तपणे घडवून आणले. क्षणोक्षणी कुरंगीची काळजी वाहणारी, तिच्यासाठी झटणारी तिच्यावर मनोमन प्रेम करणारी नलिनिका जिवंत स्वभावरेखा वाटते. ती जितकी खेळकर, विनोदी तितकीच चाणाक्ष आहे.

ती जिना चढत असतानाच भ्रमात असलेली कुरंगी विलासीनिलाच 'नलिनिका' म्हणून हाक मारते. विलासिनी लगेच 'मी नलिनिका नाही विलासिनी आहे' असे म्हणताच कुरंगीची मनातली चलबिचल इतर दासींच्या लक्षात येऊ नये म्हणून "माझ्या पावलांचा पायऱ्या चढतानाचा आवाज ओळखून राजकन्येने मलाच हाक मारली. चूकून नव्हे" असे स्पष्टीकरण नलिनिका पुढे होऊन देते. चिरकाल विरह सहन केल्यानंतर अदृश्य रूपाने परत प्रासादात आल्यानंतर अविमारक जेव्हा कुरंगीला भेटतो तेव्हा त्याला पाहिल्यानंतर "तुम्ही अचानक इथे कसे?" असे नलिनिका आश्चर्याने विचारते. त्यावर "ते सर्व हा संतुष्ट तुला सांगेल" असे अविमारक उत्तर देतो. ते ऐकताच मीलनोत्सुक अविमारक आपल्याला आणि विदूषकाला तेथून जाण्याची सूचना करीत आहे हे चाणाक्ष नलिनिकेच्या लगेच लक्षात येते. झोपेत कुरंगीने तिला अलिंगन द्यायला सांगताच मोठ्या चतुराईने ती अविमारकाला अलिंगन द्यायला सांगते. तिच्या या क्रियाशीलतेकडे पाहिल्यानंतर कोणत्याही नायिकेला वाटेल "सखी असावी तर अशी!"

याखेरीज विचारी अमात्य भूतिक आणि कौंजायन, उदात्त स्वभावाचा विद्याधर, मूकपणे शाप भोगणारा सौवीरराज, एन्हवी भांडणे लावून विघ्ने आणणारा पण येथे कार्य सिद्धीला कारणीभूत झालेला नारद, त्याचबरोबर नलिनिकेला मदत करणारी प्रेमळ धात्री, कुरंगीच्या कामसू आणि खेळकर दासी मागधिका व विलासिनी, कुरंगीची वत्सल आई, सुदर्शना या सर्वांची स्वभावचित्रे फारच संक्षिप्त पण उठावदार झाली आहेत.

## सुभाषिते :

(१) जामातृसंपत्तिमचिंतयित्वा<br>
पित्रा तु दत्ता स्वमनोभिलाषात्<br>
कुलद्वयं हंन्ति मदेन नारी<br>
कूलद्वयं क्षुब्धजला नदीव ॥ १.४

**अर्थ**—जावयाच्या गुणवैभवाचा अजिबात विचार न करता पित्याने स्वतःच्या

मर्जीप्रमाणे एखाद्याला दिलेली मुलगी आपल्या अवखळ वर्तनाने, खवळलेली नदी ज्याप्रमाणे दोन्ही तीर पाडून टाकते त्याचप्रमाणे दोन्ही कुळांचा नाश करते.

( २ ) एकः परगृहं गच्छेद् द्वितीयेन तु मंत्रयेत्
बहुभिः समरं कुर्यात् इत्ययं शास्त्रनिर्णयः ॥ २·१० ॥

**अर्थ**—दुसऱ्याच्या घरी जाताना एकट्याने जावे. सल्लामसलत करताना दुसऱ्याचे साहाय्य घ्यावे, आणि युद्ध करायचे ते अनेकांनी करावे असा शास्त्राचा निर्णय आहे

( ३ ) यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः
को वा न सिध्यति ममेति करोति कार्यम्
यत्नैः शुभैः पुरुषता भवतीह नृणां
दैवं विधानमनुगच्छति कार्यसिद्धिः ॥ ३·१२ ॥

**अर्थ**--प्रयत्न करूनही कार्यात यश आले नाही तर त्यात दोष कुणाचा ? 'आपले' म्हणून आत्मीयतेने कार्य केल्यानंतर कोण यशस्वी होणार नाही ? मंगल-कारक प्रयत्न करण्यानेच माणसाचे पौरुष सिद्ध होते. कार्याची सिद्धी परमेश्वरावर अवलंबून असते.

( ४ ) न तथा रत्नमासाद्य सुजनः परितुष्यति
यथा तत्तद्गताकांक्षे पात्रे दत्त्वा प्रहृष्यति ॥ ४·१४ ॥

**अर्थ**—सज्जनांना एखाद्या रत्नाच्या प्राप्तीने जितका आनंद होतो त्याहूनही अधिक आनंद, त्या रत्नाची इच्छा करणाऱ्या योग्य व्यक्तीला ते रत्न दिल्याने होतो.

( ५ ) छन्ना भवन्ति भुवि सत्पुरुषाः कथंचित् स्वैः कारणैर्गुरुजनैश्च नियम्यमानाः
भूयः परव्यसनमेत्य विमोक्तुकामा विस्मृत्य पूर्वनियमं विवृता भवन्ति ॥१·६॥

**अर्थ**--काही कारणांमुळे, वडीलमाणसांनी निर्बन्ध घातल्यामुळे, जगात काही सत्पुरुष कसे तरी ( नाइलाजास्तव ) गुप्तपणे राहात असतात. परंतु दुसऱ्याला संकटात पाहताच आपला गुप्तपणा सोडून देण्याची इच्छा करीत, पूर्वीचा नियम विसरून, ते परत प्रकट होतात.

( ६ ) स्वभावरमणीयानि मंडितानि अतिरमणीयानि भवति । ४· ।

**अर्थ**—निसर्गतः सुंदर असलेल्या वस्तू त्यांवर अलंकार चढविले म्हणजे अधिक सुंदर दिसतात.

# कोण हा ‘ चाफा ’ ?

माधव गोपाळ देशमुख

---

## चाफा

चाफा बोलेना, चाफा चालेना,
चाफा खंत करी, काही केल्या फुलेना ॥ ध्रु० ॥

गेले ‘ आंब्याच्या ’ वनी
म्हटली मैनांसवे गाणी
आम्ही गळ्यांत गळे मिळवून. १

गेले केतकीच्या वनी
गंध दर्वळला वनीं
नागासवे गळाले देहभान. २

आले माळ सारा हिंडुन
हुंबर पशूंसवे घालुन
कोलाहलाने गलवले रान. ३

कडा धिप्पाड वेढी
घाली उड्यांवर उडी
नदी गर्जुन करी विहरण. ४

मेघ धरू धावे
वीज चटकन लवे
गडगडाट करी दारुण. ५

लागुन कलिकेच्या अंगा
वायु घाली धांगडधिंगा
विसरुनी जगाचे जगपण. ६

सृष्टि सांगे खुणा
आम्हा मुखस्तंभ राणा
मुळी आवडेना ! रे आवडेना ! ! ७

चल ये रे ये रे गड्या !
नाचु उडू, घालु फुगड्या
खेळु झिम्मा झिम्–पोरी झिम्–पोरी झिम् ! ८

हे विश्वाचे आंगण
आम्हां दिले आहे आंदण
उणे करू आपण दोघेजण. ९

जन विषयाचे किडे
यांची धाव बाह्याकडे
आपण करू शुद्ध रसपान. १०

दिठी दीठ जाता मिळुन
गात्रे गेली पांगळुन
अंगी रोमांच आले थरथरून. ११

चाफा फुली आला फुलुन
तेजी दिशा गेल्या आटुन
कोण मी–चाफा ? कोठे दोघे जण ? १२

'कोण मी–चाफा ?' असा प्रश्न करून कविवर्य बी यांनी चिकित्सक रसिकांपुढे जणू काही एक कोडेच टाकले आहे. या कोड्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न आजवर अनेक मान्यवर टीकाकारांनी केला आहे. पण त्याचे उत्तर बाहेर शोधण्याची गरज नाही; ते कवीच्या त्या प्रश्नातच अंतर्भूत आहे, असे या सर्व टीका वाचल्यानंतर आता म्हणावेसे वाटते.

'चाफा' ही कविता म्हणजे एक गीत आहे. पण ते अक्षरगणांनी किंवा मात्रा गणांनी बंदिस्त झालेले नाही. बी कवींच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे ते लोकगीत आहे. 'बी' कवींनी २३–१२–१९४५ च्या आपल्या पत्रात लिहून ठेवले आहे :

" प्राचीन काळापासून तो आजपर्यंत जी लोकगीते आहेत, त्यांत ज्याला साधारणतः मात्रा म्हणतात, त्यांचा नियम नसतो. कारण ज्या चालीवर ती गीते म्हटली जातात, त्या चालीप्रमाणे ऱ्हस्व अक्षर दीर्घ होईल, किंवा दीर्घ अक्षर ऱ्हस्व होईल ( संगीत–शास्त्राच्या नियमाप्रमाणे ). चालीच्या ओघात काही अडथळा येत नाही. मात्रांची मर्यादा दोन ते चारपर्यंत कमी जास्त झाल्यास, ते अशुद्ध होणार नाही. चार पेक्षा जास्त मात्रा चालीच्या ओघात मावत नाहीत त्या बाहेर फेकल्या जाऊन ते गीत वेताल व बेसूर होते. संगीताप्रमाणे मराठी लोकगीतात यती नसतात. " ( 'युगवाणी' बी विशेषांक ).

' लोकगीते आणि यतिमात्रा ' यांसंबंधी इतके खुलासेवार वर्णन करूनही ' चाफा ' या गीताची अमुकच एक चाल आहे असे काही बी कवींनी सांगितले नाही. " दिंडी, साक्या, पदे, भूपाळ्या, लावण्या वगैरे मराठी कविता गाण्याकरिता रचलेल्या आहेत. ही लोकगीते होत. ती रागात्मक असल्यामुळे त्यांचा संबंध संगीतशास्त्राशी आहे " असे त्यांनी याच पत्रात स्पष्टपणे म्हटलेले आहे. ' चाफा ' सारख्या लोकगीताला गाणाराच्या मगदुराप्रमाणे जशी लावावी तशी चाल लागू शकते. पण लता मंगेशकरने एकदा हे गीत आपल्या अनुपम स्वरांत गायिले की तीच चाल रूढ होते. इतकेच काय, पण मुळात या गीताला लोकगीताची चाल आहे, याचाही विसर पडतो.

' चाफा ' या कवितेच्या अर्थासंबंधीही असेच घडले आहे. या कवितेचे आजवर अनेकांनी अनेक प्रकारे अर्थ लावले आहेत त्यांपैकी बहुतेक सर्व अर्थांच्या मुळाशी चाफा म्हणजे प्रियकर आणि हे गीत गाणारी व्यक्ती म्हणजे त्याची सखी या कल्पनेची घट्ट पकड बसली आहे. " हे गीत शुद्ध प्रेमाचे नितांतसुंदर सूक्तच आहे " ( आचार्य अत्रे ) या अर्थापासून तो " चाफा म्हणजे परस्परप्रीतीच्या सायुज्यसाक्षात्कारासाठी झुरणारे जीवन " ( कवि अनिल ) अशा प्रतीकात्मक अर्थापर्यंत या कवितेची चर्चा झालेली असून बहुतेक सर्व टीकाकारांनी या कवितेसंबंधी कविवर्य बी यांनी इतरत्र व्यक्त केलेल्या विचारांचा आधार घेतलेला आहे.

कोणत्याही कवितेचा अर्थ लावताना आपला प्रयत्न कवीला अभिप्रेत असणाऱ्या अर्थाच्या अधिकात अधिक जवळ जाण्याचा असावा हे उघड आहे. अशा स्थितीत स्वतः कवीनेच आपल्या कवितेविषयी काही उद्‌गार काढले असतील, तर ते अवश्य विचारात घेतले पाहिजेत. ' चाफा ' या कवितेविषयी बी कवींनी आपल्या काही स्नेह्यांजवळ चर्चा केलेली दिसून येते. ही चर्चा इतरांच्या स्मृतीवर आधारलेल्या सांगीव माहितीचा दाखला देणारी आहे. पण अशा तोंडी चर्चेशिवाय स्वतः बी कवींनी ' चाफा ' या कवितेविषयी आपले मत लेखी नमूद करून ठेवले आहे. ज्याअर्थी सांगीव माहितीत आणि लेखी मतात काही विसंगती आढळून येत आहे, त्याअर्थी या प्रश्नाबाबत इतरांच्या स्मृतीवर आधारलेली सांगीव माहिती हा दुय्यम दर्जाचा पुरावा म्हणून बाजूला ठेवून स्वतः बी कवींनी साद्यन्त पत्ररूपाने जे नमूद करून ठेवले आहे

ते उपलब्ध असल्यामुळे, तो अव्वल दर्जाचा पुरावा म्हणून त्याला अग्रपूजेचा मान दिला पाहिजे.

इतर टीकाकारांनी ' चाफा ' कवितेचा अर्थ लावताना कोणकोणत्या गोष्टी गृहीत धरल्या अथवा त्यांच्या अर्थात कोणत्या उणिवा आणि दोष आहेत, यांचा ऊहापोह येथे करावयाचा नाही. कवीच्या लेखी मताचा प्राथमिक आणि मूलभूत आधार घेऊन आणि त्याच्या इतर कवितांतील कल्पनासाम्याचा व समान शब्दयोजनेचा एक अंतर्गत पुरावा म्हणून मागोवा घेत घेत कवीला अभिप्रेत असलेला ' चाफा ' या कवितेचा स्वाभाविक अर्थ कोणता असावा, हे उकलून दाखविण्याचा या लेखात प्रयत्न करावयाचा आहे.

बी कवींचे या कवितेविषयी जे लेखी पत्र प्रसिद्ध झालेले आहे त्याचा प्रथम विचार करू. प्रा. वा. गो. मायदेव यांच्या ' वेचलेले क्षण ' या पुस्तकात पृ. ७७–७८ वर बी कवींनी २९–११–१९१८ रोजी मायदेवांना लिहिलेले एक पत्र उद्धृत केले आहे. त्यात केशवसुतांच्या ' हरपले श्रेय ' या कवितेचा अप्रत्यक्ष व ओझरता उल्लेख करून व केशवसुतांचा एकवचनी निर्देश करून ' चाफा ' या कवितेविषयी बी लिहितात,

**" केशवसुताने म्हटले आहे की, ' हृदय आत्म्याला जधी खेळवीते। हृदय आत्म्याला जधी आळवीते। ' त्याप्रमाणे चाफ्यात हृदयाने आत्म्याला खेळविले आहे. हृदयाने आत्म्याला आळविले आहे. "**

' चाफा ' या कवितेतील चाफा कोण व त्याला खेळविणारी आणि आळविणारी दुसरी व्यक्ती कोणती याविषयी खुद्द बी कवींनी व्यक्त केलेले हे मत अतिशय पारदर्शक असून ' चाफ्यात हृदयाने आत्म्याला खेळविले आहे, हृदयाने आत्म्याला आळविले आहे ' ही कल्पना म्हणजे या कवितेचा स्वतः बी कवींना जो अर्थ अभिप्रेत आहे, त्याचे आरंभस्थान समजले पाहिजे.

बी कवींनी आपल्या पत्रात दिलेले अवतरण हे केशवसुतांच्या ' दूर कोठे एकला जाउनीया ' या कवितेतील आहे. त्या अवतरणाचा पूर्वापर संदर्भ असा :—

दूर कोठे एकला जाउनीया,
एकतारी आपली घेऊनीया,
स्वेच्छ होतो छेडीत ती, मनाला
दुःखिताला आराम व्हावयाला.
आजवेरी बहु मनोभंग झाले,
बहुत आशांचे प्राण निघुनि गेले
तयां शोचाया निर्जनात जावे,
एकतारी छेडीत मी बसावे !

आज देखिल मी तसा अस्तमानी
वाद्य वेडेबाकुडे वाजवूनी
दंग झालो स्वच्छंद गायनाने;
खरे संगीतज्ञान कोण जाणे !
हृदय आत्म्याला जधी खेळवीते,
हृदय आत्म्याला जधी आळवीते;
तधी तुमचे ते नको कलाज्ञान,
तधी हृदयासम नसे तानसेन !

केशवसुतांची ही कविता प्रतीकात्मक असून उघड उघड ' कवी आणि काव्य ' यांना अनुलक्षून आहे. कवीचे हृदय हे आपल्या आत्म्याला जेव्हा खेळवीत आणि आळवीत असते, तेव्हा कलेच्या ज्ञानाची आवश्यकता नसते, तेव्हा हृदयासारखा दुसरा तानसेन नसतो. म्हणजे हृदय–आत्म्याच्या अर्थात् कविहृदय आणि त्याचा आत्मा यांच्या मिलनप्रसंगी कलेच्या ज्ञानाची गरज नसते; कारण कविहृदयाच्या प्रेरणेमुळे कवी जेव्हा आपल्या कलेचा आत्माविष्कार करीत असतो, त्या वेळी कवीचे हृदय आणि त्याचा काव्यरूपी आत्मा यांमधील द्वंद्व नाहीसे होते आणि असे झाले म्हणजे कोणत्याही विषयावर केलेले काव्य असो, ते काव्यरसाने बहरून आल्याशिवाय राहत नाही, असा केशवसुतांच्या कवितेचा भावार्थ आहे. या भावार्थाच्या अनुरोधाने ' चाफा ' या कवितेतील मध्यवर्ती कल्पनेचा शोध लावला पाहिजे. केशवसुतांची कविता जशी संपूर्णपणे प्रथमपुरुषी आत्मनिवेदनात्मक आहे, तशीच ' चाफा ' ही कवितादेखील प्रथमपुरुषी आत्मनिवेदनात्मक आहे.

अर्थ लावण्याच्या दृष्टीने या कवितेचे पाच भाग कल्पावे लागतात. त्यांपैकी सर्वांत महत्त्वाचा पहिला भाग म्हणजे ध्रुवपदाचा—

( १ ) चाफा बोलेना, चाफा चालेना
चाफा खंत करी, काही केल्या फुलेना ॥ ध्रु० ॥

हृदय आत्म्याला खेळवीत आणि आळवीत आहे या कल्पनेच्या अनुरोधाने येथे खेळविणारी आणि आळविणारी व्यक्ती म्हणजे कवीचे हृदय आणि ज्याची आळवणी चालली आहे तो कवीचा आत्मा म्हणजे चाफा आहे. कवीचे हृदय काव्यरचना करू इच्छिते, पण कवीचा आत्मा मात्र मुखस्तंभ झाला आहे; तो बोलत नाही, चालत नाही, खंत करीत आहे, काही केल्या फुलत नाही. कविहृदयाने आत्माविष्कारासाठी आटोकाट प्रयत्न करावा, पण कवीच्या हृदयाने ज्याचा आविष्कार करावयाचा तो आत्मा मात्र आविष्कृत होता होत नाही, ही कविहृदयाची व्यथा काहीशी स्वगत पण आत्मनिवेदनात्मक पद्धतीने या ध्रुवपदात व्यक्त केली आहे.

(२) गेले आंब्याच्या वनी, गेले केतकीच्या बनी, आणि आले माळ सारा हिंडून, ही तीन कडवी म्हणजे हृदयाने आत्म्याला खेळविण्यासाठी केलेले प्रयत्न आहेत. 'काही केल्या' या ध्रुवपदातील शब्दांतून या प्रयत्नांची विवक्षा अपेक्षित आहे. पहिल्या कडव्यातील 'म्हटली मैनांसवे गाणी। आम्ही गळ्यात गळे मिळवून' आणि ध्रुवपदातील 'चाफा बोलेना' या दोन कल्पनांत काहीशी विसंगती वाटण्याचा संभव आहे, कारण 'आम्ही' मैनांसवे गाणी म्हटल्यानंतर आम्हांपैकी एक, अर्थात् चाफा बोलत नाही, या म्हणण्यात काय अर्थ? पण 'आम्ही' हा अनेकवचनी कर्ता 'गळ्यात गळे मिळवून' एवढ्यापुरताच उपपन्न समजावा आणि 'म्हटली मैनांसवे गाणी' या कर्मणिप्रयोगातील कर्तृपद मी (कविहृदय) एवढेच एकवचनी मर्यादित घ्यावे, म्हणजे वरवर दिसणारी विसंगती दूर होईल. किंवा, आम्ही या शब्दाचा अर्थ 'मी म्हणजे कविहृदय आणि मैना ह्यांनी' असा घ्यावा. मी आणि मैना यांनी गळ्यात गळे मिळवून म्हणजे एकमेकांच्या सुरात सूर मिळवून गाणी गायिली; पण चाफा मात्र बोलला नाही असा अर्थ करावा, म्हणजे विसंगती राहात नाही.

(३) कडा घिप्पाड वेढी, मेघ धरू धावे, लागुन कलिकेच्या अंगा आणि सृष्टी सांगे खुणा, या चार कडव्यांत आंब्याचे बन, केतकीचे बन व माळरान यांखेरीज सृष्टीचे आणखी जे व्यापक आणि विराट रूप आहे त्याचे वर्णन आहे. हे वर्णन हृदयाने आत्म्याला उद्देशून केलेले आहे. त्यात एक गर्भित सूचना आहे. सर्व निसर्गात कोलाहलाचे दृश्य दिसते आणि सृष्टी आपल्या बाळराण्याला अर्थात् कवीला उद्देशून जणू असे ध्वनित करीत आहे की, आम्हांला तुझ्यासारखा मुखस्तंभ राणा आवडत नाही. अशा प्रकारे आत्म्याला बोलते-चालते करून त्याची खंत दूर करण्यासाठी व त्याला फुलविण्यासाठी सृष्टीमधील विविध क्रीडांचे वर्णन केल्यानंतर—

(४) चल ये रे ये रे गड्या, हे विश्वाचे अंगण आणि जन विषयाचे किडे या तीन कडव्यांत कविहृदयाने आत्म्याची आळवणी केली आहे.

(५) 'दिठी दीठ' जाता मिळुन आणि चाफा फुली आला फुलून, या शेवटच्या दोन कडव्यांत हृदयाने आत्म्याची जी खेळवणी आणि आळवणी केली तिचे फलित वर्णिले आहे. सरतेशेवटी कोण मी – चाफा?— कोठे दोघे जण?— अशी हृदय आणि आत्मा यांची निर्द्वंद्व आणि अद्वैत अवस्था वर्णन केली आहे.

चाफा बोलेना, चाफा चालेना
चाफा खंत करी, काही केल्या फुलेना.

या ध्रुवपदाच्या अनुषंगाने 'चाफा' कवितेची मूळपीठिका लक्षात घेतली पाहिजे. हृदय अर्थात् कवीचे हे चाफ्याला खेळवीत आणि आळवीत आहे. हृदय म्हणजे मन. 'संकल्पविकल्पात्मकं मनः' हे मनाचे गुणधर्म प्रसिद्ध आहेत. कवीचे

हृदय :संकल्प कशाचा करणार? अर्थात काव्यनिर्मितीचा. काव्यनिर्मितीचा संकल्प करू इच्छिणारे मन हे कोणाला आळवीत आहे?—कवीचाच आत्मा अर्थात कवित्व खुलत नाही, म्हणून कविहृदयाची सगळी आटाआटी चालली आहे.

चाफ्याचे फूल बोलत नाही, चालत नाही, ते हिरमुसले झाले आहे, ते खंत करीत आहे—हुरहुरत आहे—कितीही प्रयत्न केले तरी फुलत ते नाही, उमलत नाही, खुलत नाही.

या ध्रुवपदाचा अर्थ स्पष्ट होण्यासाठी बी कवींच्या आणखी काही कवितांचा मागोवा घेतला पाहिजे. आपल्या मुग्धपणामुळे जिला ध्यानमुद्रा जडलेली आहे अशा ' दीपज्योतीस ' उद्देशून बी कवींनी म्हटले आहे—

ध्याया कोंडुनि मंदिरात जगदुद्यानी न तू जन्मली,
वाया नासुनि जावया नुगवली बागेत चाफेकळी !
व्हाव्या वर्धित वस्तु ज्यांत वसते सौंदर्य अत्युत्कट,
इच्छा केवळ की ! न वस्तुसह ते पावो जगी शेवट.

चाफेकळी जेव्हा बागेत उगवते तेव्हा तिचा उद्देश न फुलता, न खुलता, अकारण नष्ट होणे हा नसतो. ज्या वस्तूंमध्ये अत्युत्कट सौंदर्य वसत असते, अशा चाफेकळी-सारख्या वस्तू सतत वाढत असाव्या. त्यांच्यामधील सौंदर्य त्यांच्याबरोबरच नाश पावू नये अशीच कोणाचीही इच्छा असणे स्वाभाविक आहे. ' दीपज्योतीस ' या कवितेत चाफेकळी ही ज्याप्रमाणे सतत विकसित होत जाणाऱ्या सौंदर्याचे प्रतीक मानलेली आहे, त्याप्रमाणे ' चाफा ' कवितेतील चाफा हा प्रतिक्षणी नवता निर्माण करणाऱ्या रमणीयतेचे अर्थात काव्याचे प्रतीक मानले पाहिजे.

ज्या वेळी जगातील त्रिविध तापांनी पोळलेल्या कवीच्या मनाला काव्य स्फुरत नाही, सुचत नाही, त्यावेळी तो दूर रानावनात जाऊन आपले मन रमविण्याचा, रिझविण्याचा प्रयत्न करीत असतो. ' फुलांची ओंजळ ' या कवितेत कवी हा सृष्टीचा बाळ असून जेव्हा तो एकटेपणामुळे हिरमुसला होतो, तेव्हा त्याला सृष्टी ही कशी खेळविते, त्याचे बी कवींनी वर्णन केले आहे—

सृष्टीचा लडिवाळ बाळ वेल्हाळ कवी धाकटा
अफाट जगहाटात पाहिला हिरमुसला एकटा.
कळवळली कनवाळु मनी असमाय माय-मावली
बाजारातुन काढुन माया-पाखर वर घातली.
चंद्रसूर्य खेळणी दिली खेळाया तेजागळी,
कुरवाळी हळुवारपणे पण न फुले कवि-मन-कळी.

नक्षत्रांची—चटकफुलांची—माळ टपोरी नवी
जरतारी तारांत गुंफुनी लेकरास लेववी.
आकाशाचे अंगण झाडुनि अवीट रंगे वरी
विचित्र रेखा लिही लिही ती कळाचतुर सुंदरी
' वाळ उदासी वणवण भटकुन अपार निष्ठुर जगीं
असेल थकला '—विचारात या क्षणभर झाली उगी.

जेव्हा कवीची मनकळी फुलत नाही आणि जेव्हा तो अपार निष्ठुर जगात वणवण भटकून थकल्यामुळे उदास झालेला असतो, तेव्हा सृष्टी ही त्याला मायेची पाखर घालते, चंद्रसूर्यनक्षत्रांची खेळणी देते. आकाशाच्या स्वच्छ अंगणावर ती कलाचतुर सुंदरी रंगीबेरंगी रेखाचित्रे काढते. सृष्टीने कवीपुढे विविध दृश्यांची असंख्य लेणी पुढे केली.

शिशुमन रमवायास करी आयास माय ती असे
अळुमाळ परंतु तो न रिझला——

असे याच कवितेत पुढे म्हटले आहे. ' चाफा ' कवितेच्या ध्रुवपदातील भाषा आणि कवी हिरमुसला, न फुले कवि-मन-कळी, शिशुमन रमवायास करी आयास, परंतु तो न रिझला ही वर उल्लेखिलेली भाषा यांतील शब्दसाम्य अणि कल्पनासाम्य लक्षात घेण्यासारखे आहे. ' चाफा खंत करी ' यातील ' खंत ' हा शब्द बी कवींच्या ' विचार-तरंग ' या कवितेत ' खंत सोडूनि कामाला लागा, रवि उदया आला ' येथे निरुत्साह, उदासीनता या अर्थाने आलेला आहे. ज्याला भोवतालच्या लोकांबद्दल खंती वाटते, त्याची एकांतावर फार प्रीती असते, ( बहु एकांतावरि प्रीति जया जनपदाची खंती। —ज्ञा. १३·६१० ) हे ज्ञानेश्वरांचे उद्‌गार येथे लक्षात घेण्यासारखे आहेत. या सर्व उल्लेखांवरून ध्रुवपदाचा अर्थ उकलून दाखविता येतो, तो असा —— कवीच्या हृदयाने आपल्या आत्म्याला म्हणजे काव्यरूपी चाफ्याला फुलविण्याचा व खुलविण्याचा फार यत्न केला. पण तो अगदी मख्ख होऊन बसला. तो बोलला नाही, चालला नाही; तो हिरमुसला झाला. कितीही प्रयत्न करून खुलला नाही, फुलला नाही.

ध्रुवपदानंतरच्या कडव्यांचा अर्थ कवीचे हृदय हे आपल्या आत्म्याला म्हणजे काव्यरूपी चाफ्याला फुलविण्याचा म्हणजे खेळविण्याचा प्रयत्न करीत आहे. अशा अनुरोधाने लावला पाहिजे. हृदयाने काव्यात्म्याला फुलविण्याचे कोणकोणते प्रयत्न केले याचे निवेदन आता हृदयाच्याच शब्दांत ऐका——

गेले आंब्याच्या बनी
म्हटली मैनांसवे गाणी
आम्हीं गळ्यात गळे मिळवुन. १

गेले केतकीच्या वनी
गंध दर्वळला वनी
नागासवे गळाले देहभान. २

आले माळ सारा हिंडुन
हुंबर पशूंसवे घालुन
कोलाहलाने गलबले रान. ३

या तिन्ही कडव्यातील 'गेले', 'गेले' आणि 'आले' या क्रियापदांचा विचार करण्यासारखा आहे. वर वर पाहता 'हृदय' या कर्त्याचे ते तृतीयपुरुषी क्रियापदाचे रूप आहे. असा आभास होतो. पण तसे ते नाही, कारण हे हृदयाचे आत्मनिवेदन आहे. आजवर बहुतेक सर्व टीकाकारांनी निवेदन करणारी व्यक्ती ही चाफ्याची सखी आहे अशी कल्पना केल्यामुळे 'गेले' हे क्रियापद प्रथमपुरुषी, स्त्रीलिंगी असे कल्पून अर्थ लावला गेला आहे. वस्तुतः 'चाफा' ही संपूर्ण कविता प्रथमपुरुषी आत्मनिवेदनात्मक असल्यामुळे 'गेले' हे क्रियापद प्रथमपुरुषी असले तरी स्त्रीलिंगी नाही; नपुंसकलिंगी आहे, हे विसरता येत नाही. कारण 'गेले आंब्याच्या बनी' या वाक्याचा कर्ता हृदय असून येथे हृदय बोलत आहे अशी कल्पना केली आहे. व्यवहाराच्या भाषेत प्रथम-पुरुषी कर्ता एक तर पुल्लिंगी तरी असेल किंवा स्त्रीलिंगी तरी असेल; पण काव्याच्या भाषेत एखाद्या नपुंसकलिंगी पदार्थावर चेतनगुणाचा आरोप केला असल्यास प्रथमपुरुषी क्रियापद हे नपुंसकलिंगीही होऊ शकते. काव्यातील चेतनगुणोक्तीच्या प्रसंगी क्रियापदाचे प्रथमपुरुषी नपुंसकलिंगी असे रूप व्याकरणाला धरूनच आहे असे मानले पाहिजे.

या संदर्भात रे. टिळकांची 'वनवासी फूल' ही कविता लक्षणीय आहे. या कवितेतील कवी आणि फूल यांच्यामधील संवादात कवीला उद्देशून फुलाच्या तोंडीं पुढील शब्द घातले आहेत. स्वतःविषयी बोलताना फूल म्हणते--

योग्य न शिवणे, जगदीशाला अर्पित झाले, त्याला
दो दिवसांचे जीवित माझे दिधले मी परमेशा.

* * *

निवास माझा जनात होता कारण अपकारांला,
थोडेसे मी तुला सांगते, मौज बघू दे त्याला.

* * *

फार कशाला तुझ्याच हाती मी जरि येऊन पडते,
कोमुन जाता तरी मला तू फेकुन दिधले असते !

येथे जशी रे. टिळकांनी फुलाच्या तोंडी ( मी ) अर्पित झाले, मी तुला सांगते, मी येउन पडते, अशी प्रथम पुरुषी रचना घातलेली आहे तशीच ' चाफ्या 'च्या तिन्ही कडव्यांतही हृदय या नपुसकलिंगी कर्त्याच्या तोंडी ' गेले आंब्याच्या वनी ' अशा यथायोग्य क्रियापदाची योजना केली आहे.

या तीन कडव्यांत कविहृदयाने काव्याला फुलविण्याचा जो यत्न केला आहे त्यात ओतप्रोत सूचकता भरून राहिली आहे. पहिल्या कडव्यात मी आंब्याच्या वनात गेले आणि मैनांसह गाणी म्हटली असे कविहृदय म्हणत आहे. आंब्याचे वन बहरून आले असता मैना गाणी गातात हा कविसंकेत प्रसिद्ध आहे. मैना ही पक्षीण काव्या-मध्ये ' जसा पोपट–मैनेचा जोडा तरुवर बसला ' अशा जोडीसाठी प्रसिद्ध आहे. येथे कविहृदय म्हणते, मी मैनांबरोबर गळ्यात गळे मिळवून गाणी गाइली. गाण्याबद्दल प्रसिद्धी नसलेल्या मैनादेखील गायिल्या; पण माझा बोलका राघू मात्र मख्ख राहिला. कविहृदयाने नाना यत्न केले पण कवीच्या आत्म्याने मात्र त्याला साथ दिली नाही.

' चांदणी ' या कवितेत बींनी चांदणीच्या तेजाकडे पाहून सृष्टीतील यच्चयावत् जड व चल पदार्थ कसे मुग्ध झाले, हे वर्णन करताना

खगगण शब्दविषय फिटुनी
गेले ठायिच विरघळुनी

असे पक्ष्यांचे समुदाय निःशब्दपणे जागच्या जागीच कसे विरघळून गेले, हे सांगितले आहे. ' ह्यात काय संशय ? ' या दुसऱ्या एका कवितेत पोपटाची पोकळ अशी पोपटपंची ऐकून

नुमटताच रव मैनामुखि मुद्रा पडे

आपल्या चोचीतून शब्द बाहेर पडण्यापूर्वीच मैना मुखस्तब्ध होते, असे उद्गार काढलेले आहेत. येथे मैनांची चिवचिव चालू होती. मीही त्या मैनांबरोबर गाणी गायिली पण माझा चाफा मात्र फुलला नाही. वासंतिक बहर आलेल्या आंबेवनात जाऊन मैनांबरोबर गळ्यात गळे मिळविण्याचा आणि गाणी गाण्याचा यत्न वाया गेला. हृदयाचा संकल्प आणि काव्याचा आविष्कार यांची संगती जुळली नाही.

नंतर मी केतकीच्या वनात गेले. केतकीच्या बनात नागाचे वास्तव्य असते. केतकीच्या म्हणजे केवड्याच्या संपूर्ण बनात दरवळलेल्या उन्मादकारक वासाने मी मोहून गेले, धुंद झाले. नाग जसा केवड्याच्या वासाने देहभान नष्ट होऊन डोलू लागतो तशीच माझीही अवस्था झाली. हृदय म्हणते, काव्यनिर्मितीचे मी नानाविध संकल्प केले :

आंब्याचे बन झाले, केतकीचेही झाले व अशाच प्रकारे संपूर्ण माळ मी हिंडून आले. माझ्या काव्यरूपी आत्म्याला सृष्टीतील खगकूजनाचे आकर्षण वाटले नाही

किंवा सृष्टीत दरवळलेल्या गंधानेही तो मोहून गेला नाही. माळावल्या पशूंच्या बरोबर गुराखी खेळतात तो सुरकावळीचा खेळ मी खेळले. सर्व रान गोंगाटामुळे दंग होऊन गेले. पण तरीही माझा काव्यरूपी आत्मा मात्र विकसित झाला नाही, तो स्तब्धच राहिला.

हृदयाने आत्म्याला परोपरीने खेळविण्याचा यत्न करूनही तो क्रीडाप्रवृत्त झाला नाही, म्हणून आता त्याला सृष्टीचे अधिक विशाल आणि व्यापक स्वरूप दाखविण्याचा यत्न चालू आहे. चवथ्या कडव्यामध्ये हृदयाने ' कोलाहलामुळे रान गलबलून गेले ' असे सांगितले. सर्व रानामध्ये जो कोलाहल चालू होता तो कोणता, त्याचे वर्णन या पुढील चार कडव्यात केले आहे —

कडा धिप्पाड वेढी  
घाली उड्यांवर उडी  
नदी गर्जुन करी विहरण.  ४

मेघ धरू धावे  
वीज चटकन लवे  
गडगडाट करी दारुण.  ५

लागुन कळिकेच्या अंगा  
वायु घाली धांगडधिंगा  
विसरुनी जगाचे जगपण.  ६

सृष्टि सांगे खुणा  
आम्हा मुखस्तंभ राणा  
मुळी आवडेना ! रे आवडेना ! !  ७

निसर्गामध्ये सर्वच कोलाहल अर्थात धडधडाट चालू असतो त्याचे वर्णन वरील चार कडव्यांत केले आहे. ' कमळा ' या काव्यामध्ये श्री कवींनी—

निश्चल झाला निसर्गातला धडधडता प्राण,  
निश्चल वारा पाणी, निश्चल कडे आणि रान.

असे म्हणून निसर्गातला प्राण धडधडत असतो अर्थात वारा, पाणी, कडे आणि रान हे नेहमी धडधडत असतात असे सूचित केले आहे. 'चाफा' कवितेतही रानातली ' गलबल ' वर्णन करताना कडा, नदी, मेघ, वायू यांचाच निर्देश केला आहे, हे लक्ष्यात घेण्यासारखे आहे. पाचव्या कडव्यात धिप्पाड कड्याला नदी वेढा देते, उड्यावर उड्या घालते आणि गर्जना करून कड्याबरोबर क्रीडा करते असे म्हटले

आहे. सहाव्या कडव्यात मेघाला धरण्यासाठी धावणारी वीज चटकन लखलखते आणि भयानक असा कडकडाट करते, असे सांगितले असून त्यापुढील कडव्यात फुलाच्या कळीला स्पर्श करणारा वारा आपला स्पर्श सामान्यतः सुखद व्हावा हा लौकिक नियम विसरून सारखा धिंगाणा घालतो, दंगामस्ती करतो, असे उद्गार काढले आहेत.

सृष्टीमधील या सर्व हालचालींवरून सृष्टीची उदयोन्मुखता व विकास परायणता कवीला सूचित करावयाची आहे हे उघड आहे. 'गिरिगान' या कवितेत बी कवींनी—

उदयगिरीवरच्या पृष्ठी
उदयोन्मुख सारी सृष्टी
नित्य विकासपरायणता
ही काळावर दे सत्ता.

अशी साऱ्या उदयोन्मुख सृष्टीची काळावर सत्ता गाजविणारी विकासपरायणता वर्णन केली आहे, हेही लक्षात घ्यावे. यातील सृष्टीचा काळावर सत्ता गाजविण्याचा धर्म काव्याशी साम्य दाखवितो. एवढे सगळे केले, पण काव्यरूपी चाफा मात्र अविकसितच राहिला. तो बोलेना, चालेना. सृष्टीचे विराट रूप दाखवून त्यात रमविण्याचे प्रयत्न केले असूनही तो तेथे रमला नाही, मख्ख राहिला. म्हणजे कविहृदयाने अनेक संकल्प करूनही त्याचे काव्य हे शब्दरूप धारण करू शकले नाही, असा अर्थ.

बी कवींनी सृष्टी आणि निसर्ग यांमध्ये सूक्ष्म असा फरक केलेला दिसतो. जी उदयोन्मुख आणि विकासपरायण असते ती सृष्टी आणि तिचाच घटक असलेला व ज्याच्या ठिकाणी सतत कोलाहल चालू असतो. तो मात्र निसर्ग असे त्यांचे मत दिसते, 'निवेदन' या कवितेत त्यांनी म्हटले आहे.—

रूप पाहुनि हे सृष्टिसुंदरीचे
स्तब्ध झाले चांचल्य निसर्गाचे

सृष्टिसुंदरीचे रूप पाहून जो मूळचा चंचल आहे, तो निसर्गदेखील क्षणभर स्तब्ध झाला, स्थिर झाला असा अर्थ. जिला सुंदर रूप आहे ती सृष्टी आणि जो स्वभावतःच चंचल आहे, तो मात्र निसर्ग, हा या दोहोंतील भेद कवीला येथे अभिमत दिसतो. १ ते ६ या कडव्यांचा संबंध प्रत्येक वेळी जसा ध्रुवपदाकडे लावावयाचा त्याप्रमाणे

सृष्टि सांगे खुणा । आम्हा मुखस्तंभ राणा
मुळी आवडेना ! रे आवडेना ! !

या सातव्या कडव्याकडेही लावला पाहिजे. कविहृदयाने आपल्या आत्म्याला फुलविण्यासाठी, क्रीडाप्रवृत्त करण्यासाठी काय काय युक्त्याप्रयुक्त्या केल्या, त्या पहिल्या सहा कडव्यांत सांगितलेल्या असून त्याला सर्व रानावनात हिंडवून आणल्यानंवर सर्व

सृष्टीचे रहस्य सातव्या कडव्यात पटवून दिले आहे. ते रहस्य स्वतः सृष्टी आपल्या निसर्गखुणांनी सांगत आहे. ती म्हणते की निसर्गात सर्वत्र कोलाहल, गर्जना, गडगडाट, धांगडधिंगा चालू आहे आणि या सर्व निसर्गक्रीडेचा अर्थ एकच आहे. तो हा की, सृष्टीला 'मुखस्तंभ राणा' मुळीच आवडत नाही. सातव्या कडव्यात निर्देशिलेला हा मुखस्तंभ राणा कोण?

सृष्टी आणि कवी यांचा संबंध केशवसुत व रे. टिळक यांच्याप्रमाणेच बी कवींनीही निरनिराळ्या रीतींनी वर्णन केला आहे. 'फुलांची ओंजळ' या कवितेतील यासंबंधाबाबत पुढील उद्गार पाहावे.

सृष्टीचा लडिवाळ बाळ वेल्हाळ कवी धाकटा.

× × × ×

सृष्टीशी कवी समरस झाला, प्राण तिचा आतला.

× × × ×

सृष्टीचे लाडके तुम्ही संलाप तुम्हांशी करी.

या उद्‌गारांवरून मुखस्तंभ झालेला हा सृष्टीचा राणा कोण याबद्दल शंका उरत नाही. कविहृदय हे चाफ्याला अर्थात् कवीचा आत्मा म्हणजे त्याचे कवित्व याला उद्देशून म्हणत आहे की, सर्व सृष्टीत अशा कोलाहलाची व संलापाची परिस्थिती दिसत असताना सृष्टीचा लाडका राणा म्हणजे कवी हा जर मख्ख राहिला म्हणजे त्याचे कवित्व उमलले नाही, तर ते तिला कसे आवडेल? मुळीच आवडणार नाही, अगदी आवडणार नाही. तूही विकसित हो, प्रफुल्लित हो, अशी सूचना.

'आम्ही' या आपल्या कवितेत बी कवींनी कवींची महती वर्णन करताना कवी हे द्रष्टे आहेत व कवींच्या नेत्रांनी देश पाहण्यास शिकले पाहिजे, असे म्हणताना,

होते सृष्टि नवी, कलेवर जुने टाका, तुम्ही व्हा तसे—

कवीच्या रचनेमुळे जसे प्रत्येक वेळी काव्याला नावीन्य लाभते त्याचप्रमाणे प्रत्यही सृष्टीचेही नवनवीन रूप व्यक्त होते. तुम्हीही आपले जुने शरीर टाकून नवे रूप धारण केले पाहिजे, जीर्ण कल्पना टाकून नवविचारांचे ग्रहण केले पाहिजे असा सर्वांना हितोपदेश केला आहे.

अशा प्रकारे आपल्या आत्म्याला बोलते-चालते करण्यासाठी, त्याची खंत दूर व्हावी म्हणून सृष्टीतील शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध असे पंचविषयात्मक स्वरूप दाखवून व निसर्गाचे चांचल्य अर्थात् कोलाहल यांचे दृश्य दाखवून त्याला खेळविण्याचे अप्रत्यक्ष असे सारे प्रयत्न केल्यानंतर आता त्याची प्रत्यक्षपणे मनधरणी सुरू आहे. हृदयाने केलेले आत्म्याचे खेळविणे झाले; आता त्याचे आळविणे पाहावे.

चल ये रे, ये रे गड्या !
नाचु उडू घालु फुगड्या
खेळु झिम्मा झिम्–पोरी झिम्–पोरी झिम् ! ८

हे विश्वाचे आंगण
आम्हा दिले आहे आंदण
उणे करू आपण दोघेजण. ९

जन विषयाचे किडे
यांची धाव बाह्याकडे
आपण करू शुद्ध रसपान. १०

या तीन कडव्यांत हृदयाने आत्म्याला उद्देशून काढलेले उद्गार आहेत. चल, ये रे, ये रे, गड्या अशी या आळवणीची प्रारंभी द्वितीयपुरुषी रचना असून पुढे त्याला जणू काही अधिक विश्वासात घेऊन त्याच्याबरोबर द्विवचनी प्रथमपुरुषी भाषण सजविले आहे.

सृष्टीने निरनिराळ्या प्रकारे सांकेतिक सूचना करून निसर्गात सर्वत्र विकासपरायणता, कोलाहल, संलाप यांचेच प्राबल्य असल्यामुळे त्यांपैकी कोणालाही मुखस्तंभ राणा आवडत नाही, असे सांगितल्यावर, अशा परिस्थितीत तुझे कर्तव्य कोणते याची जाणीव येथे कविहृदय आपल्या आत्म्याला करून देत आहे. त्री कवींनी प्रतिभेवर लिहिलेल्या आपल्या 'वेडगाणे' या कवितेत प्रतिभेच्या तोंडी "सृष्टिसुरांत सुर मी भरी -ग" असे शब्द घातले आहेत. लोक मला काव्य करणारी म्हणतात पण वास्तविक सृष्टीच्या सुरांत आपला सूर मिसळून देणे एवढेच माझे कार्य आहे. येथेही कविहृदयाने आत्म्याची आळवणी करताना त्याच पद्धतीने "चल गड्या, ये, आपणही निसर्गात सर्वत्र चाललेल्या कोलाहलाला अनुसरून पशूंबरोबर हुंबर घालू, नदीप्रमाणे उड्यावर उड्या घेऊ, वीजमेघांप्रमाणे फुगड्या घालू, झिम् पोरी झिम् असा झिम्मा खेळू. सारी सृष्टीच नाचतबागडत असताना आपणही विकसित होऊन सृष्टीच्याच सुरात आपला सूर मिसळून देऊ," असे स्पष्ट केले आहे.

वास्तविक पाहता निसर्गाच्या इतर वस्तूंची क्रीडा ही अतिशय मर्यादित आहे, पण कविहृदयाने एकदा काव्यनिर्मितीचा संकल्प केला आणि कवीचा काव्यरूप आत्माविष्कार झाला म्हणजे मग तेथे क्रीडेच्या क्षेत्राला कोणते बंधन पडणार आहे? कविहृदय म्हणते, "आमचे क्रीडांगण म्हणजे संपूर्ण विश्व. हे जणू काही आम्हाला आंदण म्हणजे काव्यक्रीडा करण्यासाठी कायमची आणि हक्काची मिळालेली देणगी आहे. संपूर्ण विश्व हे आमच्या अधीन आले आहे. ते आता आपण दोघे काव्यक्रीडेने व्यापून टाकू.

' सुष्टिसुरांत सुर मी भरी ' हे जसे प्रतिभेचे कार्य आहे त्याप्रमाणे प्रतिभा ही विश्वाची राणी असल्यामुळे अनंताची प्रदक्षिणा करणारी आहे, ब्रह्मांडाच्या ग्रडामोडी करणारी आहे (' वेडगाणे '). ' चांदणी ' या ' बालकवी 'ला उद्देशून लिहिलेल्या कवितेत " बालकवी हा काव्यरूपी ' गगनांगणा 'मधला अति विमल तारा आहे " असे बी कवी म्हणतात. ' फुलांची ओंजळ ' या कवितेत कवी आणि सृष्टी यांची अभिन्नता दाखविताना कवीच्या सामर्थ्याचे वर्णन असे केले आहे—

आकाशाचा अणू घेउनी त्यात विश्व दाखवी,
फुंकर घालुनि अजस्र विश्वा क्षणार्धात लोपवी.

' वेडगाणे ' या कवितेत सर्वसामान्य लोक जिला काव्य करणारी म्हणतात ती प्रतिभा वास्तविक कशी आहे याचे वर्णन करताना सर्वसामान्य लोकांचा ' जन ' असा निर्देश केला आहे. स्वतःकडे कमीपणा घेऊन बोलण्यासाठी संस्कृतात ' अयं जनः ' असा प्रयोग करतात किंवा अन्यांना कमी लेखण्यासाठी ' इतरे जन ' असे शब्द वापरतात हे प्रसिद्धच आहे. विश्वाचे आंदण मिळालेले कवी यांच्या अपेक्षेने जन म्हणजे सर्वसामान्य लोक हे विषयाचे किडे असतात, त्यांची धाव केवळ बाह्य स्वरूपाकडे असते. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंच ज्ञानेंद्रियांना गोचर होणारे पाच विषय आहेत. त्यांच्यापासून होणारे ज्ञान हे बहिरंगाचे ज्ञान होय. इंद्रियजन्य ज्ञान म्हणजे केवळ अनुभव होय. अनुभवाहून प्रतीती ही वेगळी आहे, ती आंतरिक असते. सर्वसामान्य लोकांना वरवरच्या विषयसुखात रममाण होऊ दे, आपण मात्र चिन्त्य वस्तूंच्या खोल अंतरंगात शिरून त्याचा स्वसंवेद्य असा आस्वाद अर्थात आंतरप्रतीती घेऊ. बाह्याकडे धाव असलेले केवळ इंद्रियांच्या विषयात रमणारे इतरेजन आणि शुद्ध अशा इंद्रियातीत रसाचे पान करणारे आपण म्हणजे कवी यांमधील येथे वर्णिलेली तफावत ही लक्षात घेण्यासारखी आहे.

सर्वसामान्य लोक ज्या विषयांचे किड्यांप्रमाणे केवळ वरवरचे इंद्रियसुख घेतात ते इंद्रियजन्य ज्ञानाचे विषय होत. अशा प्रकारच्या विषयांबद्दल बी कवींनी इतरत्र काढलेले उद्‌गार असे आहेत.

' स्वैरते 'ला उद्देशून केलेल्या कवितेत ते म्हणतात,

विषयांची निर्मात्री ती तू, विषय कोणता देउ तुला ?

(स्वैरगीत)

' विचारतरंग ' या कवितेत,

धूमकेतु गगनी आला विषय असे ह्या कवनाला

अशी सूचना केली आहे. ' प्रभात पोवाडा ' या गीतात,

असे विषय गायाचा एकच अक्षयचा त्याचा

असा उल्लेख आहे. ' एक दृश्य ' या काव्यात मात्र—

तन्मयता ती चिन्त्य वस्तुच्या खोल अंतरी शिरते
बहिरंगाच्या वरते नुसते फेरे घालित नसते !

असे म्हटले आहे. केवळ बहिरंगावर फेरे घालणारे ते ' विषय ' आणि चिन्त्य वस्तूच्या अंतरंगात शिरणारी तन्मयता म्हणजे ' शुद्ध रसपान ' अशी येथे सूचना मिळते बाह्य विषय आणि शुद्ध रसपान यांच्यातील अंतरावर ' काव्यानंद ' या कवितेने विशेष प्रकाश टाकलेला आहे—

सारीही जड इंद्रिये न शकती येथे प्रवेशावया
बुद्धिग्राह्य न वाव त्यास, न कळे ठाव प्रमाणत्रया.
वृत्यन्तर्गत टाकणे कठिणता तद्रूपता पावणे
काव्यानंदरसप्रसंग मग हा निस्संग संभोगणे !

जड इंद्रियांचे विषय हे काव्यानंदाचा रसप्रसंग उपभोगू शकत नाहीत. ' जन विषयांचे किडे ' या शब्दांत ज्यांना काव्यानंदाची प्राप्ती होऊ शकत नाहीं, त्यांच्याविषयी उपहास व्यक्त झाला आहे आणि ' आपण करू शुद्ध रसपान ' येथील ' रसपान ' म्हणजे ' काव्यानंदरसप्रसंग ' होय अशीही सूचना मिळत आहे. तद्रूपता पावल्या-शिवाय काव्यानंदाचा आस्वाद घेता येत नाही, हे स्पष्टच आहे.

' रूपमुग्धा ' या कवितेत बी कवींनी म्हटले आहे—

रसास्वादनोचित विषयांचे केवळ करिता येते—
स्वसंवेद्य आस्वादन; तेथे वाचा स्तंभित होते !

जे रसास्वादनाला उचित आहेत अशा विषयांचे आस्वादन केवळ स्वसंवेद्य असते. वाचेला त्यांचे वर्णन करता येत नाही. कारण आपली सर्वसामान्य माणसाची वाणी ही जड आहे. दिव्य भोगांच्या खाणी गाय मनोमय वाणी। कशी वदेल राठ वैखरी-ग, हे ' वेडगाणे ' मधील उद्गार प्रसिद्धच आहेत.

बाह्य विषयांच्या पलीकडे असलेल्या काव्यानंदाचा आस्वाद घ्यावयाचा झाल्यास तन्मयता व तद्रूपता या गोष्टींची आवश्यकता आहे, हे वरील उताऱ्यांवरून स्पष्ट झाले आहे. याच तद्रूपतेच्या वर्णनाने ' चाफा ' कवितेचा समारोप केलेला आहे.

दिठी दीठ जाता मिळुन
गात्रे गेली पांगळुन
अंगी रोमांच आले थरथरून. ११

चाफा फुली आला फुलुन
तेजी दिशा गेल्या आटुन
कोण मी—चाफा ? कोठे दोघेजण ? १२

नवव्या कडव्यात ' आपण दोघेजण ' असा उल्लेख आहे. आपण दोघेजण इतरांपेक्षा वेगळे कसे आहोत असे सांगून, शेवटच्या दोन कडव्यांत हृदय आणि आत्मा यांचे मिलन कसे झाले याचे वर्णन आहे. कविहृदय म्हणते, आतापर्यंत मी आत्म्याची मनधरणी केली आणि नंतर मी त्याला आपण आता विश्वभर क्रीडा करू, गुह्यरस पान करू, असे म्हटल्याबरोबर आमची दृष्टीला दृष्टी मिळाली, गात्रे गळून गेली, अंगप्रत्यंगांचे व्यवहार थांबले, देहभान गळून गेले, शरीरावर रोमांचादी सात्त्विक भाव आपोआप उमटून आले. कविहृदयाने केलेला आत्म्याला फुलविण्याचा यत्न सरतेशेवटी सफल झाला. आता हृदयाचा संकल्प आणि त्याची काव्यरूपाने झालेली फलप्राप्ती यांची एकरूपता झाली. हृदयाची सात्त्विक भावामुळे बहरून आलेली ही अवस्था बी कवींच्या इतरत्र आलेल्या शब्दयोजनेशी जुळणारी आहे (' सद्गदित हृदय तद्गात्रांतह थरथरले–' वात्सल्य ').

कविहृदयाने केलेला काव्यनिर्मितीचा संकल्प सफल झाला. अर्थात काव्यरूपी चाफा आता फुलांनी बहरून आला.

' फुली फुलणे ' हा वाक्यप्रयोग ज्ञानेश्वरांनी दोन ठिकाणी वापरलेला आहे—

कां वांझां फूलीं फुललें । झाड जैसें ।। ज्ञा. ९–४३०
मग हे रसभावफूलीं फुलैल । फुलैल नाना फळभारें भरैल ।। ज्ञा. ११-२०

काव्यनिर्मितीचा संकल्प आणि त्याला आलेले फळ म्हणजे काव्याचा आविष्कार यांच्या अद्वैताचे येथे ' तेजी दिशा गेल्या आटुन ' या शब्दांत वर्णन केले आहे. ' रूपमुग्धा ' या कवितेतील पुढील वर्णन येथे ताडून पाहावे—

नेत्रांतिल तेजाची कलिका इकडे तिकडे नाचे
जीवभाव एकत्र होउनी त्या त्या ठायी साचे.
सभोवार तेजाची निर्मळ चादर पसरत जाते
जीव उडी घे त्या मृदु शय्येवरती लोळायाते.

तेजाच्या प्रकर्षामुळे सर्व दिशा कशा समाकुल होतात याचे ज्ञानेश्वरांनी केलेले वर्णन पाहावे—

जें कां द्यौर्लोकपाताळ । पृथिवी हान अंतराळ
अथवा दिशाविदिशा समाकुळ । दिशाचक्र ।। ज्ञा. ११·३१०

बी कवींनी ' बुलबुल ' या कवितेत ' दिशा फाकती, तेज उगवते ' असे म्हटले असून ' चांदणी ' मध्ये, चांदणीच्या निमित्ताने ' बालकवीं ' ना उद्देशून—

दिव्य तव तेजी मिसळू दे
शुद्ध अद्‌भुतरस उसळू दे

असे उद्‌गार काढले आहेत. अंधाराचे आणि तेजाचे भान राहिले नाही तर सर्व दिशाच आटून जातात, असेही उद्‌गार बी कवी ' आशादेवी ' या कवितेत काढतात—

तेथे पश्चिम-पूर्व कोण कुठल्या ? साऱ्या दिशा आटता.

काव्यरूपी चाफा फुलांनी बहरून आला, एक प्रकारच्या दिव्य तेजामुळे दिशा आटून गेल्यासारखी परिस्थिती निर्माण झाली. अशा परिस्थितीत ' मी आणि चाफा ' असे द्वैत उरले नाही. कवीला काव्यप्रवृत्त करणारे कविहृदय आणि कवीचा आत्माविष्कार म्हणजे त्याचे काव्य यांच्यामध्ये भेदभाव राहिला नाही. मी म्हणजे काव्यनिर्मितीचा संकल्प करविणारे कविहृदय वेगळे आणि काव्यरूपी आत्माविष्कार करणार-कवी वेगळा अशी परिस्थिती उरली नाही. कारण आता आम्ही ' दोघे जण ' कोठे आहोत ? आम्ही तर एकरूप होऊन गेलो आहो.

' फुलांची ओंजळ ' या कवितेत सृष्टी आणि कवी याची एकरूपता वर्णन करताना कवींनी ' सान्त अनन्ताची मिळणी ती ' आणि ' कवीच झाला सृष्टी सारी सृष्टी झाली कवी ' असे उद्गार काढले असून कवी हा ' मृदु मधुरोज्ज्वल गीते गाउनि तेजोबल वाढवी ' असाही विचार व्यक्त केला आहे.

नवव्या कडव्यात आम्हाला आंदण दिलेले विश्वाचे आंगण ' आपण दोघे ' उणे करू असे म्हटले आहे; पण आता काव्यरूपी चाफा फुली फुलून आला असता व या त्याच्या टवटवीमुळे सर्व दिशा जणू काही आटून गेल्या असता चाफा आणि मी ( कविहृदय ) यांचे वेगळेपण उरले नाही. ' कोठे दोघे जण ? ' असा ' दोघे जण ' हा शब्दप्रयोग पुनः करून दोघे एकरूप झाल्याचे अर्थात् दोघांचे मिलन झाल्याचे ध्वनित केले आहे.

ध्रुवपदात चाफा बोलेना, चाफा चालेना, चाफा खंत करी, काही केल्या फुलेना, अशी परिस्थिती होती. त्याची खेळपणी व आळवणी करण्याचे अनेक प्रयत्न केल्यानंतर त्याची केलेली मनधरणी व समजावणी सफल झाली व सरतेशेवटी चाफा फुलांनी मोहरून आला. त्याच्या तेजाने दिशा आटून गेल्या, मी आणि चाफा असे द्वैत उरले नाही, असा कवितेचा शेवट झाला आहे.

वर दिलेला कवितेचा वाच्यार्थ आहे, पण तिचा ध्वन्यर्थ चाफा हे कशाचे तरी ' प्रतीक ' मानून करावा लागतो व तसाच प्रयत्न आजवरच्या अनेक टीकाकारांनी केला आहे. प्रस्तुत लेखात चाफा हे काव्यकृतीचे प्रतीक मानून संपूर्ण कविता म्हणजे आपल्या आत्म्याने विकसित व्हावे व फुलावे म्हणजेच त्याचा आविष्कार काव्यरूपाने

प्रकट व्हावा म्हणून कविहृदयाने केलेले प्रयत्न व त्या प्रयत्नांचे शुद्ध म्हणजे निर्द्वंद्व अशा काव्यानंदात झालेले पर्यवसान आहे, अशा अनुरोधाने या कवितेचा अर्थ लावण्याचा एक नवा प्रयत्न केला आहे.

हा नवा अर्थ लावताना बी कवींनी एका पत्रात " चाफ्यात हृदयाने आत्म्याला खेळविले आहे, हृदयाने आत्म्याला आळविले आहे " इतक्या स्पष्टपणे काढलेल्या उद्गारांचा आधार घेतलेला आहे. तो कितपत सुसंगतपणे घेता आला हे सहृदय व चोखंदळ रसिक ठरवितीलच. वर उल्लेखिलेल्या पत्रातच बी कवींनी " वेदान्तात ब्रह्म आणि माया ही एक प्रमुख जोडी आहे. यांनाच जीव–आत्मा, प्रकृति–पुरुष, हृदय–आत्मा इ. संज्ञा आहेत " असे स्पष्टपणे म्हटलेले आहे. हृदय आणि आत्मा हीच जोडी आधारभूत घेऊन ' चाफा ' या कवितेला आधारभूत झालेली ' दूर कोठे एकला जाउनीया ' ही केशवसुतांची कविता आहे.

मराठीतील या दोन श्रेष्ठ कवींनी मानलेली हृदय आणि आत्मा ही जोडी मान्य केल्यानंतर तिच्यामागील वेदान्त तत्त्वज्ञान उलगडून दाखविणे कठीण नाही.

आत्मा म्हणजे ' एकमेवाद्वितीयं ब्रह्म '. त्याचे वर्णन श्रुतीत ' एकाकी न रमते ' ' सोऽकामयत ' ' एकोऽहं बहु स्याम प्रजायेय ' या सुप्रसिद्ध शब्दांनी केले आहे. तो सत्, चित् आणि आनंद आहे व ब्रह्मानंद हा परमसुखद, केवल, द्वंद्वातीत आहे, हेही सर्वज्ञात आहे.

आत्म्याप्रमाणे चाफा देखील एकलकोंडा आहे. तो नेहमीच फुलणारा नाही. पण एकाकी आत्म्याप्रमाणे न रमणारा चाफा आदिसंकल्पामुळे ' बहु स्याम ' होणाऱ्या आत्म्याप्रमाणे ' आत्मक्रीड ' आणि ' आत्मरति ' होतो. कविहृदयाच्या खेळवणीला व आळवणीला हार जातो आणि फुली फुलून येतो.

' शुद्धाधिष्ठाना मुदमंगलमय संकल्पाचे ' मंडन होते. विश्वाचे शुद्ध अधिष्ठान असलेला आत्मा हा मुदमंगलमय संकल्पामुळे मंडित होतो, विकसित होतो, फुलून येतो, असे बी कवींनी ' कमळा ' या कवितेत सांगितले आहे.

बी कवींच्या संपूर्ण कवितेतील विचारसरणीच्या, शब्दयोजनेच्या आणि कल्पना-विज्ञानाच्या प्रकाशात वर दिलेला अर्थ हा ' चाफा ' या कवितेच्या आजवरच्या अनेक अर्थापेक्षा एक वेगळा आहे. या कवितेचा तो एकमेव अर्थ आहे असा काही दावा नाही. असा दावा कोणत्याही श्रेष्ठ कवितेबद्दल, कोणालाही, खुद्द कवीलादेखील, करता येणार नाही. वर दिलेल्या अर्थाशिवाय आजवर केले गेलेले इतर अर्थ चुकीचे आहेत, असेही येथे सुचवावयाचे नाही. प्राचीन विदर्भात जसा भारवी, तसे अर्वाचीन विदर्भात बी कवी हे अर्थगौरवासाठी सुविख्यात आहेत. त्यांच्या कवितेचे एकाहून अधिक अर्थ लावण्यात युक्तिवादालाच प्राधान्य मिळणार. सुबुद्ध वाचकांना त्यांपैकी कोणता युक्तिवाद अधिक पटेल, हे सरतेशेवटी त्यांच्यात तत्त्वान्वेषक आणि आणि निर्णायक न्यायबुद्धीवर सोपविल्यावाचून गत्यंतर नाही.

परिषदेची तीन नवी महत्त्वाची प्रकाशने

## मराठी-साहित्य-संमेलन : अध्यक्षीय भाषणे

साहित्य-संमेलनांच्या साऱ्या अध्यक्षांच्या भाषणांचा संग्रह.
पृष्ठे सुमारे १२००, साऱ्या अध्यक्षांची मोठ्या आकाराची
आर्ट पेपरवर छापलेली छायाचित्रे, संपूर्ण कापडी बांधणी,
उत्तम मोहोरेदार छपाई.

## म. सा. पत्रिका : लेखसूची

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या त्रेचाळीस वर्षांच्या १७२ अंकांमधील
सर्व लेखांची सूची. मौलिक संदर्भग्रंथ. पृष्ठे सुमारे ३००.

## म. सा. परिषद : इतिहास

दत्तो वामन पोतदार व श्री. शं. नवरे लिखित.
महाराष्ट्रातील आद्य वाङ्मयीन कार्याचा साधार, समग्र इतिहास.
पृष्ठे सुमारे ३५०.

महाराष्ट्र-राज्य-साहित्य-संस्कृति मंडळाकडून अनुदान मिळाल्यामुळे
अल्प किंमतीस मिळणार. प्रती मर्यादित.

अनुक्रमणिका

# पष्तो, पैशाची आणि मराठी

देविसिंग चौहान

---

भारतवर्षाच्या तीनचार हजार वर्षांच्या प्रदीर्घ कालावधीतील इतिहासात या देशातील बहुविध समाजजीवनाशी ज्या ज्या परदेशांचा संपर्क आला, त्यात अफगाणिस्तान या भूखंडाचा समावेश अग्रक्रमाने करावा लागेल. अफगाणिस्तान हे या भूभागाचे नाव तसे पाहिले, तर फारच उत्तरकालीन आहे. अवगाण या नावाचे अफगान हे रूपांतर आहे. अवगान ही संज्ञा सर्वप्रथम वराहमिहिराने ( मृत्यू शक ५०९ ) वापरलेली आहे. अवगाण वा अफगाण हे नाव या प्रदेशास ईराणी लोकांनी दिलेले आहे. या देशाचे खरे स्थानिक नाव पख्तूनिस्तान असे आहे. अवगाण हा शब्द अरियनगान् अथवा अइर्यनगान, एरान्गान या ईराणवाचक शब्दावरून निघालेला आहे असे आम्ही एका लेखात प्रतिपादिले आहे ( हा प्रबन्ध भारतीय इतिहास काँग्रेस, वाराणसी, १९६९ येथे वाचला आहे. ) त्याच लेखात मुंबई बृहन्नगरातील एरंगल, मध्यप्रदेशातील एरण ( एरिकिण ) व हरियाना ( हरीआण ) ही स्थलनामे या ईराणी शब्दांची भारतीय रूपांतरे होत, असे त्या लेखात प्रतिपादिलेले आहे. ईराणी व अरब विद्वानांनी अयगान, अफगान ही लोकवाचक संज्ञा इ. स. एक हजाराच्या सुमारास वापरली.

अफगाणिस्तान या प्रदेशावर प्राचीनकाली ईराण अथवा भारत या देशांचीच सत्ता चालत आलेली आहे. हखामनिश Achaemenian साम्राज्यकाली हा भाग त्या साम्राज्यात समाविष्ट होता. तदनंतर हलमंद ( प्राचीन सरस्वती ) नदीच्या मुखावरील शकस्तान, सजिस्तान, सइस्तान या प्रदेशात शक जमातीचे वर्चस्व स्थापन झाले. ते इ. स. पूर्व १५० च्या नंतर. त्यानंतर या प्रदेशावर कुषाणवंशीयांचे साम्राज्य होते. कनिष्काची सत्ता शक १ पासून २४ ( इ. स. १०२ ) पर्यंत होती. या कुषाणवंशीयांचे राज्य मथुरा

( मथुरा हे मधुरा शब्दाचे पैशाची रूप ) नगरीपर्यंत पसरले होते. तदनंतर श्वेत हूण ( पश्तो हूवन, रव्वन, खान ) या जमातीची सत्ता जावूल, जाबोल ( सङ्स्तान, हलमंद नदीचे मुख ) या राजधानीतून तोरमाण राजाने ( शक ४२२ ते ४३७ ) चालविली. त्याचा मुलगा मिहिरकुल याने शक ४६७ पर्यंत पश्चिम भारत व अफगाणिस्तानावर राज्य केले. इस्लामाचा उदय व सम्पर्क लागेपर्यंत या प्रदेशावर बुद्धधर्मीय अफगाण लोकांची सत्ता होती. मुहम्मद बिन कासिम याने भारताचा सिंध प्रान्त जिंकल्यापासून अफगाणिस्तानही हळूहळू अरबांच्या इस्लामी सत्तेत समाविष्ट झाला. अफगाणिस्तानावर बगदादच्या खलिफांची सत्ता शक ७९१ पर्यंत अव्याहतपणे चालू होती. या वर्षी जावूल, ( सङ्स्तान, अफगाणिस्तान ) येथे प्रबल बनलेल्या याकूब बिन लैस या सफ़्फ़ार ( तांबट, तांबटकर ) घराण्यातील सरदाराने खलिफाच्या गादीविरुद्ध बंड पुकारले व ईराण देशाची अस्मिता जागृत करण्यासाठी त्याने आपली शक्ती खर्ची घातली. शककालाच्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धापासून खलिफांची सत्ता नामधारी बनलेली होती. एव्हापासून अफगाणिस्तानला स्वतंत्र असे अस्तित्व येऊ लागले. गझनीचा महमूद व मुहम्मद गोरी हे या देशाचेच सत्ताधारी होते.

इ. सोळाव्या शतकाच्या आरंभी ईराणात सफवी साम्राज्याची स्थापना झाली व भारतात मुगल साम्राज्य स्थिरावले. मुगल साम्राज्याच्या काळात अफगाणिस्तानचा बराचसा भाग, निदान पूर्वप्रदेश मुगलांच्याच ताब्यात होता. अफगाणिस्तान आपल्या ताब्यात ठेवल्याने आपल्या साम्राज्याची पश्चिम सीमा सुरक्षित राहील अशी बाबरापासून औरंगजेबापर्यंत सर्वांची धारणा होती. या कल्पनेला नादिरशाह ( शक १६५८ ते १६७१ ) या अफगाण विजेत्याने मूठमाती दिली. नादिरशाहाने शक १६६० मध्ये दिल्ली लुटल्याची आठवण भारताला आहेच. परंतु भारताच्या या क्षणिक दुःखापेक्षा, ईराण देशाला अफगाण लोक व नादिरशाह यांची झळ फार काळ सोसावी लागली. शक १६४४ त अफगाण सेनेने शेवटच्या सफवी सम्राटाचा पराभव केला. आठ वर्षांनी नादिरशाह क्षितिजावर उगवला व त्याने संपूर्ण ईराण देशावर साम्राज्य स्थापिले. ईराण देशाच्या दीड हजार वर्षांच्या इतिहासांत तीन परकीय आक्रमणे ऐतिहासिक मानली जातात. शक ५५७ मध्ये अरबांनी सासान साम्राज्याचा केलेला अन्त. शक ११८० मध्ये खिलाफत मोंगोल टोळ्यांच्या हातून नष्ट झाल्याची घटना व शक १६४४ मध्ये अफगाण फौजांनी सफवी राजघराण्याचा केलेला नाश. ही शेवटची घटना अफगाण देशाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची होय. या घटनेमुळे अफगाण हे वेगळे राष्ट्र बनले. त्याला अस्मिता प्राप्त झाली. राष्ट्र म्हणून त्याला एक प्रकारचा स्वाभिमान व आत्मविश्वास प्राप्त झाला. यापूर्वी शेरशाह सूरी आदि अफगाण विजेत्यांनी भारतात राज्ये निर्माण केलेली होती. परंतु ती अफगाणिस्तानाबाहेर होती. उलट अफगाण देश मात्र भारत व ईराण येथील सत्तांमध्ये विभागला गेलेला होता. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे शककालाचे सतरावे शतक म्हणजे अफगाण लोकांत स्वत्व व अस्मिता निर्माण

होण्याचा काल होय. तेव्हापासून अफगाण देश बहुधा स्वतंत्र असून, वेगळा देश व राष्ट्र म्हणून त्याची जगाने दखल घेतलेली आहे.

**पष्तो भाषा**

अफगाण देश शक ७०० च्या सुमारास इस्लामधर्मीय बनत गेला. सर्व देश पहाडी असल्याने हे इस्लामीकरण हळूहळू झाले. ते इतके की पर्वतराजीतून वसत असलेल्या व काफिर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अनिस्लामी मोठमोठ्या जमातींचे इस्लामीकरण शककालाच्या सतराव्या शतकात व नंतर पूर्ण झाले. अफगाण लोक बुद्ध व हिंदुधर्मीय होते. इस्लामीकरणानंतर त्यांच्या भाषेवरही परिणाम झाला. अफगाण लोकांची भाषा पष्तो, पख्तो व त्यांचा देश पख्तूनीस्तान होय.

गेल्या शे-दोनशे वर्षांपासून जेव्हा पष्तो भाषेचा स्वतंत्र अभ्यास सुरू झाला. तेव्हा, पष्तो भाषेसाठी वापरण्यात येत असलेल्या अरबी लिपी आणि तीत असलेल्या अरबी शब्दांच्या बाहुल्यामुळे, पष्तो भाषा ही अरबी भाषेची एक उपभाषा आहे असा एक विचार तत्कालीन लेखकांनी मांडलेला होता. परंतु ही गोष्ट आता विद्वानांनी खोटी ठरविलेली आहे. पष्तो, पख्तो, पष्तू–पख्तू ही भाषा भारेराणी ( भारत–ईराणी Indo–Iranian ) वंशाची असून ती ईराणी या विशाल भाषासमूहातील एक प्रमुख भाषा आहे असा पाश्चिमात्य व पौर्वात्य विद्वानांचा निष्कर्ष आहे. दार्मेस्तेतर या जर्मन विद्वानाचे असे मत आहे की ती अवस्था भाषेची खरीखुरी वारस व प्रतिनिधी आहे. या भाषेतच जरतुष्ट्राच्या शिकवणीची सांस्कृतिक परंपरा प्राप्त होते. ज या मूळ तालव्याचे दोन तीन नवीन वर्त्स्य उच्चार ईराणी भाषेच्या मध्ययुगीन जंद भाषेतून आधुनिक पष्तो भाषेत आलेले आहेत, असे विद्वानांचे मत आहे. मूळ क या संस्कृत ध्वनीचे पष्तो भाषेत ज, झ रूपाने होणारे ध्वन्यन्तरही जंद भाषेच्या वारशामुळे घडून आले असे विद्वान मानतात. परंतु याच्याच बरोबरीने प्राकृतमध्ये आढळणारे दन्त-मूलीय वर्ण ( ठ, ढ सोडून ट वर्ग ) पष्तोने आत्मसात केलेला आहे, हेही विसरता येत नाही. प्राकृत भाषांनी श्, ष् यांना खो दिलेला असला तरी, पष्तो भाषेने मात्र त्यांना आपल्या कुशीत सामावून घेतलेले आहे. आश्चर्य हे की, ण हे अनुनासिकही एक प्रकारे या भाषेत उपलब्ध आहे. प्राकृत भाषेतील फार मोठे शब्दभाण्डार शुद्ध पष्तो शब्दांच्या रूपाने या भाषेत वावरत आहे. नव्य आर्यभारतीय भाषांपैकी सिंधी भाषेची पष्तो भाषेशी विशेष सलगी आहे. पष्तो भाषेतील नामांची विभक्तिरूपे आणि क्रियापदांची वावरणी बरीचशी सिंधी भाषेच्या वळणावर आहे.

हलमंद ( सरस्वती ) नदीच्या सपाट व सुपीक खोऱ्याशिवाय भारतातल्यासारखी नद्यांची खोरी अफगाणिस्तानात नाहीत. सर्व देश उंच उंच पर्वतराजी व पठारांनी व्याप्त आहे. अफगाण लोकांच्या कोटी सव्वाकोटी संख्येपेक्षा बहुसंख्य लोक डोंगरी भागात राहातात. लोकांतील शिक्षणाचे प्रमाण जेमतेम १० टक्क्यांपर्यंत आहे.

या सर्व नैसर्गिक परिस्थितीचा परिपाक म्हणजे पष्तो भाषेच्या अनेक बोली आढळून येतात. शास्त्रज्ञांनी मानलेल्या चार-पांच मुख्य बोलीहून कितीतरी अधिक बोलींचा उल्लेख मोर्गन्स्टर्न याने आपल्या ' ॲन एटिमॉलॉजिकल व्होकॅब्युलरी ऑफ पष्तो ' ( इ. १९२७ ) या व्युत्पत्तिशास्त्रीय छोट्याशा ग्रंथांत केलेला आहे. जितका शिक्षणाचा प्रसार कमी आणि सामान्य जनतेची शिक्षणाची पातळी कमी, तितक्याच प्रमाणात बोली अधिक संख्यांनी असतात व जगतात. शिक्षणाची वाढ व प्रमाणभूत एकाच राष्ट्रीय भाषेचा विकास म्हणजे निरनिराळ्या बोलभाषांची मुमूर्षू अवस्था. अफगाणिस्तान देशातील शिक्षणाचा अभाव हा तेथील अनेक बोली जीवित असल्याचा दाखला होय.

पष्तो भाषा बोलणारे लोक म्हणजे पष्तून. पश्चिम अफगाणिस्तानात पष्तून हा उच्चार रूढ आहे. पूर्व अफगाणिस्तान भागात याच शब्दाचा उच्चार पख्तून असा करितात. हा भारतीय सान्निध्याचाच प्रभाव होय. भारतात ष आणि ख यांच्या उच्चारांत अभिन्नता असलेली सर्वप्रसिद्धच आहे. मराठी भाषेतही उखाहरण का उषाहरण हा प्रश्न सर्वज्ञात आहेच. पष्तून शब्दात मूळ शब्द पक्थ आहे असे विद्वान मानतात. पक्थ हा शब्द ऋग्वेदात लोकसमुदायवाचक म्हणून आलेला आहे. इ. सनाच्या पहिल्या शतकात या लोकांचा **पख्तून** असा उल्लेख हिरोडोटस याने केलेला आहे. आजच्या अफगाण लोकांचे पख्तून लोक पूर्वज होत. या पष्तून वा पख्तून लोकांनाच भारतीय पठाण म्हणतात. पष्तो भाषेत महाप्राण उच्चार नसल्याने अफगाण हा शब्द पटाण असा उच्चारतात. अरबी भाषेत पटाण वा पठाण हा शब्दच नाही. कारण त्या भाषेत प आणि ट, ठ हे वर्ण मुळात नाहीतच. हा शब्द ईराणीदेखील नव्हे. भारतात अफगाण लोकांना कधी कधी रोहिला असे म्हणण्यात येते. अफगाण आपल्या प्रदेशाला रोहपर्वतमय असे म्हणतात. रोह हे विशेषनाम असून त्याचा अर्थ पाहाडी प्रदेश असा आहे. परंतु हे नाव भारतातील सखल प्रदेशाच्या अनुषंगाने वापरण्यात येते. रोह शब्दावरून रोहिला हे अफगाण लोकांसाठी तिसरे नामकरण होय. सिंधी भाषेत डोंगराळ प्रदेशाला रोहु असे म्हणतात. पष्तो भाषेत **रोहिलै** म्हणजे पर्वतनिवासी असा शब्द वापरला जातो. भारतातील रोहिलखंड हा प्रदेश या अफगाण लोकांच्या एका काळच्या संचार व सत्तेची खूण म्हणून शेष आहे.

## महाराष्ट्रात अफगाण

ऋग्वेदातील पक्थ लोकानंतर ऐतिहासिक दृष्ट्या शक लोकांचे उल्लेख आढळतात. हे लोक मूलतः उत्तर अफगाणिस्तान व त्याच्याही उत्तरेस सोगदिया प्रदेशात राहत. हिरोडोटस याने या शकांचा Scythians असा उल्लेख केलेला आहे. हखामनिश राजवंशाच्या दारयवहू या सम्राटाच्या ( इ. स. पूर्वी ५२१ ते ४८६ ) शिलालेखांतून या शकवंशीयांच्या तीन गटाचे उल्लेख आलेले आहेत. हे आर्यवंशीय लोक आहेत असे त्यांच्या भाषा, वेश व संस्कारादींवरून हर्जफेल्ड आदि प्राच्यविद्याकोविदांनी

प्रतिपादिलेले आहे. गौतमबुद्धाच्या अगोदर एकदोन शतके तरी हे लोक भारतातही वावरत होते असे वाटते. गौतमबुद्ध हा शाक्यमुनि होता हे अश्वघोषाच्या बुद्धचरिता-वरूनही आढळते. अमरसिंहाने आपल्या कोशात बुद्धाला शाक्यवंशीय सम्राट म्हणून वर्णिले आहे. कुषाणवंशीय सम्राट कनिष्काच्या एक शतक अगोदर झालेल्या सूरेन राजवंशीतील प्रथम अयस ( Azes : इ. १०–३५ ), अयिलिष ( Azilises इ. ३०–४० ), शोडास ( Sodasa : इ. स. १५ ते २५ ) गुंदुव्हरस (Gondophernes इ. ४६), अश्पवर्म इत्यादी राजे शक जमातीतील होते असे आता हर्जफेल्ड आदि विद्वान् प्रति-पादितात. कुषाणवंशातील राजे कनिष्काच्या अगोदर उदयाला आलेले दिसतात. कुषाण हा राजवंश शकवंशीयच होय. या सर्व राजांची सत्ता वायव्य भारतात होती. ते एरण व मथुरेपर्यंत पसरलेले होते. त्यांचे प्रस्तलेख खरोष्ट्री लिपीतील प्राकृत भाषेत उपलब्ध आहेत. याच शक सम्राटांचे क्षत्रप, महाक्षत्रप एरण आणि सौराष्ट्रातील गिरीनगर–गिरनार येथे शककालाच्या पहिल्या शतकापासून नांदत होते. गिरीनगरचा रुद्रामन् सर्वप्रसिद्धच आहे. रुद्रामन् आणि नहपानाचा जावई व दखमित्रा ( दक्षमित्रा ) हिचा नवरा उषभदत्त हे महाराष्ट्राच्या चांगले परिचयाचे आहेत. रुद्रामनाने सातवाहन राजाचा पराभव केलेला होता. उषभदत्ताचे शिलालेख नासिक आदि ठिकाणच्या शैलगृहांतून सापडतात. रुद्रामनाचा वंश गुजरातेत शककालाच्या तिसऱ्या शतकापर्यंत चालू होता. शक लोक गौतमबुद्धाचे अनुयायी बनलेले होते. शाक्य भिक्षू म्हणून प्रस्तलेखांतून उल्लखित भिक्षू शक जमातीतील होते, असा निष्कर्ष आता विद्वानांनी काढलेला आहे. अशा शाक्य भिक्षूंनी दिलेल्या अनेक दानांचे उल्लेख महाराष्ट्रातील अनेक लेण्यांतील अनेक शिलालेखांतून सापडतात. असे उल्लेख सातवाहन राज्यकालापर्यंत सापडतात.

ईराणी परम्परेत मुरलेले व अफगाणिस्तानात ग्रीक विजेत्यांच्या संपर्कात वाढलेले हे शक लोक नाणी पाडीत. त्यांची नाणी पश्चिम भारतात सर्वत्र सापडलेली आहेत. नासिक, अकोला, अमरावती जिल्ह्यांतून त्यांच्या हजारो नाण्यांचे संच आतापर्यंत हाती आलेले आहेत. असा एक नुकताच सरकारला सापडलेला प्राचीन नाण्यांचा संच, नाणकशास्त्राचे तज्ज्ञ व शिक्षण-विभागाचे एक माजी आय. सी. एस. सचिव, गेल्या आठ-दहा वर्षांपासून नुसतेच दाबून बसलेले आहेत, अशी तक्रार एका महामहोपाध्या-यांनी केल्याचे आमच्या कानावर आहे. शकक्षत्रप-महाक्षत्रपांची अनेक नाणी भूतपूर्व हैद्राबाद संस्थानातही सापडलेली आहेत. रुपिअम्म या महाक्षत्रपाची एक विजययष्टी खांबपोनी येथे वैनगंगा नदीच्या काठी सापडलेली प्रकाशात आलेली आहे. थोडक्यात सांगायचे म्हणजे या शकक्षत्रपांचा संचार महाराष्ट्रात शककालाच्या चौथ्या शतकापर्यंत चालू होता. शकांचे एक राज्य एरणमन्दसौर–उज्जयिनी या प्रदेशात चालू होते. ते औलिकर राजघराणे होय. ईराणी वा अफगाण शकलोकांचे ते राज्य होते असे एका लेखात आम्ही दाखविलेले आहे. हे राज्य दीडदोनशे वर्षे चालले होते. वराहमिहिर हा

ज्योतिर्विद् याच राजदरबारात होता असे वाटते.

## महाराष्ट्रधर्म

महाराष्ट्रधर्माचा उद्‌गम व विकास असा एक प्रबंध आम्ही कोल्हापूर येथे शिवाजी विद्यापीठातर्फे झालेल्या मराठा इतिहास-संबंधी परिसंवादात वाचलेला आहे ( २८ मे १९७० ). तो मुंबईच्या इतिहास आणि संस्कृति या त्रैमासिकात प्रकाशित होत आहे. या लेखात मांडलेल्या मुद्द्यांच्या संबंधित भागाचा सारांश येथे देणे इष्ट होईल. क्षत्रराष्ट्र हा शब्द नहपान या महाक्षत्रपाच्या ( कारकीर्द शक ४१, ४२, ४५ ) तीनचार शिलालेखांत त्याचे विशेषण म्हणून प्रयुक्त आहे. शक जमातीच्या अस्मितेचा हा शब्द दर्शक आहे. शकक्षत्रप राजा श्रीधरवर्मा याच्या शक २१५ तील एरण येथील शिलालेखात 'क्षत्रराष्ट्रस्य धर्मान्' असा प्रयोग आलेला आहे. या सुगाव्यावरून शक जमातीत आपल्या शकराष्ट्राच्या धर्माची कल्पना वावरत होती. श्रीधरवर्म्याच्या दोन प्रस्तरलेखांवरून या धर्माची अंगेही निश्चित करता येतात. महाराष्ट्रात महाराष्ट्रधर्म, या कल्पनेचा सर्वप्रथम उल्लेख महिकावतीच्या बखरीत ( लेखनकाल शक १३७० ) सापडतो. ही बखर रामदासस्वामी व मराठीतील तदुत्तर उल्लेख यांच्या या कल्पनेच्या वैशिष्ट्यांची, श्रीधरवर्मा याच्या शिलालेखांतील वैशिष्ट्यांशी त्या लेखात तुलना केलेली आहे. या तुलनेवरून महाराष्ट्रधर्म या कल्पनेचा उगम शक लोकांच्या क्षत्रराष्ट्रधर्म या कल्पनेतून झाला असे प्रमेय या लेखात मांडलेले आहे. महाराष्ट्रधर्माची स्फूर्तिदेवता जगदम्बिका तुळजाभवानी मानण्यात येते. तुळजा या देवीचे दुसरे नाव तुकाई असे आहे. पैशाची भाषेच्या नियमानुसार सं. दुर्गा शब्दाचे तुक्का असे रूप होते, हे अनेक प्राकृत वैयाकरणांनी सांगितलेले विद्न्मान्य आहे. तुळजा, तुरजा शब्ददेखील वेगळ्या परिस्थितीत दुर्गा शब्दाचेच रूप होय. भारताच्या वायव्य कोपऱ्यातील लोक जी प्राकृत भाषा बोलत ती पैशाची भाषा होय. हे लोक अफगाण लोकच होत. प्राचीनकाली अफगाण लोकांची शक जमात भारतात वावरत होती हे आपण पाहिलेच आहे. हे शक लोक ज्या प्रकारची अपभ्रष्ट प्राकृत येथील सर्वसाधारण लोकांहून वेगळी बोलत, ती पैशाची प्राकृत होय असे आमचे मत आहे.

## शकावशेष स्थलनामे

महाराष्ट्रातील शक, अफगाण लोकांच्या संचाराची प्रतीके म्हणून वरील लेखात आम्ही काही प्रदेशनामे व स्थलनामे यांची चर्चा केलेली आहे. प्रदेशनामे बागलाण व कळवण ही नासिक जिल्ह्यातील नामे लक्ष्य आहेत. नहपान, उषभदत्त ( ऋषभदत्त) यांची पूर्वपदचिन्हे लक्षात घेतली तर ही प्रदेशनामे विचारणीय ठरतात. हिंगोली, (गड) हिंगलज ( कोल्हापूर ), हिंगलजवाडी ( तेरसमीप ), धाराशीव ( उस्मानाबाद ) ही

स्थलनामे दक्षिण बलुचिस्तानातील हिंगुलजा नदीच्या परिसरात प्राचीनकाळी असलेल्या हिंगुलजा देवीच्या या महाराष्ट्र प्रदेशातील प्रभावाची स्मारके होत. हिंगुलजा हे त्या भागात महादेवपत्नी दुर्गा–पार्वतीचे–नामान्तर आहे. परवा कळले की औरंगाबाद शहरातही हिंगुलजा देवीचे एक छोटे देऊळ आहे. असे देऊळ हिंगलजवाडी तेर येथे असल्याचे मला ठाऊक होते. पष्तो भाषेच्या व्युत्पत्तिशास्त्रानुसार अजत्ता शब्द अर्हन्तक ( म्हणजे बौद्ध धर्मगुरू ) यापासून आणि कार्ले प्राचीन वल्लूरक शब्दापासून झालेला आहे असे आम्ही प्रतिपादिलेले आहे. सं. ' ह ' ध्वनीचा ' ज ' आणि ' व ' ध्वनीचा ' क ', ' ग ' होणे ही पष्तो भाषेतील नित्याची प्रक्रिया आहे. मध्यप्रदेशातील एरण ( प्राचीन एरिकिण, ऐरिकिन ) ईराण या देशनामाची भाषाशास्त्रीय भारतीय अपत्ये होत. बृहन्मुंबईतील एरंगल हे खेडे एरण शब्दाचे सहोदर आहे. केज ( धाराशीव विभागातील तालुक्याचे ठिकाण ) हे स्थाननाम बलुचिस्तानातील केच या प्रसिद्ध स्थानाचे स्मृतिरूप आहे. केच हे स्थान सम्राट हर्षकालीन व तत्पूर्व आहे.

## पष्तो व मराठी

पष्तोच्या मराठीशी सम्पर्काची चर्चा करताना शकखोतनी भाषेची दखल घेणे अत्यावश्यक आहे. अखिल नव्य आर्यभारतीय भाषांपैकी फक्त मराठी भाषेतच च–वर्ग या तालव्यांचे भिन्न उच्चार होतात. च्, ज्, हे वर्त्स्य – स्पर्शवर्ण्य अल्पप्राण आणि छ्, झ् हे वर्त्स्य महाप्राण फक्त मराठीतच उपलब्ध आहेत. याचा थोडासा ऊहापोह डॉ. द. ह. अग्निहोत्री ( मराठी वर्णोच्चारविकास, नागपूर, श. १८८५ ) यांनी केलेला आहे. अशाच प्रकारचा या तालव्यांचा वर्त्स्य उच्चार पष्तो भाषेत रूढ असल्याची चर्चा ट्रम्प याने ( पष्तो व्याकरण, इंग्रजी, इ. १८७३ ) केलेली आहे. च–वर्ग वर्णांचे ईराणी ( म्हणजेच फार्सी ) आणि संस्कृत उच्चार समान आहेत. ईराणी चश्म आणि संस्कृत चक्षु यांतील च–वर्णाचा उच्चार तालव्य होतो. परंतु पष्तो भाषेत, मराठीतल्याप्रमाणे, काही विशिष्ट शब्दातील च या वर्णाचा उच्चार वर्त्स्य होतो, याची ट्रम्प याने ही उदाहरणे दिलेली आहेत : च़ारी ( हेर, सं. चार ), च़डह ( एकटा, सिंधी छड़ही, मराठी सडा ), ज्वान ( ईराणी जुवान, सं. युवा ), ज़ोलई ( सिंधी झोली, मराठी झोळी ), ज़नह ( ईराणी जनख, म. हनुवटी ), षज़ह ( स्त्री, युवती, सं. सखी )

शकांच्या खोतनी भाषेत या तालव्याचे वर्त्स्य उच्चार होतात ही गोष्ट, कोनौ, बरो, बेली आदी विद्वानांनी सर्वत्र नमूद केलेली आहे. कोनौ याने आपल्या व्याकरणात याची चर्चा केलेली आहे ( पाहा – शक स्टडीज, ऑस्लो, इ. १९३२, पृ ११ आदि ). च़ार्ब ( मराठी-चरबी), संच़ार ( सं. संसार ), ज़नीन्दि ( = ते हत्या करतात, सं. हन् ), पंज़ ( सं. पञ्च ) इत्यादी शब्दांचा त्याने उल्लेख केलेला आहे.

पैशाची भाषेत या ध्वनींचा विचार शेष राहिलेला नाही. परंतु तो मूलतः असला पाहिजे. कारण तो मराठीत शेष राहिला आहे. मराठी ही अगदीच दक्षिणेतील नव्य

भारतीय आर्यभाषा. तिचा प्रदेश अन्य आर्यभारतीय भाषाप्रदेशांपासून विन्ध्यसात-पुडा आणि सह्याद्रि पर्वतराजीने वियुक्त झालेला आहे. गुजराथी, मारवाडी, मालवी आदि भाषांतील वर्त्स्य उच्चार भारतीय प्राकृतादी भाषाप्रभावाने पुसून गेले. परंतु महाराष्ट्र दूरस्थ व वियुक्त असल्याने हे वर्त्स्य उच्चार येथे बद्धमूल झाले. या ध्वनींचा इतिहास ध्यानात घेणे अत्यावश्यक आहे. ही या वर्त्स्य उच्चाराची उत्पत्ती आपण विचारात घेतली पाहिजे.

आता शक जमात व त्यांची मूळ पश्तो भाषा यांचा मराठी भाषेवर काही प्रभाव पडलेला आहे की काय हा प्रस्तुतचा मुख्य विषय पाहाणे आहे. महाराष्ट्र धर्मावरील प्रवचनात मराठी भाषेतील 'की' या उभयान्वयी अव्ययाची चर्चा आम्ही केलेली आहे. सर्वप्रथम गोष्ट ही की हा 'की' उभयान्वयी मुस्लिम संपर्काने ईराणी (पार्सी, फार्सी) भाषांतून आला हे वि. का राजवाडे आदींचे म्हणणे अप्रमाण होय. ही गोष्ट आम्ही यापूर्वी मांडलेली आहे. ( पाहा : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, क्रमांक १६३, पुणे, श. १८८९). तदनंतर एका लेखात हा 'की' शक जमातीच्या भारतातील व महाराष्ट्रातील प्रभावामुळे मुसलमान विजेत्यांचे पाय महाराष्ट्र भूमीला लागण्यापूर्वी, मराठीत प्रविष्ट झाला, असे आम्ही फार्सी, पश्तो, सिंधी, गुजरातीतील या अव्ययांच्या रूपांच्या अनुरोधाने प्रतिपादिलेले आहे. आता मराठी भाषेतील मराठी म्हणून समजल्या गेलेल्या आणि मुस्लिम संपर्कापूर्वी मराठी भाषेत वावरणाऱ्या काही शब्दांचा ऊहापोह करावयाचा आहे. हे शब्द मराठीत जरी वावरत असले तरी कृ. पां. कुलकर्णींच्या व्युत्पत्तिकोशात वा अन्यत्र त्यांची समाधानकारक व्युत्पत्ती सापडत नाही. ती पश्तो, पख्तो भाषेतील त्या त्या शब्दांच्या प्रपंचावरून हेरावयाची आहे. या कामी आम्ही ई. ट्रम्प्प या विद्वानाच्या 'ग्रामर ऑफ दि पश्तो, लंडन १८७३' आणि गार्ग मोर्गन्स्टर्न (Georg Morgenstierne) याच्या 'ॲन एटिमॉलॉजिकल व्होकॅब्युलरी ऑफ पश्तो, ऑस्लो, १९२७' या पुस्तकांचा उपयोग करीत आहोत. खालील चर्चेत पृष्ठांचे संदर्भ दुसऱ्या ग्रंथातीलच समजावेत. ट्रम्प यांचा मुद्दाम उल्लेख केला जाईल.

**फाळ**—नांगराच्या भूमीत घुसणाऱ्या भागाला फाळ म्हणतात. काही लाकडी नांगराला लोखंडी चपटे पाते बसविण्यात येते. त्यालादेखील फाळच म्हणतात. हा शब्द मराठीत अगदी जुना आहे. तो फल, फाल या रूपात ऋग्वेदात आहे, हे कृ. पां. कुलकर्णी आदींनी सांगितलेले आहे. तो ऋग्वेदात आहे हे त्याच्या प्राचीनत्वाचे दर्शक आहे. परंतु त्याची व्युत्पत्ती कशी या गोष्टीचा उल्लेख कोठे दिसत नाही. पश्तो भाषेतील व तिच्या अन्य बोलीतील या शब्दाची रूपे पाहिली म्हणजे एक नवीनच प्रकाश प्राप्त होतो. या शब्दाचे पश्तो रूप **स्पार** असे असून (पृ. ६८) त्याचा अर्थ Plough-share असा दिलेला आहे. या शब्दाचे ईराणी (फार्सी) भाषेतील रूप **सुपार** असे आहे. हा पश्तो शब्द ईराणीतून आला असावा, असे विद्वान मोर्गन्स्टर्न याचे म्हणणे आहे. परन्तु ते तर्कसिद्ध ठरू शकत नाही. ते ईराणीतून येण्याची मुळीच

गरज नाही. पश्तो भाषेची मायभूमी हीच अवेस्था भाषेची जन्मभूमी आहे. ऋग्वेदाचा प्राचीन भाग ( मंडल १, ८, ९ व १० सोडून ) अफगाणिस्तानात हलमंद (सरस्वती) नदीच्या परिसरात लिहिला गेला. असे एक विद्वन्मत प्रचारात आहे. असे असताना हा शब्द ईराणीतून पश्तो भाषेत येण्याची मुळीच गरज नाही. तो मूळचा याच भाषेतला असू शकतो. शिवाय भाषांच्या विकासावस्थांकडे पाहिले तर स्पार हे भाषिक रूप सुपार या रूपाहून प्राचीन आहे असे दिसून येते. ऋग्वेदातला फल, फाल हा शब्द देखील तद्‌भव स्वरूपात ऋग्वेदात प्रयुक्त झालेला आहे असे म्हणावे लागते. आर्यांच्या सर्व भारोपीय भाषांचे व संस्कृत भाषेचेही असे वैशिष्ट्य आहे की, बहुतेक सर्व शब्दांची व्युत्पत्ती धात्वनुसारी आहे. सर्वप्रथम मनात क्रियेची संवेदना उत्पन्न होते. तदनुसार धातूचे रूप शरीरधारी बनते. क्रियेच्या शब्दशरीरावरून अन्य अनेकानेक आनुषंगिक शब्द अस्तित्व पावतात. वैदिक स्कृ शब्दाचा प्रपंचविस्तार या दृष्टीने अत्यंत उद्‌बोधक आहे. प्रस्तुत प्रसंगी स्पार या पश्तो शब्दाचे मूळ सं. स्फर्–स्फार् या धातूत आहे असे वाटते. त्याचे प्रयोजकरूप स्फार–स्फारयति असे आहे. अर्थसंधारणाशास्त्राशी ही ( Semantics, Semasiology ) ही सूचना सुसंगत आहे. म्हणून स्पार या पश्तो शब्दाचे मूळ स्फर्–स्फार् या धातूत आहे असे आम्हाला वाटते. ऋग्वेदात या शब्दाचे **फल, फाल** असे तद्‌भव रूप झालेले आहे र आणि ल ध्वनींच्या अभेदामुळे ल ची अडचण नाही. पश्तो भाषेत ख आणि झ या ध्वनींखेरीज अन्य महाप्राण ध्वनी व वर्ण नाहीत. म्हणून स्पार हे पश्तो रूप अधिक मूलानुसारी आहे असे म्हणावे लागते. अनेक ईराणी बोलीत हा शब्द आहे. त्यातील रूपे अशी. सारिकोली–स्पुर, इश्काश्मी–उस्पीर, बखी–स्पून्दर, इत्यादी. पेशावरच्या परिसरात या शब्दाचे रूप सस्पोर :असे आहे. परची बोलीत फी–ए–शेदगार असे आहे. मोर्गनस्टर्न याने संस्कृत शस्त्र शब्दाचा व्युत्पत्तिदर्शक उल्लेख करून हे संशयास्पद आहे असे म्हटले आहे, ते योग्यच आहे. मराठी भाषेतील फाळ हा शब्द पश्तोतून आला नसून तो संस्कृतातूनच आलेला आहे.

**खोंड**—खोंड शब्दाचा उल्लेख कृ. पां. कुळकर्णीमध्ये आहे. त्यांनी कानडी कंदु म्हणजे वासरू, गोंडे म्हणजे बैल असा उल्लेख केलेला आहे. शेवटी षंढ म्हणजे बैल असे लिहून पुढे प्रश्नचिन्ह केलेले आहे. दातेकोषांत नवीन विशेष नाही. कृ. पां. कुळकर्णीमध्ये अथवा दातेकोषांत दुर्दैवाने शब्द सर्वप्रथम कोठे प्रयुक्त झाला, याची नोंद नाही. अशा ऐतिहासिक दृष्टीचा कोश मराठी अभ्यासूंना मिळेल तो सुदिन. तो किती दूर आहे, हे कोण सांगू शकेल ? पश्तो भाषेत (पृष्ठ ७१) स्खै, खै म्हणजे गाईचे वासरू असा शब्द व्युत्पादिलेला आहे. हजारा प्रदेशात याचे रूप स्खे असून, मोहमंद बोलीत ते स्वाइ, कोहात भागात स्वै, परंतु वजीरानी बोलीत स्सै असे आहे. पेशावर भागात याचे रूप खुसे आणि स्ख्वन्दर असून, वजीरानीत ते स्वन्दर असेही आढळते. या शब्दाची व्युत्पती– संस्कृत शक्कर–बैल आणि शक्करी–गाय यापासून दिलेली आहे. वरील रूपांपैकी पेशावरी स्ख्वन्दर आणि वजीरानी रूप

स्रवन्दर (स्रव्वन्दर) ही दोन्ही विशेष लक्ष्य आहेत. आर. एल्. टर्नर याने आपल्या तौलनिक आर्यभारतीय भाषाकोशात (इ. स. १९६६) खोंड म्हणजे लंगडा या शब्दाची चर्चा केली आहे. पण प्रस्तुत शब्द त्यात नाही. वरील चर्चेवरून खोंड शब्दाशी पेशावरी व वजीरानी बोलीतील पष्तो शब्द स्रव्वंदर शब्दाचे भरपूर साम्य आहे. साम्य दोन प्रकारांनी तुळावयाचे. एक ध्वन्यनुसार व दुसरे अर्थसंधारणेनुसार. या दोन्ही दृष्टींनीही खोंड हा शब्द वरील पष्तो शब्दाशी चांगला जुळतो असे वाटते. म्हणून हा शब्द पष्तो शब्दावरून व्युत्पादण्यासारखा आहे.

**चाळ**—चाळ हा शब्द मराठीत, तसेच हिंदी, गुजरातीत रूढ आहे. तो एकाच प्रांगणात घरांची रांग या अर्थाने आहे. मुंबई, पुणे, नागपूर इत्यादी औद्योगिक शहरांतील चाळी प्रसिद्ध आहेत. व्युत्पत्ति-कोशात या शब्दाची व्युत्पत्ति सं. शाला–साळ–चाळ अशी दिलेली आहे. परंतु या दोन्ही शब्दांतील अर्थसंधारणा अगदीच भिन्नभिन्न आहेत. म्हणून शाला शब्द अप्रस्तुत वाटतो. टर्नर साहेबांनी मराठीतील चाल (चालणे) व चाळा यासंबंधी चर्चा केली आहे; परंतु प्रस्तुत चाळीचा प्रश्न काढलेला नाही.

मोर्गेन्स्टर्न यांनी (पृष्ठ ३२) पष्तो कलै शब्दाची चर्चा केली आहे. हा शब्द अवेस्ता 'कत' म्हणजे घर शब्दापासून व्युत्पन्न असा सांगितला आहे. हा फार्सी भाषेत 'कद' रूपाने वावरतो. कद-खुदा (गृहस्वामी), कद-बानू (गृहस्वामिनी), कद-बाद (घरातील कारंजे), इत्यादी अनेक सामासिक शब्दांत तो आहे. पष्तो कलै म्हणजे ग्राम. त्यांनी असेही म्हटले आहे की, अफगाणिस्तानात एका घराच्या पाठ-भिंतीला, वा बाजूच्या भिंतीला लागून दुसरी घरे बांधण्याची पद्धत आहे. नेमकी हीच पद्धत भारतातही आहे. निदान महाराष्ट्रातील घरे तरी याच पद्धतीने बांधली जातात. हजारा प्रदेशात **काल** म्हणजे शेजार, तिरा भागात क्वाले ल म्हणजे घर, गृह, असे वापर लेखकाने नोंदविले आहेत. तसेच तिरा भागात चाल म्हणजे Village lane गावातील गल्ली असा शब्द दिला आहे. वजीरानी बोलीत चोल, चेल (म्हणजे गल्ली, आळी) अशी रूपे नोंदविली आहेत. शेवटी त्यांनी हा शब्द कात्या शब्दापासून निघाला असे प्रश्नचिन्हपूर्वक सुचविले आहे. टर्नर यांनी या मराठी 'चाळ' शब्दाची नोंद घेतलेली नाही. शब्दशरीर आणि अर्थसंधारणा दोन्ही दृष्टींनी मराठी चाळ शब्द पष्तो भाषेतील काही बोलीत काल अथवा चाल रूपात वावरणाऱ्या शब्दाशी सगोत्र आहे असे वाटते. यावरून मराठीतील चाळ शब्द पष्तो भाषेतून आलेला असावा.

**कळवा**—घोड्याच्या एका बाजूच्या दोन पायाला कानीने बांधतात. हेतू असा की ते उधळून जाऊ नये, फार लांब न भटकता, साधारणतः जवळच चरत राहावे. कानी बांधण्याच्या क्रियेस कळवा घालणे, तसेच दाव्यास कळवा म्हणतात. व्युत्पत्तिकोशात हा शब्द कळावा या रूपात दिलेला आहे, व्युत्पत्तिदाखल कानडी कळिवु–अडकविणे, सं. कलाप, प्राकृत–कलाप आदि उल्लेख आहेत. परंतु हे समाधानकारक मुळीच नाहीत.

टर्नरच्या कोशात शब्द नाही. मोर्गेन्स्टर्नने याने ( पृष्ठ ७८ ) ष्केल शब्द देऊन त्याचा अर्थ tying a horse's two feet, rope used for that purpose असा दिला आहे. व्युत्पत्ती अज्ञात आहे असेही सांगितले आहे. अश्व–घोडा शब्द सं. श्वल्, श्वल्ल् ( वेगाने पळणे, धावणे ) या धातूपासून बनलेला असावा. या शब्दांची नक्की व्युत्पत्ती सांगणे कठीण असले तरी मूळ संस्कृत किंवा अवेस्ता भाषेतील अश्व किंवा अस्प शब्दाशी संबंधित अशा एखाद्या शब्दापासून ष्केल शब्द व्युत्पन्न असला पाहिजे असे अनुमानता येते. मूळ सं. 'व' ध्वनीचा पश्तो भाषेत क उच्चार होतो. म्हणजे ष्केल शब्द ष्वेल, श्वेल यासारख्या शब्दापासून निघालेला असावा. अंतिम ल हा प्रत्यात्मकही असू शकतो. परंतु येथे मुख्य मुद्याची गोष्ट ही की, मराठीतील कळवा शब्द अफगाण लोकांच्या भारतातील सम्पर्काने तो पश्तो भाषेतून भारतात आलेला आहे. तो पंजाबी, सिंधी, मारवाडी, गुजराथी आदींतही असला पाहिजे असे अनुमान करण्यास तशीच सबळ ऐतिहासिक कारणे आहेत.

**चप्पल, चपल**—वहाणा या अर्थी. हा शब्द मराठी भाषेत नवीन आहे. व्युत्पत्तिकोशात नोंद करून तो हिंदीतून आला एवढेच सुचविले आहे. प्लॅट्सच्या ( Platts ) उर्दू-हिंदी-इंग्रजीकोशात ( ऑक्सफर्ड १९६८ ) हा शब्द संस्कृत चर्प अधिक ला या सामासिक शब्दापासून व्युत्पादिला आहे. परंतु मोनिअर वुइल्यम्स वेगळा चर्प शब्द देत नाही. वरील सामासिक शब्दही नाही. म्हणून व्युत्पत्तीचा मार्ग खुंटतो. मोर्गेन्स्टर्न ( पृष्ठ ५६ ) याने पश्तो पल (पद, पदचिन्ह) शब्दाची चर्चा करता तो शब्द अवेस्ता पद शब्दापासून निघाल्याचे सांगितले आहे. ईराणीत पै, पय म्हणजे पाय, पाऊल, पदचिन्ह असा शब्द आहे. वजीरानी बोलीत येबल्-एबल्, मानसेहरा–हजारा प्रदेशात खपे-अब्ल आणि पेशावर टापूत खपे-अब्ल् असे शब्द रूढ असून त्यांचा अर्थ Shoe असा आहे. या सामासिक शब्दातील अंतिम एबल-अब्ल् हा शब्दांश संस्कृत पद्य ( पद्, पद-पायासंबंधी ) शब्दापासून व्युत्पादिलेला आहे. पश्तो भाषेच्या स्वभावानुसार हे शक्य आहेच. 'द' ध्वनीचा 'र', 'ल' नित्य होतो. प ध्वनीचा ब सुद्धा बनतो. खरी अडचण खपे अंशाबद्दलची आहे. माझी सूचना अशी आहे की हा मागील शब्द क्षप्, क्षपा शब्दाचा अवशेषरूप आहे. म्हणजे मूळ शब्द क्षप् अधिक पद्य म्हणजे रात्रीच्या वेळी पायातील म्हणजेच खपे-अब्ल् होय. या पश्तो शब्दाने भारतात यावयाचे ठरविले, तर 'ख्' ध्वनीचा 'च' बनेल व चपल असा शब्द बनेल. चप्पल हे सुद्धा अत्यंत शुद्ध असे रूप बनेल. म्हणून वरील मूळ पश्तो शब्दरूपाचे चपल, चप्पल हे भारतीय अपभ्रष्ट रूप होय, असे म्हणता येते.

पश्तो भाषेत अब्ल् म्हणजे नागव्या पायाचा, पायात काही नसलेला, असाही शब्द आहे. हा अपद्य याचा अवतार असावा, हे उघड आहे. तसेच ईराणीतही अब्ल-पा म्हणजे नागव्या पायाचा असाही शब्द आहे. याच अर्थाचा आणखी एक शब्द पक्वे-अब्ल असा उपलब्ध आहे ( कोशात ). चपल हे रूपान्तर खुद्द पश्तो भाषेतच झालेले

आहे असे आढळते. कारण चपलई हा शब्द चप्पल या अर्थी मुळातच आढळतो. येथे च वर्णाचा उच्चार मराठीतील चिंच शब्दातील च ध्वनीच्या उच्चाराप्रमाणे आहे.

**गार, गारा,** Hail.

मराठीत गारा शब्द फार जुना आहे. तो महानुभावीय साहित्यात वापरलेला दिसतो. तो नरेन्द्राच्या रुक्मिणीस्वयंवरात ( ओ. ५६८ ) आहे. ज्ञानेश्वरीतही आहे. तो हिंदीत असून, दक्षिणी हिंदीतही सापडतो. दख्खिनीत त्याचे रूप गार असे आहे. प्लॅट्स ( Platts ) आणि कुलकर्णी हा शब्द संस्कृत करका शब्दापासून व्युत्पन्न असल्याचे नोंदतात. कुलकर्णी यांनी, ते नेहमी करतात त्याप्रमाणे, गार शब्दाची प्राकृत, अपभ्रंश वा नव्य आर्यभारतीय भाषांतील रूपे येथे दिलेली नाहीत. मोनियर वुइल्यम्सने करक शब्द कर शब्दाच्या कक्षेत नोंदवला आहे. हा कर शब्द सं. कॄ धातूपासून व्युत्पन्न आहे. कॄ धातूचा मूळ अर्थ फेकणे, विखुरणे, अस्ताव्यस्त करणे असा आहे. या धातूच्या मूळ अर्थसंधारणेत पाणी वाहाणे, पाऊस पडणे, वर्षा होणे इत्यादी अर्थांचा संबंध येत नाही. करक, करका म्हणजे गारा या शब्दाचा या धातूखाली समावेश अनाठायी आहे असे वाटते. वर्षा होणे, वर्सगे, पाऊस पडणे किंवा पावसासंबंधी कसलाही भाव कॄ धातूशी येत नाही.

पश्तो भाषेत **वोरे-दल** म्हणजे वर्षणे, पाऊस पडणे या शब्दाची व्युत्पत्ती मोर्गेन्स्टर्न याने चर्चिली आहे ( पृ. ८८ ). गायगरचे मत उद्धृत करून त्याचा अवेस्ता पर्याय **वार** म्हणजे पाऊस असा दिला आहे. पश्तो भाषेत दुसरे वैकल्पिक रूप **वरे-दल** असे आहे. वजीरानी बोलीत ते रूप वोर ( पाऊस ), **वरन्दै** Raining, पेशावर प्रदेशात **वारे-दल**, कोहात भागात **वरेगी** असे आढळते. ईराणी ( फार्सी ) भाषेच्या परची बोलीत गार ( पाऊस ) असा शब्द आहे. ईराणीच्या ओर्मुरी बोलीत आणि कम प्रदेशात गोर–एक किंवा गोर–येक म्हणजे वसणे, वर्सणे, पाऊस पडणे असे रूप आढळते.

ईराणीत वारी-दन-वर्षणे, बार–पाऊस, बारीश–पाऊस असे शब्द आहेत. यांचे मूळ अवेस्ता व जंद भाषेतील शब्द होत. या धातूचा संस्कृत पर्याय धातु वृष्-वर्षीते हा होय. ईराणी क्षेत्रात संस्कृत धातूतील अंतिम ध्वनी ष हा दिसून येत नाही. ईराणी भाषेत गार शब्द या अर्थाने नाही असे वाटते. पश्तो क्षेत्रातील या धातूची रूपे पाहिली म्हणजे असे दिसते की, मूळ ' व ' ध्वनीचा काही पश्तो बोलीत ग झालेला आहे. मूळ संस्कृत अथवा अवेस्ता ' व ' ध्वनीचा ग झाल्याची उदाहरणे अनेक सापडतात. उदाहरणार्थ, परची बोलीत सं. वेत शब्दाचे रूप गी; सं. वितस्ति शब्दाचे ईराणी गिदस्त, ब्राहुई भाषेत गिदिस्; सं. वत्स शब्दाचे परची बोलीत गसो इत्यादी. यावरून गार शब्दाची व्युत्पत्ती पाहता येते. सं. वृष्, वर्षा, अवेस्ता व जंद–वार याचे गार असे रूप झालेले दिसते. गोर रूपसुद्धा दिसून येते.

संस्कृतमध्ये दिसून येणारे कर hail, करक, करका hail, hail-stone हे शब्द मूलतः संस्कृत धातूपासून दिसत नाहीत. ते पश्तो भाषेतील अतिथि शब्द होत. सारांश हा की, अलीकडील आर्यभारतीय भाषांत वावरणारा गार शब्द हा पश्तो भाषेतून आलेला दिसतो. संस्कृतमधून त्याची व्युत्पत्ती दुरापास्त आहे. म्हणून हा मुस्लिम-संपर्कपूर्व काळात भारतीय भाषांत आलेला आहे.

**सजन, सजणा**—हा शब्द मराठी साहित्यात, विशेषतः लोकसाहित्यात अलीकडे ( गेली ३०० वर्षे ) नित्यप्रयुक्त आहे. व्युत्पत्तिकोशात तो स्वजन शब्दापासून व्युत्पादिला आहे. परंतु हे अगदी गैर आहे. ते अर्थसंधारणेच्या विरुद्ध आहे. येथे केवळ वर्णसाम्य अप्रस्तुत होय म्हणून त्याची व्युत्पत्ती अन्यत्र बघितली पाहिजे. पश्तो भाषेत सखी ( स्त्री ) शब्दाचे रूप षज ( पहा पृष्ठ ७७ ) असे आहे. अन्य बोलींत ती रूपे राज, षज़, लज़, स्वज अशी आहेत. मात्र परची बोलीत ते रूप शित्र आणि झेबकी बोलीत शत्र् ( स्त्री ) असे होते. मूल 'ल' ध्वनीचा पश्तोत 'ज' होतो असे सांगून ट्रम्प् याने याच शब्दाचे उदाहरण दिले आहे. मोर्गेन्स्टर्ने याने मात्र हा शब्द सं. 'स्त्री' शब्दापासून व्युत्पादिला आहे. परंतु हे योग्य नव्हे. मिंजनी बोलींतील शीय आणि वखीतील स्त्रेइ हे शब्द मात्र स्त्रीशब्दापासूनच होत. या दोन शब्दांत लेखकाची गल्लत झालेली आहे. षज, सज या पश्तो भाषेतील मुळापासून हिंदी-मराठी सजन शब्द आला असावा असे दिसते. तो सखिनम् या रूपापासून इकडे आला. सखी शब्दापासूनची व्युत्पत्ती अर्थ आणि ध्वनी दोन्ही दृष्टींनी सुयोग्य आहे. हा शब्द फार्सीत नाही. भारतीय भाषांत याची अन्य व्युत्पत्ती लागत नाही.

**कलत्र**

कलत्र शब्द संस्कृत साहित्यात महाभारत-कालापासून वावरत असला तरी तो अगांतुक म्हणून अव्युत्पादित आहे, हे उघड आहे. त्याची कलत्रा, कलत्रवत्, कलत्रीकृ ही अन्य रूपे अगांतुकाला केलेला साधा शिष्टाचार आहे. म्हणून तो सगोत्र ठरत नाही. त्याचे लिंग पाहिले म्हणजे ईराणी व उर्दू साहित्यातील पुल्लिंगी प्रेयसीची आठवण होते. हा शब्द पश्तो भाषेतून आला असे वाटते. त्याची तेथील रूपे ( पृष्ठ ३५, क्रमांक ७८ ) अशी-कोज्द कवज्द, कोज्दन ( betrothal ). अन्य बोलीतील रूपे कोज्देत्र, कोज्दन्, केज्द्ल्ये ( विवाहित ) अशी आहेत. वरील रूपांपैकी शेवटले रूप लक्ष्य आहे. यातील 'ज्द > त्र' हे समीकरण स्वीकारून वर्णविपर्यय मानिला तर कलत्र शब्द सहजगत्या हाती येतो. शतपथ ब्राह्मणात युज् शब्द to fix in, insert-inject in ( semen ) मध्ये घालणे, मध्ये स्थिरावणे, वीर्यादि अन्तःप्रविष्ट करणे या अर्थाने प्रयुक्त असल्याची कोशावरून कल्पना येते. म्हणजे अर्थ व बाह्य शरीर या दोन्ही दृष्टींनी हा शब्द सं. युज् शब्दापासून आल्याचे दिसते. परंतु मूलतः हा शब्द योक्तृ, योक्त्र असा दिसतो. ईराणी, पश्तो आदीतही सं. 'य' ध्वनीचा 'ज' होतो;

जसे युशान्, पश्तो ज्वान. मागाहून या ' ज ' ध्वनीचा क झालेला दिसतो. एकूण सं. योक्त्र शब्दाची ही पश्तो प्रक्रिया आहे असे दिसते. व्युत्पत्ती ज्ञात नाही असे मोर्गेन्स्टर्नने याने म्हटलेले आहे. अशा रीतीने आपली सजनी-णी आणि कलत्र ही कैकेयी व गान्धारीप्रमाणे गान्धार देशातून आलेली आहेत.

वरील शब्दचर्चेबद्दल ही गोष्ट नमूद करणे आवश्यक वाटते की, वरील शब्दांपैकी एकही शब्द ईराणी भाषेत रूढ नाही. या शब्दांची रूपे मूलतः पश्तो आहेत. म्हणून पहिली गोष्ट ही की, हा पश्तो सम्पर्काचा परिणाम आहे. दुसरी गोष्ट कालासंबंधी. हे शब्द मराठी–हिंदी भाषांत शक ११५०–१२०० नंतर आले का अगोदर ? मराठीत काही शब्द या कालाच्या अगोदर प्रयुक्त होत होते हे वरती आलेलेच आहे; म्हणजे काही सम्पर्क, मुस्लिमांच्या भारतात व महाराष्ट्रात येण्यापूर्वीचा नक्की आहे व काही मागाहूनचा आहे. मराठीतील जुन्या साहित्यातील अखिल शब्दांचा संदर्भकोश हाती आल्यानेच हे सहजतया सांगता येईल. मुद्याची बाब अशी की हे सर्व, निदान उत्तरेतील भारतीय भाषावर ईराणी मुसलमान व ईराणी भाषा यांच्या प्रभावाहून भिन्न असा परिणाम अफगाण लोक व पश्तो यांच्यामुळे झालेला आहे, ही नोंद, हे वेगळेपण अद्यापपावेतो हेरलेले दिसत नाही. ते लक्ष्य आहे. याचा अधिक अभ्यास होणे इष्ट आहे.

## पश्तो आणि पैशाची

भारताच्या प्राकृत, अपभ्रंशादि भाषांचा विचार करीत असताना पैशाच, पैशाची भाषेचा उल्लेख अवश्यमेव होतो. भारतीय भाषाचिकित्सेतील पैशाची हा एक यक्षप्रश्न आहे. पैशाची भाषा ही प्राकृत भाषेची बोली मानण्यात येते. पैशाची भाषेचे मूळ क्षेत्र वायव्य भारतात होते असे डॉ. सुकुमार सेन आपल्या ' मध्य-आर्य भारतीय भाषांचे तौलनिक व्याकरण ' ( इंग्रजी, पुणे, १९६०, पृ. २४ ) या ग्रंथात म्हणतात व लागलीच पुढे म्हणतात की, हा प्रदेशच तिचे माहेरघर आहे असे म्हणता येणार नाही. का की पैशाची केंद्रीय भारतासारख्या अन्य प्रदेशातही बोलली जात होती. या पैशाचीचे नक्की रूप काय होते हे तिचे लिखित साहित्य उपलब्ध नसल्याने सांगता येत नाही. परंतु अनेक प्राकृत वैयाकरणांनी पैशाचीचा उल्लेख केलेला आहे. या पैशाचीच्या सुद्धा पोटभाषा, किंवा बोली त्यांनी सांगितलेल्या आहेत. डॉ. सेन यांनी कैकेय पैशाची, शौरसेन पैशाची, पाञ्चाल पैशाची व चूलिका पैशाची अशा चार पोटभाषांचा उल्लेख केलेला आहे. याखेरीज शकारी नामक एका प्राकृत बोलीचाही उल्लेख आढळतो. शक शब्दावरून तिची कुळी कळते. पैशाची प्राकृताची विशेषतः एकदोनच वैशिष्ट्ये आहेत. कैकेय आणि चूलिका पैशाचीत विशेष फरक नाही. या दोन्हींचा मुख्य विशेष हा की, अन्य भारतीय भाषांतील ग, ज, ड, द आणि ब ध्वनींचे क, च, ट, त आणि प ध्वनींमध्ये अनुक्रमे रूपान्तर होते. तसेच घ, झ, ढ, ध, भ या ध्वनींचे अनुक्रमे ख, छ

ठ, थ, फ असे रूपान्तर होते. चूलिका पैशाचीत वरील नियम त-वर्गाला लागत नाही. उदा. दामोदर, दुर्गा शब्दांचे पैशाची पर्याय तामोतर आणि तुक्का, तुळजा असे होतात. अर्थात हे कैकेय पैशाचीच्या नियमानुसार होते. पिशेलच्या प्राकृत व्याकरणात पैशाचीच्या नियमांची चर्चा आलेली आहे. तसेच डॉ. आदिनाथ उपाध्ये यांनी भाण्डारकर प्राच्य संस्थेच्या जर्नल, खण्ड २१ मध्ये ( १९४०, पृ. १–३७ ) या विषयाची सांगोपांग चर्चा केलेली आहे. प्रस्तुत प्रसंगी मुख्य मुद्दा असा की, पैशाची बोलीच्या उपरोक्त नियमाचा अंमल पष्तो भाषेतील वा ईराणीतील काही बोलभाषात दिसून येतो. या घटनेकडे पाटकांचे लक्ष वेधावयाचे आहे.

ईराणी भाषेची पष्तो ही एक उपभाषा आहे. ईराणी आणि पष्तो या दोन्हींच्या आणखी पुष्कळ बोली आहेत. सर्वसाधारण जे ईराणी शब्द आढळतात त्यांची निरनिराळ्या बोलींत वेगवेगळी रूपे होतात. या वेगळेपणातून पैशाचीच्या वरील नियमाचा सुगावा कसकसा लागतो याचा तलास येथे करावयाचा आहे. मोर्गन्स्टर्ने याच्या पुस्तकाधारेच हे केलेले आहे.

**ग > क**

पृष्ठ २६ वर गन्दल ( अप्रिय होणे ) शब्दाची चर्चा केली आहे. या शब्दा मूळ ईराणी गन्द ( दुर्गंध ) शब्दात आहे. हा संस्कृत गन्ध शब्दच होय. परंतु त्या यौगिक अर्थ अर्थात् दुर्गंध अभिप्रेत आहे. या शब्दाचे सोगदी बोलीतील रूप आ **गन्टाक्**. येथे मूळ शब्दातील किंवा अन्य बोलीतून आढळणाऱ्या शब्दरूप **गन्द्ग** शब्दातील द ध्वनीचा ट आणि ग ध्वनीचा क झालेला आहे. हा बदल पैशाची नियमाकडे अंगुलिनिर्देश करणारा आहे.

**ज > च**

सोगदी भाषेत अन्य बोलीतील ज ध्वनीचा च बनतो असे आढळून येते. पृ. ३० वरील ( क्रमांक ५८ ) चर्चेत जन्–ए ( त्यापासून ) शब्दाचे सोगदी बोलीतील रूप चन् ( पासून ) असे आहे. पृ. ३१ वर ( क्रमांक ६० ) जिनै, जन्, जल्, ( लहान मुलगी ) या शब्दाची चर्चा आहे. अवेस्तात हे रूप **जैनि** ( स्त्री ) असे आहे. हा शब्द संस्कृत कन्या शब्दापासून व्युत्पन्न आहे हे ट्रम्प् आदींनी सांगितले आहे. येथे पष्तोच्या बोली व प्रादेशिक वैशिष्ट्य याला अनुसरून अनेक रूपे उद्धृत आहेत. त्यांपैकी सोगदी बोलीतील रूप '**इन्च्**' असे आहे. अन्य बोलीत ही रूपे नजल्, इन्जल, इन्जलइ ( त्याचे अनेकवचन अन्जून ), एन्जु, इन्जु अशी आहेत. परंतु सोगदीतील रूप डोळ्यात भरण्यासारखे वेगळे आहे. पृ. ३२ ( क्र. ३४१ ) वर कलै ( ग्राम ) शब्दाची चर्चा करतांना गूजल आणि ग्वोजल ( Cowpen; ) शब्दांचा उल्लेख आहे. हे दोन्ही शब्द गोष्ठ या संस्कृत शब्दाचे पर्याय आहेत. त्यांना अर्थ गोठा असा

आहे. या शब्दाचे शुग्नी या ईराणी बोलीतील रूप गे-चीद् असे आहे. येथे ज ध्वनीचा च व ल ध्वनीचा द झालेला दिसून येतो. पृ. ३३ (क्र. ७३) वर कुंजल (Sesamum) शब्दाची चर्चा आहे. हा शब्द सं. कुंचित शब्दापासून व्युत्पन्न आहे. त्याचे ईराणी रूप कुंजद् असे आहे. परंतु या ईराणी शब्दाचे बलोची बोलीतील रूप कुंचीथ् असे आहे. येथे 'ज' ध्वनीचा 'च' आणि 'द' ध्वनीचा 'थ' झाल्याचे आढळते. पृष्ठ ५२ वर (क्र. १४५) न्मूंज शब्दाची चर्चा आहे. हा शब्द भारताला चिरपरिचित असलेल्या नमाज़् या ईराणी शब्दाचा सगोत्र व समार्थ आहे. नमाज़् हा शब्द संस्कृत नमस्, नमः या शब्दाचा ईराणी पर्याय आहे. या शब्दाचे अफगाणिस्तानातील तिरा प्रदेशात नमांच् असे होते. सोगदी बोलीत ते न्मच् असे आहे. येथे ज ध्वनीचा च झालेला आढळतो. पृ. ६५ वर (क्र. ३६५) रव्‌रल्. रवम् to reap शब्दाचा विचार आहे. अफगाणिस्तानातील बोलीतून याची रूपे रेबद्‌ल्, रेबल्, रेबम्, रेबी, रेबे अशी होतात. परंतु तेच रूप सोगदी बोलीत रोप असे आढळते. तेथे ब ध्वनीचे रूपान्तर प मध्ये झालेले आहे. पृ. ५७ वर (क्र. १६८) पश्तो पिंज, ईराणी पंज् आणि सं. पञ्च शब्दाचा विचार आहे. पाच (हो, मराठीने अनुस्वाराचे उच्चाटन केलेले आहे!)-अफगाणिस्तानातील पश्तो आणि पख्तो विभागांतील बहुतेक सर्व बोलीत याचा उच्चार 'पिंज़' किंवा 'पिंज' असा आहे. परंतु शुग्नी बोलीत मात्र हा उच्चार 'पींच्' असा आहे. येथेही 'ज' ध्वनीचे 'च' मध्ये रूपान्तर झालेले आहे.

पश्तो भाषेत पैशाचीच्या उपरोक्त विशेष नियमाच्या खाणाखुणा कशा मिळतात याचे किंचितसे दर्शन आपणांला वरील चर्चेवरून झाले आहे. भारतीय व्याकरणाच्या भाषेत, प्रत्येक वर्गाच्या मृदू व्यंजनांच्या जागी त्याच वर्गातील कठोर व्यंजने पैशाचीच्या वरील नियमात येतात. हीच प्रक्रिया आपणाला पश्तो भाषेच्या काही बोलीत-बलोचीत-दिसून येते. या तीन बोलींपैकी सोगदी बोली अत्यंत महत्त्वाची आहे. एक प्रकारे बुद्ध साहित्यात जसे पाली भाषेला महत्त्व, तसे शक या बुद्धाइतक्या, अत्यंत प्राचीन ईराणी लोकांच्या इतिहासात, सोगदी भाषेला आहे. हर्झ्‌फेल्ड यांच्या मते (Archaeological Survey of India, Memoir No. 34, 1928 by Herzfeld) या शक जमातीची मातृभूमी सोग्द देशात होती. सोग्द हा Transoxonia असून अरबांनी या संज्ञेचे भाषान्तर मावराऊन्नहर असे केले. हेच शक लोक इ. स. पूर्व दीडदोनशे वर्षांपासून भारताच्या वायव्य दिशेस वावरत होते.

या शक लोकांच्या मायभूमीत, सोगदी बोलीत पैशाची भाषेच्या प्रमुख नियमाचा माग निघावा हा केवळ योगायोग मुळीच नाही. वरील प्रतिपादनात काही हशील असल्यास, ही गोष्ट समोर येते की, शकप्रमुख अफगाण-पठाण-रोहिले लोकांनी प्राचीन भारतीय प्राकृत ज्या प्रकारे वापरली तिचे नांव पैशाची होय. पैशाची बोलणारे लोक शकप्रमुख अफगाण लोक होते, हे एकदा मानल्यावर वायव्य भारतात पैशाचीची मायभूमी

होती याचाही उलगडा होतो. कारण हाच भाग अफगाणिस्तानला सलग आहे. एवढेच नव्हे सेन्ट्रल इण्डिया-मध्यवर्ती भारतातही ती बोलली जात होती. यामुळे एरण या प्राचीन शक राजांच्या राजधानीकडे दृष्टी वळते. तेथे औलिकर या राजवंशाचे राज्य शक ४५७ पर्यंत चालू होते. हेमचंद्राने उल्लेखिलेल्या चूलिका पैशाचीचा पदर लागतो. गिरनार येथे रुद्रदामन् याचा वंश दोनतीनशे वर्षे राज्य हाकीत होता. शक लोकांचे महाराष्ट्राशी नाते सातवाहनकालीन आहे. या शकांच्या सातवाहन राजकुलात सोयरिका झालेल्या होत्या. सातवाहन नरेशांनी शक प्रभावद्योतक हकुसिरि ( शकश्री ), खदपालित ( क्षत्रपालीत ) अशी स्वनामे धारण केलेली होती. गुणाढ्याने पैशाची भाषेत बृहत्कथा लिहिली हेही मोठे लक्ष्य आहे. सातवाहन राजवाड्यात प्राकृतचा प्रभाव होता; तर राउळातील एक राणी शुद्ध संस्कृत बोलते. शकांनी संस्कृत भाषा राजकारणासाठी स्वीकारली हे विदन्मान्यच आहे. गुणाढ्याचे सातवाहन दरबारात जमेनासे झाले तेव्हा तो विंध्य पर्वतापलीकडे गेला. विंध्यापलीकडील (दक्षिणेकडून) भागात पैशाची भाषेचे थैमान होते अशी साक्ष महाकवी राजशेखराने ( जीवित शक ८२२ ) काढलेली आहे.

पष्तो, पैशाची आणि मराठी या भाषांचे व त्या भाषा बोलणाऱ्या लोकांचे नाते उलगडून दाखवण्याचा वरती थोडासा प्रयत्न केलेला आहे. जेव्हा कालोल्लेखासहित राजकीय व्यक्ति व घटना यांचा इतिहास चर्चिता येत नाही, तेव्हा भाषाविज्ञानाचे साधन वापरणे-निदान प्राचीन इतिहासलेखनात, अत्यंत उपयुक्त व योग्य आहे असे मानण्यात येते. भारोपीय भाषावैज्ञानिक अध्ययनातून प्रागैतिहासिक समाजाचे चित्र रेखाटण्याकरिता असा प्रयत्न करण्यात येतो. पैशाची भाषा व ती वापरणारे लोक यांच्या अध्ययनात वरील तिन्ही भाषांचा अभ्यास उपयुक्त ठरेल असे वाटते. सिंधी, पंजाबी, राजस्थानी आदि भाषांच्या जुन्या स्वरूपांचा अभ्यासही या कामी उपकारक ठरेल.

# श्रीमुक्तादेवी योगिनी : आणखी काही माहिती

रामचंद्र चिंतामण ढेरे

---

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या क्र. १७१-१७२ च्या अंकात माझा 'श्रीमुक्तादेवी योगिनी' हा लेख प्रकाशित झाला आहे.[१] चक्रधरांना एकांक-काळात भेटलेल्या 'योगिनी मुक्ताबाई' विषयी महानुभावीय परंपरेत जी माहिती उपलब्ध होते, तिच्या आधारे मुक्ताबाईच्या चरित्राचा शोध घेण्याचा प्रयत्न मी केला आहे. चक्रधरसंबद्ध मुक्ताबाईचे महानुभावीय चरित्र आणि चांगदेवांच्या परंपरेतील विसोबा खेचरांच्या 'षट्स्थल' नामक नवोपलब्ध ग्रंथात वर्णिलेले, चांगदेवांचे गुरुत्व भूषविणाऱ्या मुक्ताबाईचे चरित्र समरूप असल्यामुळे, चक्रधरांना भेटलेली मुक्ताबाईच चांगदेवांची गुरु होय, हे सत्यही आपणांस ज्ञात झाले आहे.

त्या लेखात माझ्या प्रतिपाद्याला पुष्टी देण्यासाठी मी म. बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांचे एक विधान उद्धृत केले आहे : त्यांनी मुक्ताबाईला एके ठिकाणी 'भर्तृहरीची भावजय व विक्रमादित्याची जाया' म्हटले आहे.[२] ही माहिती त्यांनी कोणत्या साधनाच्या आधारे दिली, हे त्या वेळी मला समजू शकले नव्हते. परंतु त्यानंतर म. बाळकृष्णशास्त्रींच्या अन्य संशोधनलेखांचा हेतुतः धांडोळा घेत असताना महानुभावीय परंपरेत सुरक्षित असलेले मुक्ताबाईचे संक्षिप्त चरित्रच त्यांच्या एका लेखात उद्धृत केलेले आढळले.[३] हे चरित्र लीळाचरित्राच्या एखाद्या अप्रकाशित

१. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, वर्ष ४५ वे, अंक १७१-१७२, ऑक्टोबर १९६९ ते मार्च १९७०, पृ. ३९-४८.

२. शारदाश्रम वार्षिक, शके १८५५, पृ. ५४.

३. विहंगम, जुलै १९३३ ('श्रीचक्रधरस्वामींचा कालनिर्णय व कै. चांदोरकर'), पृ. ३९-४४.

अनुक्रमणिका

पाठातील लीळेच्या स्वरूपात ग्रथित झालेले असावे. त्यांनी उद्धृत केलेली मुक्ताबाई-विषयक लीळा अशी :

"मुक्ताबाइ दर्शन कथन : ॥ हे गोष्टि गोसावी विज्ञानेश्वराचेया निंबातळीं विष्णुभटांउपरि सांघितली : ॥ आन भडेगांवीं महदाइसाप्रति प्रसंगें यथानुक्रमें लीला निवेदुनि सांघितली : ॥ महदाइसीं पुसिलें : जी जी : मुक्ताबाइ ते कवणी सदैव जियेसि गोसावी भेटि दिधली : गोसावी भणितलें : बाइ मुक्ताबाइ ते अळजपुरींचेया रायाची कन्या : तया रायावरि परचक्र चालिलें : तेनें तो भंगिला : तयाचें अंतःपुर आपुलालेया पळौनि गेलें : मां मुक्ताबाइ ते वेश्यांचेया वरांतु रिगाली : मग ते एकीं नगरीं जाऊनि राहिली : ते वेश्या होऊनि पतिव्रताधर्मी वर्ते : तंव तया नगरा विक्रमु रावो आला : तो आटांतुल विद्यावंत : तेनें तें आइकीलें : मग मुक्ताबाइचा घरीं वसिनला : मां तियेसि तेनें निरपराधें चाबुकवेन्हीं मारिलें : मग मुक्ताबाइया म्हणितलें : राऊळो : पुरो दिजो : तुमचे सकुमार हात दुःखवती जी : मग तेणें विद्यावंतें म्हणितलें : आइकलें तें साचचि : वेश्या होऊनि पतिव्रतेचा धर्मु : मग तेनें मुक्ताबाईतें आश्वासिलें : मग तो विद्यावंतु तियेसि वयस्तंभिनी विद्या संक्रमूनि आपण निगौनि गेला : तियेतें परिवार पाठउनि पालखिये वाउनि आपुलेया नगरासि नेलें : पाणिग्रहण केलें : तियेचेनि सामर्थ्यें अनेकें आश्चर्यें प्रकटेति : ऐसी ते मुक्ताबाइ : विक्रमाची राणी : भर्तृहरीची भाउजइ : येक वेळ भर्तृहरि तियेचिया आवारासि भिक्षेसि गेले : तंव तेहीं ताटीं आइती भिक्षा करूनि ठेविली होती : तियें न्हातें होती : तंव भर्तृहरीचा भिक्षा शब्द आइकिला : तैसिची चोखनी लावितां उठिली : केशांची विरुंगुंठी घातली : हातीं ताट घेनिउ दिगंबरें निगाली : ते मागौते न पांव आन वरुते न पांव निघाली : तिये पाटांचि निगाली : दारवठा वोल्हा होता तो वारी : तेयांतें हातीं धरूनि बाहिरी निगाली : ते तया आच्छादान जालें : मग तिये विस्मयातें पावली : मग तियें दोवें भर्तृहरीचिया गुरूची उपदेशियें जालीं : एकविधा अवस्था पातली : सर्वांगीं रोमा निगाली : सर्वोगां अवयवांतें तेंचि पांगरुण जाली : मग ते पर्वतासि गेली : तेथ कदली वनीं तपश्चर्या करी : महदाइसातें सर्वज्ञें भणितलें : बाइ : कैसी ते बाइ : निन्हा तापस : आंगीची रोमा सर्वोगीं पाहाळी गेली : हातांपायांचीं नखें चुंभळी वळलीं : माथांचीया जटा पायेवोळा भुइसिं रेघा काढेति : सेवाळले दांत : तिये बैसेति तरि तयांचिया जटा मागां भूमीं पुंजा होति : तिये उभी ठाकेति तरि तयांचिया जटा मागा भुइसीं काढेति : बाइ : कैसी निन्हां तापस बाइल : ऐसे गोसावी मागौतें मागौतें पुढारां तोखेति : महदाइसी पुसिलें : जी जी : तयांचिया तपासि कीतीशें वर्षे भरलीं जीं : सर्वज्ञें भणितलें : बाइ : तयांचिया तपासि तेरासें वर्षें : आन येणें तेथ बारा वर्षे राज्य केलें : महदाइसीं पुसिलें : जी जी : तिये तेथ असति तरि तयांसि परावर्ण काइ जी : सर्वज्ञें भणितलें : तयाचिये आंगींचि रोम पाहाळी गेली असे : तेनें तयांचें देह अवघें आछादौनि गेलें असे : ते परावर्ण जाली असे : ऐसी ते मुक्ताबाई पर्वतीं कर्दळी वनीं असे : तयांचिया

आश्रमा हे गेलें : तंव ते आग्रोदकालागि उदयाव्रि नदीसि आली : तंव यासि एकीं ठाइं आसन असे : तंव मुक्ताबाइया यातें देखिलें : जवळि आली : आदेशिलें : यासि चरणालागौनि विनविलें : जी जी : माझी पैन्हां पर्णकुटिका असे : तेथ गोसावी बीजें करावें जी : बाइ : यासि तेथ बीजें करावेयाची प्रवृत्ति : मां एणें तेथ बीजें केलें : मग तिया यासि कुशासन बैसों घातलें : तथा दर्भासन रचिलें : आजिचा सुदिनु : आजि भाग्य माझें : जे राउळीं आश्रमासि बीजें केलें : मग जाउनि हे तेथ बैसले : जटा सोडुनि एथिचे श्रीचरण झाडिले : मग श्रीचरणक्षाळण केलें : मग यासि बरवी वन-पुष्पांची पूजा केली : मग दंडवत घालूनि दोन्ही हात जोडूनि पुढां उभी ठेली : स्तुति करूं लागली : मग भणितलें : जी जी : इतुके दिवस तप केलें : तया माझेया तपाचें फळ आजि जालें जी : आजि माझे जिवित धन्य : एणें भणितलें : तें कैसें बाइ : तिया भणितलें : ना जी परमेश्वराचें दर्शनु जालें : भणौनि : एणें भणितलें : ऐसे होए : मग तिया यासि कंदां मूळां फळांची आरोगना दीधली : तिया यासि नमस्कारु केला : एणें यांची पाठी श्रीकरें स्पर्शिली : आन स्थिति जाली : ..."[४]

खरे तर, म. बाळकृष्णशास्त्रींनी सदतीस वर्षांपूर्वी उद्धृत केलेली ही लीळा इतकी महत्त्वाची आहे की, महानुभावीय वाङ्मयाच्या अभ्यासकांनी तिची यापूर्वीच गंभीर दखल घ्यायला हवी होती. ही लीळा लीळाचरित्राच्या प्रमाण प्राचीन पाठातली असो-नसो, तिच्यात परंपरेने चालत आलेली मुक्ताबाईविषयीची सर्व माहिती सुसंगत स्वरूपात प्रकट झाली आहे, एवढेच प्रस्तुत संदर्भात महत्त्वाचे आहे.

( १ ) या लीळेच्या द्वारा हे प्रथमच ज्ञात होत आहे की, मुक्ताबाई ही मूलतः महाराष्ट्रीय होती. ती विदर्भातील अळजपूर ( एलिचपूर ) च्या राजाची कन्या; पर-चक्राच्या धामधुमीत देशोधडी लागली; दुर्दैवाच्या फेऱ्यात वेश्येच्या आश्रयाला गेली; पुढे 'व्रतस्थ' वेश्या बनली आणि योगायोगाने 'राया विक्रमादित्याची जाया' बनली.

( २ ) तिचे पुढील चरित्र 'षट्स्थला'तील चरित्राशी तंतोतंत जुळणारे आहे. विशेष हे की, प्रस्तुत लीळेतील तपशील 'षट्स्थला'तील तपशिलाहून अधिक बोलका आहे. विक्रमराजा हा 'विद्यावंत' असल्याचा उल्लेख महत्त्वपूर्ण आहे.

( ३ ) तिने गोरक्षनाथाचे शिष्यत्व स्वीकारीपर्यंतचीच हकीकत 'षट्स्थला'त आलेली आहे. परंतु या लीळेत मात्र ती तपासाठी 'पर्वतीं कर्दळी वनीं' गेल्याचा स्पष्ट निर्देश आहे.

---

४. ही लीळा प्रकाशित ( डॉ. तुळपुळे-संपादित ) 'लीळाचरित्रा'च्या पूर्वार्धातील ( भाग दुसरा, लीळांक ३०३ ) 'निंबातळिं आसन : विष्णुभटां भेटि' या लीळेतील 'गोसावी श्रीकरें पाठि स्पर्शीली :' ( पृ. ६२ ) या विधानाच्या अनुषंगाने चक्रधरांची जागृत झालेली पूर्वस्मृती म्हणून रचली गेली आहे, हे 'लीळाचरित्रा'च्या वाचकांच्या ध्यानी येईलच.

(४) पर्वत हे या ठिकाणी विशेषनाम आहे, हे मुद्दाम स्पष्ट करण्याची जरुरी नाही. 'एकीं नगरीं' हा याच लीळेतील सामान्यनामार्थी प्रयोग या संदर्भात मुद्दाम ध्यानी घ्यावा.

(५) पर्वत म्हणजे श्रीपर्वत आणि योग्यांच्या निवासाने गाजलेले कर्दळीवन श्रीपर्वतावरच (श्रीशैलावरच) आहे, यासंबंधी मी माझ्या पूर्वीच्या लेखात अनेक निर्णायक आधार दिलेले आहेत. ही बाब इतकी स्पष्ट आहे की, त्याबद्दल आता शंकाच उरू नये. तरीही मला आढळलेले काही नवे आधार पुढे सादर करीत आहे :

(६) हळेकन्नडचे अभ्यासक प्रा. द. रा. बेंद्रे यांच्याशी यासंबंधी चर्चा करता, ते म्हणाले की, "पर्वत म्हणजे श्रीपर्वत हे आंध्र-कर्नाटकात सिद्ध सत्य आहे. याची पुराव्यांनी चर्चा करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. आम्ही श्रीशैल-मल्लिकार्जुनाचा उल्लेख 'पर्वतमल्लय्या' म्हणूनच करतो."

(७) चालुक्य नृपती सहावा विक्रमादित्य याच्या काळातील गणेशवाडी शिलालेखात (इ. स. १०९९) कालामुख संप्रदायाची श्रीपर्वत-संबद्ध शाखा 'पर्वतावली' या नावानेच निर्दिष्ट आहे.[५]

(८) प्रख्यात तेलगू कवी सोमनाथ (इ. स. च्या बाराव्या शतकाचा मध्यकाल) याच्या 'पंडिताराध्यचरित्रमु' या ग्रंथाचे श्रीपर्वतसंबद्ध प्रकरण 'पर्वतप्रकरणमु' याच नावाचे आहे.[६]

(९) पवित्र स्थानांची आणि देवतांची नावे व्यक्तींना ठेवण्याची प्रथा परवा-परवा पर्यंत प्रचलित होती. आजही काही प्रमाणात ती टिकून आहे. श्री शैलावर उपलब्ध झालेल्या प्राचीन शिलालेखांत आलेली भक्तांची नावे पाहता, त्यात 'मल्लिकार्जुना' वरून ठेवलेले 'मल्लप्पा' हे नाव जसे आढळते, तसेच 'पर्वतावरून ठेवलेले 'पर्वत', 'पर्वतय्या' असे नावही आढळते.[७]

(१०) रावसाहेब एच्. कृष्ण शास्त्री या दक्षिणी अभ्यासकांनी आपल्या श्रीशैलावरील लेखात, 'Otherwise called S'riparvata or simply Parvata' असा श्रीशैलाच्या 'श्रीपर्वत' वा 'पर्वत' या दोन्ही पर्यायनामांचा उल्लेख केला आहे.[८]

या सर्व नव्या पुराव्यांवरून माझ्या मागील लेखातील प्रतिपाद्य दृढ झाले आहे : चक्रधरांची एकांतसाधना सालबर्डीवर घडली नसून श्रीपर्वतावर घडली; त्यांना त्याच ठिकाणी मुक्ताबाई योगिनी भेटली; हीच मुक्ताबाई चांगा वटेश्वराची गुरू होय; इत्यादी गोष्टींना आता ऐतिहासिक सत्यांची प्रतिष्ठा प्राप्त व्हायला हरकत नसावी.

५. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक : १९६९, पृ. ७७.

६. Journal of the Andhra Historical Research Society, Vol. XXVI (1960–61), Po. 104. ७. तत्रैव, पृ. १३२–१३५.

८. The Sanskrit Research, Vol. I, July 1915, p. 63.

# टीका-टिप्पणी

## १ : पाठचर्चेची प्रगति

शं. दा. पेंडसे

---

सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ १२-४॥ भ. गी.

या श्लोकाच्या चौथ्या चरणावर 'जिहिं सर्वभूतांचां हितीं। निरालंबीं अव्यक्तीं। पसरलिया मती। भक्तीविण ॥ अशी ज्ञानदेवांची टीका आहे. अनेक पोथ्यात पहिल्या चरणात 'अहिती' असा पाठ आहे व तोच ज्ञानदेवांचा मूळ पाठ आहे असे पाठशुद्धिकारांचे म्हणणे आहे.

याचा अर्थ असा आहे की मूळगीतेतील 'सर्वभूतहिते' ऐवजी ज्ञानदेवांनी 'सर्वभूताहितें' असा पाठ घेतला. पण महाभारताच्या पाठसंशोधित आवृत्तीत कोणत्याही प्रतीत तसा पाठ असल्याचा उल्लेख नाही हे पाठशुद्धिकारानीच सांगितले आहे. तसेच रामानुजभाष्यातहि 'अहिते' हा शब्द योजला असला तरी पुढे 'अरताः' म्हणून 'देहाभिमानरहित झालेले समबुद्धिउपासक अहित करण्याच्या प्रवृत्तीपासून निवृत्त होतात असे त्यांनी सांगितल्याचेही पाठशुद्धिकारांनीच निदर्शनास आणले आहे. पण हा निवृत्तीचा भाग सोडून ज्ञानदेवांनी मात्र 'अहिती' पाठ घेतल्याचे कारण देताना ते म्हणतातः 'या ओवीत वर्णिलेले अव्यक्तोपासक भूतांचे अहितकर्ते असतात असेच त्यांनी ( ज्ञानदेवांनी ) म्हटले आहे. याचे कारण हे उपासक निरभिमान व समबुद्धी झालेले नाहीत. 'अहिती' पाठाचे समर्थन करण्याकरिता पाठशुद्धिकारानीच स्वतःचे हे कारण दिले आहे. मुळात किंवा ज्ञानेश्वरीतही ते नाही. पुढे पुनः ( इंद्रिय-वासनासह ) हे स्वतःचे शब्द कंसात घालून 'देहाने शून्याबरोबर झगडणारे लोक

इतर भूतांच्या अहिताला प्रवृत्त होत असले पाहिजेत हे काय सांगावयाला पाहिजे ? असे म्हणून ‘ अहिती ’ या पाठाचे समर्थन त्यांनी केले आहे. ‘ अहिती ’ हाच ज्ञानेश्वरांचा मूळ पाठ आहे असे ठरविले म्हणजे किती गोष्टी पदरच्या घालाव्या लागतात हे यावरून लक्षात येइल. गीता संन्यासपर आहे असे ठरविण्याकरिता शंकराचार्यांना असेच करावे लागले. गीता अव्यक्तोपासकांच्या विरोधी आहे हे दाखविण्याकरिता ‘ अहिती ’ मूळ पाठ ठरविला पण एक मोटी अडचण राहिली. सर्वभूतांचे अहित करणारे हे अव्यक्तोपासक ‘ ते प्राप्नुवंति मामेव ’ असे श्रीकृष्ण कसे म्हणेल असे जेव्हा विचारले तेव्हा पाठशुद्धिकारांना आपली भूमिका बदलण्याशिवाय गत्यंतर राहिले नाही. आता ते म्हणतात ‘ अ म्हणजे नञ् याचा ‘ उलट ’ एवढाच अर्थ नाही. ’ त्याचे सहा अर्थ होऊ शकतात. ‘ अव्यक्तोपासकांचा मार्ग इतका विकट असतो, प्रलोभनांनी आणि संकटांनी संकुल असतो की त्यांना भूतांच्या हिताकडे लक्ष देणे शक्य होत नाही. ” आता भूतांचे ‘ अहित करणे ’ आणि ‘ भूतांचे हित करण्याकडे लक्ष देणे अशक्य होणे ’ या दोन भूमिकात जमीन अस्मानचे अंतर आहे, हे वाचकांच्या सहज लक्षात येईल पहिली भूमिका नको ती गोष्ट करणारी आहे आणि दुसरी इष्ट गोष्ट करणे अशक्य होत असल्याची आहे. पाठशुद्धिकारांनी ही दुसरी भूमिका आधीच घेतली असती तर ‘ अहिती ’ हा पाठ ज्ञानदेवांचा नसला तरी त्यासंबंधाने चर्चा करण्याचे कारण नव्हते. भूतांचे अहित करण्यात रत असणाऱ्या अव्यक्तोपासकाला ईश्वरप्राप्ती होते या कार्यकारणभावातील विसंगती लक्षात असल्यामुळे पाठशुद्धिकारांनी पहिली भूमिका सोडली ही आनंदाची गोष्ट आहे. पाठचर्चेमुळे झालेली ही प्रगती काही थोडी नाही.

वस्तुतः १२–४ आणि १२–५ या दोन श्लोकांचा रोख वेगळा समजण्याला मुळात आधार नाही व ज्ञानेश्वरहि तसे समजत नाहीत. ‘ अहिती ’ हा मूळपाठ ठरविल्याने तसे समजावे लागते. १२–४ मध्ये समबुद्धि अव्यक्तोपासक आणि १२–५ मध्ये ‘ वासनावश ’ अव्यक्तोपासक असा भेद असता तर १२-५ मध्ये ‘ तु ’ शब्द आरंभी घालून तो गीतेत दाखविला असता. अव्यक्तोपासक आणि व्यक्तोपासक यांतील भेद दर्शविण्याकरिता गी. १२–३ आणि १२–६ या श्लोकात ‘ तु ’ शब्द घातला आहे. म्हणून गी. १२–४ मध्ये चाललेल्या अव्यक्तोपासकाचेच वर्णन १२–५ मध्ये चालले असून, त्यांचा मार्ग क्लेशकारक असतो याचे कारण, ज्ञानदेवांच्या मते तो ‘ भक्तिवीण ’ असतो हे होय. केवळ योगाच्या बळावर भक्तीवाचून अव्यक्तोपासना करणारांच्या वाटेत महेन्द्रादी पदे वाटमारी करतात, ऋद्धिसिद्धींची द्वंद्वे वाटेत आडवी पडून मार्ग कुंठित करतात. आणि कामक्रोधांचे अनेक उपद्रव उठाव करतात. त्यांच्याशी त्याला लढावे लागते. त्यात ‘ तो गुंतून पडतो, किंवा वश होतो ’ असे म्हटले नाही. पण लढण्यात वेळ गेल्यामुळे फळप्राप्ती होत नाही व क्लेश तेवढे पदरी पडतात. हेच जर योगाला ईश्वर भक्तीचे सहाय्य घेतले तर ईश्वरकृपेने हे धोके व क्लेश टळतात व अव्यक्तोपासना सफल होते असे ज्ञानदेवांना सांगावयाचे आहे. ‘ ऋद्धिसिद्धीची द्वंद्वे । पडोति ठाति ’

अनुक्रमणिका

यात द्वंद्वे हा कर्ता आहे. अव्यक्तोपासक नव्हे.

प्रस्तुत ' अहितीं ' की ' हितीं ' या पाठचर्चेचा ज्ञानदेवांचा तत्त्वज्ञानाशी काही संबंध नाही हे येथे सांगितले पाहिजे. कारण पाठशुद्धिकार त्याचा उल्लेख वारंवार करतात. तत्त्वज्ञानात जीव, जगत् व जगदीश्वर यांचे स्वरूप व परस्पर संबंध यांचाच विचार प्राधान्याने असतो. साधन विचाराचा भाग त्यात येत नाही. ज्ञानदेवांचे जीव-जगत् व जगदीश्वरांचे ऐक्य सांगणारे तत्त्वज्ञान इतक्या भक्कम पायावर उभे आहे की त्यातील एकही चिरा निखळून काढण्याची किंवा ढासळण्याची शक्यता नाही. ज्ञानेश्वरी-तील शेकडो शब्द आणि शब्दार्थ यांची उलथापालथ त्याकरिता करावी लागेल आणि तरीही फलनिष्पत्ती काही होणार नाही. पाठशुद्धिकारांनाही याची जाणीव आता होऊ लागली आहे. ' **क्वचित एखाद्या** ठिकाणी तत्त्वाचा बदल होईल ' असे ते म्हणतात. पाठशुद्धिमुळे क्वचित् एखाद्या ठिकाणी झालेल्या बदलामुळे तत्त्वज्ञान बदलत नाही. तेव्हा प्रस्तुत चर्चा करताना तशी भीति चर्चाकाराला बिलकुल नाही हे पाठशुद्धिकारांनी ध्यानी घ्यावे.

भक्तीच्या साधनातील अव्यक्तोपासना आणि व्यक्तोपासना या दोन प्रकारांबद्दल गीता व ज्ञानेश्वर यांचे धोरण काय आहे याविषयी हा प्रश्न आहे. ' अहितीं की हितीं ' यातील पाठ निवडताना याचा विचार केला पाहिजे. ' अहिती ' पाठ निवडण्याचे कारण ' ज्ञानदेवांनी अव्यक्तोपासकांविषयी १२–६१, ६२ इत्यादी ओव्यांमध्ये नापसंती दर्शविली आहे व ती गीतेतच आहे ' असे पाठशुद्धिकार म्हणतात. वस्तुतः भक्तीवांचून केवळ योगाच्या साहाय्याने केली जाणारी अव्यक्तोपासना क्लेशकारक आहे एवढेच दोघेही म्हणतात.

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते **मामबुद्धयः**
**परं भावं अजानन्तो** ममाव्ययमनुत्तम् ॥ ७–२४

असे म्हणणारे श्रीकृष्ण आणि ' मज उमपा माप:कां सुवावें । मज **अव्यक्ता व्यक्त कां मानावे** । सिद्ध असता का निमावे । साधनवरी ॥ परि हा बोल आघवा । जरि विचारिजतसे पांडवा । तरी विशेषें या जीवां । चोजवेना । असे म्हणणारे ज्ञानदेव अव्यक्तोपासना नापसंत कसे मानतील ? सातव्या अध्यायातील हाच सिद्धान्त भक्ति-योगाच्या पुढील नवव्या अध्ययात सांगितला आहे :—

' अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
**परं भावं अजानन्तो** मम भूतमहेश्वरम् ॥ ९–११ ॥

" पै स्थूलबुद्धि देखणे मातें । तेंचि न देखणें निरुतें । जैसे स्वप्नीचेनि अमृतें । अमर-नोहिजे ॥ तेसें स्थूलाकारीं नाशिवंतें । भरवसा बांधोनि चित्तें । पाहाति मज अविनाशाते तरी कैसेनि दिसें ॥ मज आकार शून्या आकारु......मज अव्यक्तापि व्यक्ति ' मान-

तात म्हणून ' ज्ञान तेंचि ज्ञानासि आधारें करी ॥ ईश्वराचे अविनाशी स्वरूप अव्यक्त आणि निराकार आहे. व्यक्त आकाराला नाश असतो म्हणून अव्यक्त, निराकार अविनाशी ईश्वराची उपासना श्रीकृष्ण ज्ञानदेवांना नापसंत आहे असे म्हणणे बरोबर नाही. अव्यक्ताची उपासना ' विशेषें या जीवा चोजवेना ' म्हणून सर्व जनसुलभ व्यक्तोपासना गीतेने प्रशंसिली आहे. ' तरि व्यक्त आणि अव्यक्त। तूंचि एक निभ्रांत ' या विषयी श्रीकृष्ण व ज्ञानेश्वर यांना शंका नाही. म्हणून व्यक्तोपासकाप्रमाणे अव्यक्तोपास कही मला पोचतात असे गीता सांगते. भक्तीची जोड असली म्हणजे अव्यक्तोपासनेतील क्लेश टळतात. हाच अर्थ ' सर्वभूतहितेरता: ' या विशेषणात सांगितला आहे. समबुद्धी असणारे आणि सर्वभूताना हितकारक असणाऱ्या ईश्वराच्या अव्यक्त स्वरूपात रत असणारे अव्यक्तोपासक ईश्वराला मिळतात. सर्व भूतामध्ये ईश्वर अव्यक्तावस्थेत आहे सर्वभूतीं भगवंत पाहणे आणि त्यांना हितकारक होतील अशा कर्मांनी त्याची भक्ती करणे हे भक्तीचे श्रेष्ठ स्वरूप गीतेला अपेक्षित आहे. अशी भक्ती करणारे लोक अव्यक्तोपासक असले तरी त्याना ईश्वरप्राप्ती होते. या भक्ती योगाच्या दृष्टीने ' हितीं ' हा पाठ ' अहितीं ' पेक्षा अधिक चांगला व बरोबर आहे व त्याचा संबंध ' अव्यक्तीं'कडे आहे.

अव्यक्त आणि व्यक्त यापैकी कोणतीही उपासना ज्यांना चालते त्यांना सांप्रदायिक म्हणता येणार नाही. गीतेने व ज्ञानदेवांनी यापैकी कोणत्याही एका प्रकाराचा आग्रह धरला नाही. कारण ' उपास्ति ते योग्यते अधीन असते ' (ज्ञा. ३–४०) असे त्यांचे मत आहे. कर्मसंन्यास व कर्मयोग यांबद्दल गीतेचे जे धोरण आहे तेच निर्गुण व सगुण, अव्यक्त आणि व्यक्त याविषयी आहे. ' संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ। तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ' या जोड्यापैकी एकाचाच आग्रह धरून दुसऱ्याचा तिरस्कार करण्यात सांप्रदायिकता आहे. निर्गुण, अव्यक्त, संन्यास यांना गीतेने त्याज्य मानले नाही. पण सगुण, व्यक्त व कर्मयोग यांना सुलभत्वामुळे व लोकोपयोगितेमुळे ' विशेष ' मानले आहे. म्हणून " गीतेला व ज्ञानेश्वरांना अव्यक्तोपासना नापसंत आहे " हे पाठशुद्धिकारांचे म्हणणे बरोबर नाही. त्यांना अव्यक्त आणि व्यक्त या दोन्ही प्रकारच्या उपासना पसंत आहेत पण व्यक्तोपासना अधिक पसंत आहे असे म्हणणे बरोबर होईल म्हणूनच १२–२ मध्ये व्यक्तोपासकांना ' युक्ततम ' म्हणूनही १२–३, ४ मध्ये ' अव्यक्तोपासक मलाच पोचतात ' असे गीतेत म्हटले आहे.

गीतेमधील ज्ञान-भक्ति-कर्मयुक्त समन्वित योगाचे आरंभी उद्धृत केलेला श्लोक उत्कृष्ट उदाहरण आहे. सर्वत्र सम असणाऱ्या ईश्वराचे ज्ञान म्हणजे समबुद्धी आणि अशा सर्वभूती असणाऱ्या अव्यक्त ईश्वराची भूतमात्राच्या हितकारक कर्मांनी भक्ती या श्लोकात सांगितली आहे, पण कोणीतरी व्यक्तोपासकाने ' हिती 'च्या मागे ' अ ' घालून अर्थाचा अनर्थ केला. आणि हाच पाठ मूळ ज्ञानेश्वरांचा असे पाठशुद्धिकार म्हणतात कारण काही नक्कलकारांनी या प्रामादिक पाठाची परंपरा पुढे चालविली

आहे. यांत्रिकतेच्या आहारी गेले म्हणजे अनर्थकारक अर्थ घेतल्याशिवाय गत्यंतर नसते. ज्ञानदेवांचा जगातील बहुसंख्य अव्यक्तोपासकांवर राग नाही. पाठशुद्धिकारांचाही नसावा. त्याकरितां "ज्ञानदेवांची मनोवृत्ती, त्यांची जीवनदृष्टी, त्यांचे तत्त्वज्ञान हे लक्षात घेता अनौचित्य किंवा गैरविधान त्यांच्या पदरी बांधणारा असा जर पाठ असेल तर तो त्याज्यच समजावा लागेल" हा त्यांनी पाठशुद्धीच्या विषयी घातलेला दंडक त्यांनी पाळणे इष्ट आहे.

शेवटी एका प्रश्नाचे उत्तर देऊन ही चर्चा संपवू. पाठसंशोधनाच्या नवीन शास्त्रा-प्रमाणे महाभारताची पाठसंशोधित आवृत्ती प्रसिद्ध झाली आहे व ती बहुमान्य झाली आहे. तिच्यासंबंधी चर्चाकाराचे काय म्हणणे आहे ? असे पाठशुद्धिकारांनी विचारिले आहे. चर्चाकाराचे म्हणणे एवढेच आहे की,

( १ ) पाठसंशोधनाच्या नवीन शास्त्राप्रमाणे मोठमोठ्या विद्वानांनी परिश्रम-पूर्वक सिद्ध केलेल्या या भारताच्या या बहुमान्य प्रतीचा उपयोग ज्ञानेश्वरांचे मूळ पाठ ठरविताना पाठशुद्धिकारांनी अवश्य करावा आणि या प्रतीत नसलेले पाठ ज्ञानेश्वरांचे म्हणून मानू नयेत. 'अहिती' हा भारताच्या पाठ शुद्ध सप्तशती गीतेत नसणारा पाठ त्यांनी ज्ञानेश्वरांचा म्हणून स्वीकारताना हा विचार केलेला नाही.

( २ ) दुसरी गोष्ट अशी की व्याकरण शास्त्राने नियमबद्ध केलेल्या संस्कृत ग्रंथाचे शुद्धपाठ ठरविण्याची प्रक्रिया प्राचीन मराठी भाषेला जशीच्या तशीच लावू नये कारण त्यावेळची मराठी भाषा व्याकरणाच्या नियमांनी पूर्णपणे बांधली गेली नव्हती.

( ३ ) तिसरी गोष्ट अशी की ज्ञानदेवानंतर तीन शतकांनी लिहिलेल्या हस्त-लिखितावरून पाठशुद्धीचे कार्य करीत असता नक्कलकारांची संभवनीय प्रमादपरंपरा लक्षात घ्यावी. पोथीचा केवळ जुनेपणा किंवा संख्या यावरच केवळ भर देऊ नये.

( ४ ) चौथी गोष्ट अशी की यांत्रिकतेला त्यांनी शरण जाऊ नये. ईश्वराने त्यांना दिलेल्या सूक्ष्म बुद्धीचा आणि व्यासंगाचा उपयोग करून पाठशुद्धी करताना स्वतः घातलेले दंडक पाळावे. आणि

( ५ ) पाचवी आणि महत्त्वाची गोष्ट अशी की ज्ञानेश्वरी हा गीतेवरील टीका ग्रंथ आहे. महाभारताप्रमाणे स्वतंत्र ग्रंथ नाही. म्हणून मूळ पाठ ठरविताना तो गीतेतील आणि ज्ञानेश्वरीतील इतर ठिकाणच्या विवेचनाशी विरोधी नसेल याची काळजी घ्यावी.

या सूचनांचा काही उपयोग होणार नाही हे माहीत असूनही पाठशुद्धिकारांच्या कार्याचे महत्त्व व प्रचंडत्व लक्षात घेऊन ते निर्दोष आणि बहुमान्य व्हावे म्हणून त्या केल्या आहेत. त्यांना आवडत नसेल तर ही चर्चा प्रस्तुत लेखकापुरती बंद करण्यात येईल. 'अहिती' पाठाचे समर्थन करताना, भक्तिविरहित अव्यक्तोपासना करणारांना भूतांचे अहितकर्ते ठरवून आसुरी संपत्तीच्या लोकांच्या पंक्तीला बसविण्यात आले म्हणून ही पाठचर्चा करावी लागली. कारण पाठशुद्धिकारांनी म्हटल्याप्रमाणे सत्याभास असत्य

पेक्षाही भयंकर असतो. तूर्त या चर्चेमुळे 'अहितीं'चा अहितकरणरूपी अर्थ जाऊन हित–अकरणरूपी अर्थ आला हेही नसे थोडके !

**टीप** : पत्रिकेच्या १७१–७२ या जोड अंकामधील 'पाठचर्चा' या लेखात उद्‌धृत केलेल्या एकनाथांच्या ओव्यातील शेवटच्या दोन ओव्या ए. भा. अ. १४ च्या ३५ व्या श्लोकावरील टीकेत आहेत.

## २ : 'हितीं' की 'अहितीं' ?

### रा. श्री. जोग

---

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या गेल्या दोन-तीन अंकांतून ज्ञानेश्वरीमधील एका ओवीतील एका पाठावरून दोन विद्वन्मतंगजांची झुंज चाललेली पाहिली. त्या विशिष्ट पाठाबद्दल काही लिहावे असे मनात येऊन पुढील टिपण लिहीत आहे.

वादविषय पाठ ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील साठाव्या ओवीतील असून ती ओवी पुढीलप्रमाणे आहे :—

जिहिं सकळभूतांचा हितीं ( अहितीं ) । निरालंब अव्यक्तीं ।
पसरिलिया मती । भक्तीविण ॥

या ओवीत इतर अनेक पाठभेद आहेत. परंतु अर्थदृष्ट्या ते उपेक्षणीय आहेत. वादविषय झालेला पाठभेद वर दिलाच आहे. पाठशुद्धिकार ( म्हणजे प्रा. बनहट्टी ) यांच्या मताने तो 'अहितीं' असा आहे आणि चर्चाकार ( डॉ. पेंडसे ) यांच्या मताने तो 'हितीं' असा आहे. त्रयस्थ या नात्याने आणि ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान काय आहे हे लक्षात न घेताही तो पाठ 'अहितीं' असा नसून 'हितीं' असा आहे असे माझे मत झाले आहे. त्याची कारणे पुढे देत आहे.

( १ ) गीता श्लोक ४ मधील सर्वभूतहिते रताः या शब्दांचे विवेचन तर राहोच; पण साधा अनुवादही ओवी ४६ ते ५९ अखेरपर्यंत कोठेही आलेला नाही. तेव्हा ओवी ६० मध्ये आलेले 'सकळभूतांचां हितीं' हे शब्द त्यांचा अनुवाद म्हणून आलेले असून ती ओवी श्लोक ४ च्या टीकेमध्ये शेवटी, श्लोक ५ टीकेच्या प्रारंभी नव्हे, यावयास हवी असे मला वाटते. हा साधा शब्दानुवाद करिताना हिताचे अहित असे करण्याची काहीच गरज नाही.

( २ ) ज्ञानेश्वर आपल्या टीकेत अनेक वेळा मूळ गीतेतील शब्द किंवा त्याला जवळ येणारा शब्द योजीत असतात असे दिसून येईल. गीताश्लोक ३ आणि ४ मधील पुढील शब्द पाहावे :- श्लोक ३ व ४-अक्षर ( ओवी ४० ), सर्वत्र ( ओ० ४३ ) समबुद्धी ( ओवी ५७ ), इ० श्लोक ५ वरील टीकेत देहवद्भिः ( देहवंतां जीवां- ओ० ७० ), अव्यक्ता गती ( अव्यक्तीं गति-ओवी ७३ ), क्लेश ( ओवी ७४ ) इत्यादी. सकळभूतांचा हितीं हे शब्द सर्वभूतहिते याचा अनुवाद आहे हे स्पष्ट आहे. हा अनुवाद करिताना हिते याचा अहितीं, म्हणजे अगदी विरुद्ध, असा अनुवाद ज्ञानेश्वर करतील हे मला संभाव्य वाटत नाही. मूळ गीतेत हित शब्द आहे याबद्दल संदेह नाही. मूळाचा एवढा विपर्यास ज्ञानेश्वरांनासुद्धा करिता येणार नाही; करण्याचे कारण दिसत नाही.

( ३ ) ' सर्वभूतहिते रत ' हे मूळात म्हणजे गीतेत अव्यक्ताचे वर्णन नाही, त्याची उपासना करणारांचे आहे. या उपासकांस, मग ते अव्यक्तोपासक असले तरी, भूतांचे अहित, आणि त्यातही सकलभूतांचे अहित अभिप्रेत असण्याचे कारण नाही. उपासकांच्या ऐवजी थेट अव्यक्ताकडे त्याचा अन्वय कित्येक करितात. तसा तो मूळात नाही. तसा तो केला, तरी त्या अव्यक्तालाही सकळभूतांचे अहित अभिप्रेत असणे शक्य नाही. अव्यक्ताची उपासना क्लेशकारक, कठिण, संकटपूर्ण असेल; पण ती अहित-कारक आहे असे अव्यक्ताला किंवा त्याची उपासना करणाराला अभिप्रेत असणे शक्य नाही. ती उपासना किती कठिण आहे ते ज्ञानेश्वरांनीच विस्ताराने सांगितले आहे, पण ती अहितकारक कशी ते त्यांनी किंवा मूळ गीतेनेही येथे दाखवून दिलेले नाही. म्हणून अहितीं हा पाठ येथे असू शकत नाही.

( ४ ) असे असताना केवळ संख्येने अधिक असलेल्या पोथ्यांत ' अहितीं ' असा पाठ आहे एवढ्याने तोच खरा पाठ आहे असे म्हणता येणार नाही. ' हितीं ', हा पाठ कोणत्याच पोथीत नसता तर याबाबत अडचण उत्पन्न झाली असती. पण कित्येक पोथ्यांतून तो दिलेला आहे हे पाठशुद्धिकारांसही मान्य आहे. आपल्याकडील आणि मराठी पोथ्यांच्या नकलाकारांची याबाबतची दक्षता ( ! ) लक्षात घेता त्यांतील एखाद्याने आपल्या बुद्धीने, किंवा अजाणताही, हिताचे अहित करणे, आणि नंतर इतर अनेकांनी तोच पाठ स्वीकारणे ही गोष्ट अगदी स्वाभाविक वाटते. म्हणून बहुसंख्य पोथ्यांनी तो पाठ दिला आहे हे निर्णायक कारण होऊ शकत नाही.

( ५ ) ' अहित ' या शब्दाचा सरळ हितविरुद्ध हा अर्थ न घेता आणि त्या-करिता ' अ ' या उपसर्गाचे अनेकार्थ कसे आहेत, हे सांगणारा संस्कृतमधील आधार-श्लोक देऊन अहितीं म्हणजे सकळभूतांच्या हितीं लक्ष देणे ज्यांना शक्य होत नाही, असा घेणे ( प्रा. बनहट्टी यांनी अलीकडील उत्तरात तसे केले आहे ) ही एक केविल-वाणी मखलाशी वाटते. ज्ञानेश्वरांच्या मनात मूळ गीतेविरुद्ध ' अहित ' अर्थाचे प्रति-पादन करावयाचेच असते, तर नुसता ' अहितीं ' शब्द ठेवून व त्याचा अर्थ स्पष्ट न

करून ते थांबले नसते. अव्यक्तोपासनेचे कठिनत्व मूळात नसलेला विस्तार करून ज्यांनी सविस्तरपणे विशद केले, त्यांना ती अहितावी कशी आहे ते दाखवून देणे अशक्य नव्हते. पण त्यांना तसे वाटत नसल्याने व मूळ हित पाठाचा नुसता अनुवादच करावयाचा असल्याने त्यांनी ते केले नाही.

( ६ ) वस्तुतः सर्वभूतहितत्व वा अहितत्व येथे विशेष प्रस्तुतच नाही. प्रस्तुत आहे ते एका उपासनेचे कठिनत्व आणि दुसरीचे सोपेपण. त्या संदर्भात गीतेतील सर्वत्र समबुद्धयः आणि सर्वभूतहिते रताः ही विशेषणेही प्रस्तुत नसून श्लोकपूरणार्थ आली आहेत असे मला वाटते. ज्ञानेश्वरांनीही या दोन शब्दांचा केवळ शब्दानुवाद करून व त्यांचे विवेचन मुळीच न करून हेच दर्शविले आहे. मूळ गीतेत ते शब्द असल्याने त्यांना त्यांचा अनुवाद करावा लागला. ते करिताना ' हितां'च्या ठिकाणी अहित ठेवून देण्याचे काहीच प्रयोजन नाही. तेव्हा तेथील पाठ ' हितीं ' असाच आहे.

( ७ ) एतद्-विषयक घोटाळ्याचे कारण ज्ञानेश्वरीतील ओव्यांची मांडणी-किंवा वाटणी गीतेतील श्लोकांना धरून करिताना कोणीतरी चुकीची केली, हे आहे. अशा चुका ज्ञानेश्वरीत अन्यत्रही झाल्याचे दिसून येते. ही मांडणी किंवा वाटणी ज्ञानेश्वरांनी केलेली अशी आपल्यास उपलब्ध नाही. प्रस्तुत ओवी ६० ही गीतेमधील १२ अध्यायाच्या पाचव्या श्लोकाच्या प्रारंभी घेण्यात आली आहे. या ओवीतील ' निरालंब अव्यक्तीं मती पसरिलिया ' हे शब्द या पाचव्या श्लोकातील ' अव्यक्तासक्तचेतसाम् ' याच्या विवेचनार्थ आले आहेत अशी समजूत करून घेऊन हे करण्यात आले आहे. काहींनी तर या ओवीबरोबर तीवरील ओवी ५९ ही पाचव्या श्लोकाच्या टीकेच्या प्रारंभी घेतली आहे. ( पहा कर्वे–रिसवूड आणि मंगरुळकर–केळकर प्रती ) खरोखर पाचव्या श्लोकातील हे शब्द आणि त्याबरोबर ' अव्यक्ताहि गतिः ' या शब्दांचा अनुवाद ज्ञानेश्वरांनी त्या श्लोकावरील आपल्या टीकेच्या शेवटी शेवटी ओवी ७३ व ७४ मध्ये केला आहे. हे ' अव्यक्तिं गति ' आणि ' झोंबति तरि क्लेशा पात्र होतीं ' या शब्दांवरून स्पष्ट दिसते. ' निरालंबीं अव्यक्तीं मति पसरलिया हे ओवी ६० मधील शब्द गीता–श्लोक ३ मधील ' अव्यक्तं पर्युपासते ' याचा अनुवाद आहे. तो अनुवाद तिसऱ्या श्लोकातच न देता, ते विवेचन चौथ्या श्लोकातही चालवून त्याच्या शेवटी चौथ्या श्लोकातील ' सर्वभूतहिता 'चा अनुवाद करून ज्ञानेश्वरानी त्या दोन्ही श्लोकांचे विवेचन पुरे केले आहे. गीतेच्या ४ थ्या श्लोकाच्या विवेचनात प्रथम ' संनियम्येंद्रियग्रामम् ' याचे सविस्तर विवेचन येते, ओवी ५७ मध्ये ' समबुद्धयः ' याचा अनुवाद केवळ त्याच शब्दाने केला आहे. ओवी ५८ मध्ये ' ते प्राप्नुवंति मामेव ' याचा अनुवाद ' तेही माते पावति ' या शब्दांनी केला व अव्यक्तोपासकांना अधिक काही लाभते असे नाही असे ओवी ५९ मध्ये सांगितले आहे, आणि शेवटी ओवी ६० मध्ये चौथ्या श्लोकातील उरलेला ' सर्वभूतहितेरताः ' याचाही अनुवाद तोच शब्द ठेवून केला आणि तिसऱ्या व

चौथ्या श्लोकाच्या टीकेमध्ये ' अव्यक्तं पर्युपासते ' या शब्दांचा राहून गेलेला अनुवाद वरील ओवीतील ' कष्टचि तेया ', म्हणजे कोणाला, ते ' जिही ' इत्यादी विशेषण-वाक्यात सांगून या दोन श्लोकांचे विवेचन ज्ञानेश्वरांनी संपूर्ण केले आहे. मूळ गीतेत हे दोन श्लोक जोडूनच आले आहेत. ह्याचा संबंध पाचव्या श्लोकाशी नाही, म्हणून ही ओवी ( क्र. ६० ) व अर्थात तीवरील ओवी ५९ ही पाचव्या श्लोकांच्या टीकेच्या प्रारंभी घेणेच अयुक्त आहे. श्लोक ४ मधील सम्प्रबुद्धयः आणि सर्वभूतहिते रताः या शब्दांना प्रस्तुत विवेचनात महत्त्व नसल्याने ज्ञानदेवांनी ते शब्द जवळजवळ तसेच ठेवून दिले आहेत. हे करिताना ' हित ' ऐवजी ' अहित ' शब्द ठेवून देण्याची करामत ज्ञानेश्वरांची असण्याचे कारण नाही. तिसऱ्या श्लोकातील ' पर्युपासते ' याचा अनुवाद ' मति पसरिलिया ' असा करण्यात आणि पाचव्या श्लोकांतील ' अव्यक्तासक्त ' याचा अनुवाद ' आकाशीं झोंबति ' या शब्दांनी पुढे करण्यात मुळात असणारा सूक्ष्म भेदही ज्ञानेश्वरांनी लक्षात घेऊन अनुवाद केला आहे हेही लक्षणीय आहे. सारांश, ज्ञानेश्वरांचा ' सर्वभूतहित ' या शब्दाचा ' सकळभूतांचा हितीं ' हा अनुवाद केवळ मुळातील शब्दाला शब्द ठेवण्याच्या स्वरूपाचा असल्याने—जसा ' समबुद्धि ' या शब्दाचा—येथील पाठ हितीं असाच असला पाहिजे. ' अहितीं ' असा नव्हे.

## ३ : हे लेखन शुद्ध की अशुद्ध ?

अ. म. जोशी

---

अलीकडे मराठी लेखनपद्धतीत रूढ होऊ पाहत असलेल्या अनियमित प्रकाराचा या ठिकाणी निर्देश करावासा वाटतो. या प्रकाराच्या इष्टानिष्टतेविषयी सुज्ञ लेखकवाचकांनी विचार करावा.

आपल्या रोजच्या बोलण्यात आपण जसे शब्दप्रयोग करितो तसे लेखनात करीत नाही, थोडे वेगळे करितो. रोजच्या बोलीतील प्रयोग काहीसे अशुद्ध व अव्यवस्थित असतात; लेखनातील प्रयोग अधिक शुद्ध व व्यवस्थित असतात. बोलताना आपण ' अस, तस, तुझ, माझ ' असे प्रयोग करितो: लिहिताना मात्र हे शब्द ' असे, तसे, तुझे, माझे ' असेच लिहितो. हा सामान्य संकेत आहे व तो कोणालाही मान्य होण्यासारखा आहे. म. सा. महामंडळाने लेखनविषयक नियमावली तयार केली आहे तीत ही गोष्ट मान्य केली आहे.

या नियमावलीतील नियम क्र. १३ पुढीलप्रमाणे आहे :—

" लेखनात पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडी बोलण्याची भाषा घालावी लागते.

त्या वेळी तिचे स्वरूप बोलण्यातील उच्चाराप्रमाणे असावे. अन्य प्रसंगी तसे लिहू नये. ”

अलीकडील मराठी लेखनात—वृत्तपत्रांत, मासिकांत व क्वचित ग्रंथांतही—पुष्कळदा ‘ असं माझं मत झालं आहे ’ अशासारख्या रोजच्या बोलीपद्धतीच्या प्रयोगांचा वापर करण्यात येत असल्याचे आढळून येते. कथाकादंबऱ्यांतील संवादांत असे प्रयोग वापरले तर ते योग्यच ठरेल. परंतु निवेदनात्मक किंवा विवेचनात्मक लेखनातही असे बोलीवजा प्रयोग करण्यात येतात तेव्हा ते खटकल्याशिवाय राहत नाही. माझ्या आठवणीप्रमाणे हा अनियमित लेखनप्रकार काही वर्षांपूर्वी प्रा. ना. सी. फडके यांनी सुरू केला. आता तो सर्रास रूढ होत आहे, आणि मोठमोठे मातबर लेखक या प्रकाराचा अवलंब करून त्यावर मान्यतेचे शिक्कामोर्तब करीत आहेत, व एक अनिष्ट प्रथा प्रचलित करण्याचे श्रेय संपादीत आहेत. इंग्रजी भाषेतही एरव्ही बोलताना isn't, can't, I'll असे प्रयोग करितात, परंतु कथांतर्गत संवाद सोडल्यास इतरत्र हे शब्द is not, cannot, I will अशा शुद्ध स्वरूपातच लिहितात व ते तसेच लिहावयास हवेत.

परंतु या लेखनपद्धतीच्या इष्टानिष्टतेचा प्रश्न क्षणभर बाजूला ठेविला तरी म. सा. महामंडळाने घालून दिलेल्या नवीन शुद्धलेखनाच्या अनुस्वारविषयक नियमांच्या दृष्टीने या लेखनपद्धतीमुळे एक विसंगती उत्पन्न होते हे लक्षात घ्यावयास हवे. ‘असे माझे मत झाले आहे ’ हे वाक्य वरील लेखनपद्धतीप्रमाणे म्हणजे बोली पद्धतीने लिहावयाचे म्हटले तरी ते ‘ अस माझ मत झाल आहे ’ अशा निरनुस्वार स्वरूपात लिहावयास पाहिजे. परंतु बोली पद्धतीच्या लेखनाचे पुरस्कर्ते ते वाक्य ‘असं माझं मत झालं आहे’ अशा सानुस्वार स्वरूपात लिहितात, ते का ? या मंडळींना म. सा. महामंडळाने घालून दिलेले लेखनविषयक नियम मान्य नाहीत असे समजावयाचे काय ?

वर निर्देशिलेला विसंगतीचा प्रकार केवळ निवेदनपर किंवा विवेचनपर लेखनासच नव्हे तर कथांतर्गत संवादांतील लेखनासही लागू पडतो हेही लक्षात घ्यावयास पाहिजे. म्हणजे ‘ असे कसे झाले ? ’ हे वाक्य संवादात एखाद्या पात्राच्या तोंडी घालावयाचे झाले तरी ते ‘ अस कस झाल ? ’ अशा निरनुस्वार स्वरूपातच लिहावयास पाहिजे. पण संवाद—लेखक ते सानुस्वार स्वरूपात लिहिताना आढळतात. असे का ?

तज्ज्ञांनी खुलासा करावा.



अनुक्रमणिका

## ४ : शोधनिबंधांची लेखनपद्धती

अशोक रा. केळकर

---

मराठीतून लिहिल्या जाणाऱ्या शोधनिबंधांचा सर्वसामान्य दर्जा चांगला नसतो. किमान निबंधाची बाह्य मांडणी तरी टापटिपीची असावी तर तीही तशी नसते—संदर्भ-सूचीत नियतकालिकातील लेखांची सुद्धा सूची द्यावी लागते, नुसती नियतकालिकांची सूची देऊन भागत नाही; ग्रंथनामानंतर किमान प्रकाशन वर्ष तरी द्यावे; ग्रंथाला अकार-विल्हे विषयसूची असावी अशा प्राथमिक तक्रारी परीक्षणलेखक आणि परीक्षक वर्षानुवर्षे करीतच आहेत. ( संदर्भसूचीचे अलीकडचे एक विशेष भयाण उदाहरण म्हणजे अनुराधा पोतदार ह्यांचा **मराठीचा अर्थविचार** हा पुणे विद्यापीठाने स्वीकृत आणि प्रसिद्ध केलेला प्रबंध.) ह्या अराजकाला एक सन्माननीय अपवाद म्हणजे प्रियोळकरांच्या करड्या नजरेखालून बाहेर पडलेले प्रबंध. ह्या शिस्तीचा लाभ ध्यायची ज्यांची तयारी आहे त्यांना तो डॉ. स. गं. मालशे ह्यांनी " शोधनिबंधाची लेखनपद्धति " ह्या निबंधाद्वारे करून दिला ही फार उत्तम गोष्ट झाली ( म. सा. प. अंक १७३ एप्रिल—जून १९७०, शिवाय परिषदेतर्फे स्वतंत्र पुस्तिकारूपाने प्रकाशन ).

मालशांनी विषयसूचीबद्दल लिहिलेले नाही. त्याहीबद्दल मार्गदर्शन ते दुसऱ्या लेखात करतील अशी आपण आशा करू या.

तळटिपांतून संदर्भ देण्याच्या ibid. op. cit., loc. cit. आणि ग्रंथाचा संक्षेपाने उल्लेख ह्यावर आधारलेल्या पारंपरिक पद्धतीचे वर्णन त्यांनी केले आहे. त्याखेरीज एक निराळी, अधिक सुटसुटीत पद्धत अलीकडे उपयोगात आली आहे. तिचे वर्णन म. सा. प.च्या वाचकांसाठी इथे देत आहे.

( १ ) नव्या पद्धतीत शेवटी पूर्ण संदर्भांची सूची देणे अनिवार्य आहे; मग तो शोधनिबंध एक लहानसा लेख किंवा परीक्षणलेख का असेना.

( २ ) शेवटच्या सूचीमधील प्रत्येक नोंदीचा संक्षेप स्वतंत्र असतो. तोच दर वेळी वापरला जातो. इबिडसाहेबांची मदत घेण्याची जरुरी राहत नाही. ती संक्षेप करण्याची एक ठरीव पद्धत आहे.

( ३ ) ती पद्धत अशी : ग्रंथकाराच्या नावाचा शेवटचा भाग ( पटवर्धन, स्टीव्हन्स, वेलेक व वॉरन, रामानुजन् ) ध्यावा; जरूर तर नामसादृश्य टाळण्यासाठी आद्याक्षरे किंवा अगोदरचे नाव ह्यांचा समावेश करावा ( जोशी, रा. भि. ( व्याकरणकार ); गाडगीळ, गंगाधर; रामानुजन्, अ. क. ); नंतर प्रकाशनवर्ष द्यावे ( पगडी १९६९;

अनुक्रमणिका

जोग, रा. श्री. १९५७ ); जरूर तरच म्हणजे एकाच ग्रंथकाराच्या नावावर एकाच प्रकाशनवर्षाखाली एकापेक्षा अधिक नोंदी असल्या तर क, ख अशी अक्षरे जोडावी ( टिळक १९०९ क; टिळक १९०९ ख ); नंतर जरूर तर खंड, पृष्ठ, प्रकरण, छेदक, श्लोक इत्यादींचे अंक द्यावेत ( पगडी १९६९ : पृ. १०४). शेवटच्या संदर्भ सूचीमधील नोंदींमध्ये ही क, ख अक्षरे जरूर तिथे घालणे हे अर्थात आलेच.

( ४ ) मूळ विवेचनात ग्रंथकाराचे नाव येऊन गेल्यास त्यालाही फाटा देण्यास हरकत नाही. उदाहरणार्थ ' पगडी ह्यांनी म्हटले आहे की...' असा उल्लेख असल्यास संदर्भ १९६९ : पृ. १०४ एवढाच राहील.

( ५ ) मूळ अवतरण मुख्य मजकुरात आले असेल तर संदर्भ तळटिपेत न देता त्या अवतरणाच्या सुरवातीला किंवा शेवटी कंसात देऊन टाकायला हरकत नाही. म्हणजे तळटिपांची संख्या बरीच कमी होते आणि टंकन, छपाई ह्यांचे काम सुलभ होते. उदाहरणार्थ : ' पगडी ह्यांनी म्हटले आहे ( १९६९ : पृ. १०४ ) की...' किंवा " शोधनिबंध ही विशिष्ट लेखनपद्धतीचा अवलंब करून पूर्वनियोजित रीतीने सिद्ध होणारी गोष्ट आहे. " ( मालशे १९७० क : पृ. २९ ). स. शि. भावे म्हणतात त्याप्रमाणे वाचकाच्या डोक्याचाही खुळखुळा होत नाही.

( ६ ) अप्रकाशित शोधनिबंधाचा संदर्भ देताना प्रकाशनवर्षाच्याऐवजी प्रबंध सादर केल्याचे वर्ष द्यावे. संदर्भसूचीमधल्या नोंदीत ते येईलच; खेरीज प्रबंध मान्य केल्याचे वर्ष वेगळे असल्यास तेही कंसात द्यावे ( पुणे विद्यापीठ, पी-एच. डी. प्रबंध, १९४९ ( मान्य १९५० ), अप्रकाशित ).

( ७ ) संदर्भसूचीतल्या सूचीवही एका नोंदीकडून दुसऱ्या नोंदीकडे संदर्भ ह्याच पद्धतीने देता येतील. उदाहरणार्थ :

कर्वे, ज. नी. १९५६. ' जीवशास्त्र '. माटे १९५६ क : पृ....ते...

माटे श्री. म. ( संपादक ) १९५६ क. **विज्ञानबोध.** पुणे : य. गो. जोशी.

———— १९५६ ख. प्रस्तावना. माटे १९५६ क : पृ....ते...

ज्याला जी पद्धत सोयीची वाटेल ती त्याने स्वीकारावी, परंतु एकच एक पद्धत पुऱ्या निबंधभर वापरावी हे उघड आहे.

इतर काही किरकोळ मुद्दे—जेव्हा एखाद्या व्यक्तीकडून निबंधलेखकाला तोंडी किंवा खाजगी पत्रातून माहिती किंवा मुद्दा मिळाला असेल तेव्हा तसा उल्लेख करावा. उदाहरणार्थ : ' मंगरूळकर, प्रस्तुत लेखकास पत्र, २९. २. १९५६.' अधोरेखन, जाड ठसा मूळ अवतरणात नसलेला मागाहून घातला असल्यास तसा उल्लेख लगेच कंसात करावा : ( अधोरेखन मागाहून घातलेले ). [ sic ] साठी ' ( मू. चू. ) ' ऐवजी ' [ यथामूल ] ' कदाचित् योग्य ठरेल. कंस चौकोनी वापरावा. मूळ अवतरण जसेच्या तसे घेतलेले नाही अशी शंका येण्यास वाचकाला जागा असेल तिथे [ sic ] वापरतात. मूळ चूक असेलच असे नाही, अवांतर गोष्टींमुळेही अशी शंका उद्भवू शकेल.

## ५ : शब्दवेध

## रा. श्री. जोग

---

अभिरूप—मागे आधुनिक व अर्वाचीन या शब्दांबद्दल मी या सदरात काही सूचना केली होती. तीवर इंग्रजीचे प्राध्यापक रा. भि. जोशी यांनी काही आक्षेप घेतले होते. गेल्या अंकात डॉ. अ. रा. केळकर या इंग्रजी-पंडितांनी त्यांचे निराकरण करून माझ्या सूचनेस पाठिंबा दिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

आज 'अभिरूप' या शब्दाबद्दल काही लिहावयाचे आहे. अलीकडे (आता त्यालाही पंचवीस वर्षे होत आली आहेत.) अभिरूप लोकसभा, अभिरूप न्यायालय असे शब्दप्रयोग होत आहेत. इंग्रजीमधील Mock Parliament, Mock Trial या शब्दांचे हे पर्याय आहेत हे उघड आहे. परंतु अभिरूप शब्दाच्या अर्थामध्ये Mock या शब्दाचा अर्थ केव्हांच नव्हता आणि नाही. त्या शब्दाचा अर्थ विद्वान, जाणकार, मान्यवर असा आहे. शाकुंतलातील आरंभीच्या सूत्रधाराच्या 'अभिरूपभूयिष्ठा परिषदियम्' या वाक्यावरून ते स्पष्ट दिसते. Mock या शब्दातील किंचित कुत्सितार्थ अभिरूप-मध्ये नाही. तो अर्थ टाकून केवळ नक्कल वा अनुकरण एवढाच अर्थ Mock मध्ये आहे असे म्हटले, तरी तोही 'अभिरूप' मध्ये नाही. तेव्हा अभिरूप शब्दाची योजना Mock Trial वा Mock Parliament यांच्या पर्याय-शब्दांत करिता येण्यासारखी नाही. नुकतेच विजय तेंडूलकर यांच्या 'शांतता कोर्ट चालू आहे' या नाटकास नाट्यविषयक केंद्रीय पारितोषक मिळाल्याचे आणि त्याचे अनुवाद इतर भारतीय भाषांत करण्यात येणार असल्याचे प्रसिद्ध झाले आहे. ते नाटक 'अभिरूप न्यायालया'च्या कल्पनेवर आधारलेले आहे. तेव्हा अभिरूप या शब्दाचा चुकीचा उपयोग त्या भाषांपर्यंत जाईल अशी भीती वाटते. अभिरूप शब्दाऐवजी प्रतिरूप हा शब्द चालेल. त्यात अनुकरण, नक्कल हे अर्थ येऊ शकतील. संस्कृतमधील विडंबन हा शब्द अधिकच बरा; कारण, त्यात नक्कल, अनुकरण यांचा अर्थ असून Mock मधील अर्थच्छटाही आहे. तो शब्द नको असे वाटल्यास 'प्रतिरूप' शब्द चालावयास काहीच हरकत दिसत नाही.

### कधी-काही

प्रस्तुत सदरात पारिभाषिक वाङ्मयीन शब्दांचाच विचार होईल अशी माझी कल्पना होती. परंतु गेल्या अंकात 'माळा-मजला-माडी' यांचाही वेध घेण्यात आला असल्याने वाङ्मयीन शब्दविचारापेक्षा वेगळाही विचार येऊ शकेल असे दिसते. म्हणून

अनुक्रमणिका

अलीकडे कधी-केव्हा ' या शब्दांचा उपयोग जो उपयोग होत आहे त्याकडे मी लक्ष वेधू इच्छितो. सध्या 'केव्हा' शब्दाचा उपयोग कमीच होतो, व त्याचे काम 'कधी' या शब्दाने करून घेण्याकडे प्रवृत्ती दिसते. मान्यवर लेखकही तसे करितात. म्हणून त्याकडे लक्ष वेधणे प्राप्त होते. कधी आणि केव्हा हे दोनही शब्द प्रश्नार्थक कालवाचक आहेत. तथापि त्यांच्या अर्थात पूर्वी काही सूक्ष्म भेद असे. केव्हा आलास-केव्हा जाणार इत्यादी वाक्यांतून हे प्रश्न केल्यावेळचा जो काळ असे, त्याच्या आधीचा किंवा नंतरचा जवळचा, पण **त्याच दिवशीचा** काल बहुधा अभिप्रेत असे, आणि कधी आलास-कधी जाणार या वाक्यांतून त्या दिवसाच्या आधीचा किंवा नंतरचा काल अभिप्रेत असे. 'केव्हा' हा शब्द क्वचित् 'कधी'च्या अर्थाने योजला गेला, तरी 'कधी' हा शब्द वर दिलेल्या अर्थाने केव्हाही योजिला जात नसे. वस्तुतः एकच शब्द दोनही अर्थानी वापरावयाचा असला, तर तो 'केव्हा' हा वापरता येण्यासारखा होता. पण सध्या उलटच चालले आहे असे दिसते. 'कधी' या शब्दाचाच दोनही प्रसंगी उपयोग होत आहे. तेव्हा सूचना अशी की **केव्हा**-म्हणजे **आज** आत्ता प्रश्न करण्याच्या जवळचा आधीचा किंवा नंतरचा काल; व **कधी**-म्हणजे प्रश्न करण्याच्या आधीचा किंवा नंतरचा काल, पण **आज नव्हे**, काल-परवा किंवा त्यापूर्वीही अथवा उद्या-परवा किंवा त्यानंतरही अशी त्या दोन शब्दांची विभागणी करावी. निदान पहिल्या अर्थी 'कधी' हा शब्द वापरू नये, पूर्वीप्रमाणे 'केव्हा' हा शब्दच वापरावा.



## ६ : दिवाकर कृष्णांची कथा

सुरेश जोशी

---

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' अंक १७३— एप्रिल, मे, जून १९७० वाचला. अंकाचे नवे स्वरूप आवडले. अंतरंगही. प्रा. म. ना. अदवंत यांचा 'दिवाकर कृष्णांची कथा' हा लेख आस्थेने वाचला. प्रा. अदवंतांच्या लेखाबद्दल माझी प्रतिक्रिया अशी-

१. प्रा. अदवंतांच्यासारख्या ज्येष्ठ आणि श्रेष्ठ प्राध्यापकाचा दिवाकरांच्या कथेवर लेख प्रसिद्ध झाल्यामुळे अनेक दिवस उपेक्षित राहिलेल्या एका चांगल्या आणि जुन्या

कथाकाराची आजच्या नव्या पिढीला ओळख होत आहे. लेख विस्तृत आहे पण परिपूर्ण नाही.

२. कथेची अनुरूप भाषा हे दिवाकरांच्या कथेचे बलस्थान आहे. त्यांच्या या भाषासामर्थ्याचे विशेष विवेचन व्हायवयास हवे होते. विशेषतः भाषेला जाणीवपूर्वक नटवण्याचा मोह दिवाकरांनी टाळला आहे, हे त्यांच्या समकालीन कथाकारांच्या, (आणि कांही प्रमाणात नंतरच्याही) पार्श्वभूमीवर लक्षणीय आहे. त्यांच्या कथेसारखीच त्यांची भाषा मोजकी आहे. नेमकी आहे.

३. भाषेच्या संदर्भातच लक्षात राहणारा दिवाकरांचा दुसरा विशेष म्हणजे त्याची संवादरचना. कथानकाला गती देत देत व्यक्तिरेखा स्पष्ट करणारे आकर्षक संवाद त्यांच्या 'कैलासाचा निर्माता', 'संकष्ट चतुर्थी', 'समाधि' यांसारख्या कथे-मध्ये आढळतात. प्रा अदवंतांच्या लेखात याचा विचार झालेला दिसत नाही,

४. दिवाकरांच्या कथेमधून प्रकट होणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व पाहता रविन्द्रनाथ टागोरांच्याशी त्यांचे फार जवळचे नाते जुळते. कदाचित् त्यांच्या प्रतिभेची झेप तेवढी मोठी नसेल. तथापि रविन्द्रवाङ्मयातून त्यांना कांही प्रेरणा मिळाल्या नसतील काय ?

५. दिवाकरांची कथा बोधवादापासून मुक्त आहे. केवळ हरिभाऊंचीच नव्हे तर आजचा पु. भा. भावेंसारख्या नवकथाकारांची कथासुद्धा यापासून मुक्त नाही. शिवाय नंतरच्या काळातील तंत्र-मंत्राच्या चौकटीतही ती सापडली नाही. मनोरंजना-वर धन्यता न मानता लेखकाच्या प्रामाणिक आविष्कारानाला दिवाकरांची कथा अधिक महत्त्व देते,

६. दिवाकरांची कथेबद्दलची कल्पना व्यापक व निश्चित बैठक असलेली आहे हे त्यांच्या 'मराठी लघुकथेचा विकास' (पहा 'महाराष्ट्र परिचय-' प्रसाद प्रकाशन) या लेखावरून दिसून येते. प्रा. अदवंतांच्या लेखात दिवाकरांच्या या कथेबद्दलच्या विचाराचे विवेचन झाले असते तर त्यांचा लेख अधिक परिपूर्ण झाला असता. वर उल्लेखलेल्या काही वैशिष्ट्यांचा ओझरता उल्लेख त्यांच्या लेखात (पृ. ५४ पहिला परिच्छेद) आहे. पण त्या सर्वांचे सविस्तर विवेचन अपेक्षित होते

## ७ : तुलनात्मक छंदोरचनेचे परीक्षण

ना. ग. जोशी

---

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या नुकत्या प्रकट झालेल्या १७३ व्या अंकात माझ्या 'तुलनात्मक छंदोरचना' या ग्रंथाचे सविस्तर व गुणग्राही परीक्षण प्रा. भ. श्री. पंडित यांनी केलेले वाचले. त्यातून जो स्नेहमूलक सद्भाव व्यक्त झालेला आहे, त्याबद्दल त्यांस अनेकानेक धन्यवाद.

सदरहू परीक्षणात काही गोष्टींची नव्याने माहिती झाली. 'छंद प्रभाकर', तात्रे कर्त्यांचा गर्भा, कै. शंकर मोरो रानडे यांचे 'वृत्तकुतूहल' या संबंधांतली माहिती महत्त्वाची आहे. शब्दानुशासन या हेमचंद्राचार्यांच्या ग्रंथाचा उल्लेख नसल्याबद्दल परीक्षणात नाराजी दर्शविली गेली आहे. परंतु, त्यांच्या "छंदोनुशासना"चा उल्लेख प्राकृत अपभ्रंश छंदांच्या संदर्भात आलेला असल्यामुळे व तोच ग्रंथ सर्वाधिक महत्त्वाचा असल्यामुळे 'शब्दानुशासना"चा उल्लेख नसला, तरी चालण्यासारखे आहे. गुजराथीच्याच नव्हे; तर पश्चिमोत्तर सर्वच भारतीय भाषांतले प्राकृत-अपभ्रंशकालीन छंद त्यात आहेत. तेच पुढे "प्राकृत पिंगल" ग्रंथात विशेष विस्तारले आहेत. हा संबंध अधिक स्पष्ट करावयास पाहिजे होता, असे मात्र आता वाटू लागले आहे. दुसरे एक विधान गुजराथी-राजस्थानी या भाषांतील परस्परसंबंधाबाबत आहे. इसवी सनाच्या तेराव्या-चौदाव्या शतकापर्यंतचे अपभ्रंश साहित्य व त्यानंतरचे प्रारंभिक 'देशी' साहित्य गुजराथी-राजस्थानी भाषांचे संयुक्त संस्कारधन आहे. ही परिवर्तनकालीन भाषाच 'जुनी गुजराती + जुनी राजस्थानी' होय. गुजरात-मधल्या भाषाभ्यासकांनी त्या मध्यंतराच्या भाषेला 'मारु - गुर्जर' भाषा असे नाव दिलेले आहे. 'राजस्थानी' या स्वतंत्र बोलीचा प्रदेश म्हणजे दक्षिण-पूर्वराजस्थान. पश्चिम-उत्तर राजस्थानची बोली याहून वेगळी. या बोलींच्या नामकरणासंबंधात मदभेद असले, तरी दक्षिण-पूर्व राजस्थानची बोली 'डिंगल' नावाने ओळखली जाते. जुनी गुजराती व जुनी डिंगलबोली या सख्या बहिणी आहेत. उलट उत्तर-पश्चिम राजस्थानची जुनी बोली 'पिंगल' नामक असून तिचा सीधा-साधा संबंध व्रज भाषेशी आहे, "पृथ्वीराजरासो" हा पिंगलबोलीचा जगप्रसिद्ध ग्रंथ, मीरेची भजने व 'रघुनाथ रायरो गीत' यांसारखी कवने डिंगल बोलीची उत्कृष्ट निर्मिती. परीक्षणलेखात याबाबत काही संदेहकारक विधाने आढळल्यामुळे हे स्पष्टीकरण.

सर्वांत मोठे विवाद्य स्थळ म्हणजे पृ. १०६ वरील मोरोपंती गीता संबंधातली चर्चा. 'सख्या राम हरे कृष्ण हरे बोल बरे' या ध्रुवपदाचे ते पद गझलाच्या धाटणीचे

नाही. त्यात 'गालगागा' [ – ˘ – – ] असा मात्रागट सुतराम संभवत नाही. त्यातील सर्व आवृत्त मात्रागट षण्मात्रक 'भृंगा' चे आहेत. ते पद 'दादरा' ताला-तले स्वभावतः आहे. त्यात 'सख्या', 'बरे', 'हरे', 'तरे', 'करि', 'त्वरे', असे 'लगा'त्मक [ ˘ – ] तुकडे असून बाकीचे 'गाल [ – ˘ ] असे तुकडे आहेत. हे सर्व त्रिमात्रक गट आहेत. द्विरावृत्तीने षण्मात्रक गट होतात. असे दोन षण्मात्रक मिळून 'दादरा' तालाचा एक मात्रागट होतो.

˘ – | – ˘˘ –   – ˘˘ –   – ˘˘ +
सख्या । रामहरे   कृष्णहरे   बोलबरे

– ˘ – ˘ – ˘ – ˘   – ˘ – ˘ – ˘ – ˘
दुस्तराभवार्णवासी   सर्वपूर्वजासमेत

– ˘ – ˘ –   ˘ – ˘ – ˘   – ˘ – ˘˘ +
या कलीतही   सुखेचि विघ्न   लाजवूनि तरे

अशा प्रकारचा त्याचा छंदोलेख होतो. ध्रुवपदात अंती एक गुरू अधिक व अंत-ऱ्याच्या अंतीही एक गुरू अधिक घालून [ पण ही अधिकाक्षरे म्हणजे ओढलेले स्वर आहेत हे जाणून ] आपण जर मोरोपंतांचे

'धणी । सकल तरणिकुलजनृपति मुकुटमणि । रे ॥'

हे पद पाहिले, तर रचना जवळ जवळ सारख्याच छंदोलयीची आढळेल. हे पद मी 'मराठी छंदोरचनेचा विकास' मध्ये ( पृ. ३५२ ) दिलेले आहे. परीक्षणातील पदात आढळणारी आद्यतालकपूर्व मात्रागटाची मांडणी "छंदोरचने'त नमूद नाही; पण अंती दीर्घाक्षर अधिक आल्याने होणारी मोडणी "रुचिरवदना" जातीसारखी सामान्य पणे म्हणता येईल. या दोन्ही पदांत गझलाची वैशिष्ट्यपूर्ण मोडणी नाही. त्यामुळे या गझल-रचना म्हणता येत नाहीत. मोरोपंतांची "म. छं. विकास" मध्ये दिलेली दोन पदे खास गझल रचनेची आहेत.

प्राकृत पद्यांतील शब्दांच्या उच्चारांना नियम नाही, असेही मत प्रा. पंडित यांनी जाताजाता नमूद केले आहे. त्यांचे नियम आहेत; पण त्यांकडे मराठीने पुरेसे लक्ष दिलेले नाही. त्या मानाने गुजरातीत प्राकृत-अपभ्रंशासंबंधातली जागरूकता वाखाणण्या-सारखी आहे. अनेक ठिकाणी उच्चार सानुस्वार होऊन लघू अक्षर लघूच रहाते, तसेच, अनेक वेळा दिखाऊ जोडाक्षरे पुढे असताही मागल्या लघूचे गुरू अक्षर होत नाही. आधुनिक भारतीय भाषांमध्ये ही गोष्ट सर्रास चालू आहे. त्यामुळे 'संयोग ह्रस्वास गुरुत्व देतो' या ऐवजी 'आघात ह्रस्वास गुरुत्व देतो' असा नियम सांगावा लागल्याचे त्यांना विदित असेलच.

त्यांचे सर्वांत ' चिंत्य ', खरोखर विवाद्य मत म्हणजे भारतीय छंदांच्या तुलनात्मक विवरणात पाश्चात्य छंदांचे-विशेषतः इंग्रजी छंदांचे-विशेष महत्त्व नाही, अशा अर्थाचे आहे. माझे मत याबाबत सर्वस्वी विरुद्ध आहे हे पुस्तकावरूनच दिसून येईल. लॅटिनमधून आलेल्या फ्रेंच सारख्या भाषांतील छंदांत भारतीय भाषांमधील छंदांना समान असा बराच भाग आहे. इंग्रजी भाषेची घटना वेगळी असली, तरी ' बोलीतील लय ' समोर ठेवून होणाऱ्या अद्यतन भारतीय छंदःप्रयोगांत इंग्रजीतील प्रयोगांमुळे आलेली स्फूर्तीच मुख्य कारक शक्ती आहे. शिवाय आधुनिक काळचे बहुतेक सर्व पद्यांचे व छंदांचे प्रयोग इंग्रजीतील तत्सदृश प्रयोगांचे ब्रोट धरूनच झालेले असल्यामुळे इंग्रजीतील छंदांची तुलना, ' निर्यमक छंद ', ' मुक्त छंद ', ' मुक्त लयबद्ध शैली ' यांच्या संदर्भात तर अपरिहार्यच आहे.

# कॅ. लिमये : आधुनिक मराठी कथेचे जनक

वि. वा. शिरवाडकर

मराठी साहित्य सृष्टीतील एका भीष्माचार्यांचा या ठिकाणी आपण गौरव करीत आहोत. कॅप्टन लिमये हे मराठी रसिकांना नुसते परिचित नाहीत तर अतिशय प्रिय आहेत. गेली ५० वर्षे त्यांनी जे लेखन केले आहे, त्या लेखनाने त्यांनी मराठी वाचकांचं मन जिंकलेलं आहे. परंतु त्यांना हे जे यश मिळालं, हे यश बाजारामध्ये वटविण्याचा प्रयत्न कॅप्टन लिमये यांनी कधीही केला नाही. त्यांच्या बाबतीमध्ये ही एक मला अत्यंत महत्त्वाची विशेष अशी गोष्ट वाटते. स्वतःच्या यशापासून विभक्त होणं, स्वतःच्या यशापासून स्वतःला तोडून घेणं, ही गोष्ट अतिशय कठीण आहे. आणि ज्या दुर्मिळ अशा लेखकांना किंवा साहित्यिकांना तो जमलेली आहे त्यांत कॅप्टन लिमये हे एक आहेत. तेव्हा त्यांनी कुठल्याही सत्काराची, गौरवाचीही अपेक्षा कधीही केलेली नाही. ज्या एका हाताने त्यांनी मराठी वाचकांना सुंदर साहित्याची देणगी दिलेली आहे, तो हात पारितोषिकासाठी राहो, परंतु साधी पोच घेण्यासाठी देखील त्यांनी पुढे कधी केलेला नाही, इतके ते त्याच्यापासून बाजूला आहेत. ग्रीक इतिहासामध्ये डायोजिनस या तत्त्ववेत्याची एक कथा आहे. आपल्यांपैकी पुष्कळांना ती माहिती असेल. तो एक मोठा तत्त्ववेत्ता होता आणि सिकंदराने जेव्हा ते शहर काबीज केले तेव्हा त्याला असे वाटले की, या तत्वेत्त्याच्या घरी आपण जावं, आणि त्याचा आपण काही आदरसत्कार करावा. त्याप्रमाणे तो गेला, तेव्हा डायोजिनस अंगणामध्ये ऊन खात बसला होता. त्याला शिकंदराने विचारले, की 'मी आपल्यासाठी काय करू शकतो?' त्याने सांगितले की, 'माझ्या अंगावर ऊन येण्याच्या मार्गामध्ये तुम्ही उभे आहात, तेव्हा कृपा करून बाजूला व्हा. याच्यापलीकडे तुमच्यापासून मला काहीही नको आहे.'

---

'आधुनिक मराठी लघुकथेचे जनक—गोपाळ गंगाधर लिमये यांच्या निवडक कथा.' या पुस्तकाच्या प्रकाशनसमारंभप्रसंगी केलेले महत्त्वाचे भाषण.

अनुक्रमणिका

तेव्हा अशा एशा भावनेनं स्वतःच्या कर्तृत्वापासून स्वतःला बाजूला करून कार्य करीत राहण्याचे हे जे काही एक सामर्थ्य आहे, ते असामान्य आहे आणि हे सामर्थ्य कॅप्टन लिमये यांच्यामध्ये आपल्याला दिसून येते. आणि म्हणून अशा गौरवसमारंभाला ते खरोखर मोठ्या उत्साहाने उपस्थित राहतील की नाही अशी मला शंका वाटत होती. परंतु प्रकाशक आणि मुद्रक हे पाठीमागे लागल्यामुळे, मला वाटतं की, त्यांना नकार देता आला नाही. परंतु त्यामुळे आम्हा मराठी वाचकांच्या दृष्टीने ही एक अत्यंत समाधानाची बाब आहे की, ह्या मोठ्या लेखकासंबंधीची आमची कृतज्ञतेची भावना आज आम्हांला या ठिकाणी प्रकट करता येत आहे.

८० व्या वर्षामध्ये त्यांनी पदार्पण केलेले आहे. परंतु हा केवळ वयाचा सन्मान आहे असे मानायचे कारण नाही. एका सुभाषितामध्ये असे म्हटलेले आहे की, ज्या समाजामध्ये वृद्धांचा सन्मान होतो आणि स्त्रियांना संरक्षण मिळते तो समाज हा सुसंस्कृत मानावा. ही गोष्ट खरीच आहे. परंतु जेव्हा वयोवृद्धांचा सत्कार आपण सामूहिक रीत्या करतो तेव्हा केवळ आपण वयाचा विचार केलेला नसतो असे मला वाटते. कारण वय ही एक अशी वस्तू आहे की, जी आपोआप वाढत जाते, त्याच्यासाठी काहीही खटपट करावी लागत नाही. आपल्या सर्वांना हे माहीत आहे, परमेश्वराची कृपा असेल आणि प्रकृतीची साथ असेल तर मनुष्य हा एका वर्षाच्या दालनातून दुसऱ्या वर्षाच्या दालनात आपोआप रेटला जातो- विनासायास. प्रश्न हा असतो की, या विशिष्ट वयाच्या आमदानीमध्ये, कारकीर्दीमध्ये त्या माणसाने समाजासाठी काय केले आहे? आणि समाजासाठी म्हणजे अखेर तुमच्यासाठी आणि माझ्यासाठी! हे जर त्यांनी काहीही केलेले असेल तर, त्या ऋणाचा ढिंडोरा नव्हे, परंतु त्या ऋणाची जाणीव ही आपल्या मनामध्ये जागृत आहे हे त्याला दाखवणे हे आवश्यक असते. हे देखील संस्कृतीचे एक लक्षण आहे. आणि म्हणूनच आजचा हा समारंभ या ठिकाणी आयोजित झाला याबद्दल मला अतिशय समाधान वाटते. संयोजकांचे मी अभिनंदन करतो.

कॅप्टन लिमये यांनी १९१२ पासून आपल्या कथा-लेखनाला सुरुवात केली. परंतु एक गोष्ट ही निःसंशय खरी आहे की, मराठी वाचकाला कॅप्टन लिमये हे परिचित आहेत, ते विनोदी लेखक म्हणून. आणि विनोदी लेखनाच्या क्षेत्रामध्ये त्यांनी जे यश मिळविले आहे, जी भर घातली आहे ती अतिशय मोठी आहे असे मला वाटते. केवळ पारंपरिक अशा प्रकारचे विनोदी लेखन त्यांनी केलेले नाही. आपण असे मानतो की, मराठीमध्ये विनोदी लेखनाची ही परंपरा कोल्हटकर आणि गडकरी यांनी सुरू केली आणि ते त्यांचे प्रवर्तक आहेत; आणि ते खरे आहे, त्याच्याबद्दल काही दुमत होण्याचे कारण नाही. तेव्हा गडकरी, कोल्हटकर यांची ही लेखन परंपरा—विनोदी लेखनाची परंपरा—ही कॅप्टन लिमये यांनी नुसती समृद्ध केली असे नव्हे, तर तिची गुणवत्ता त्यांनी वाढविली आणि त्यामध्ये त्यांनी काही एक वेगळी धारा निर्माण केली आहे. आपण सहजगत्या जर कोल्हटकर-गडकऱ्यांचे विनोदी लेखन एका बाजूला ठेवले आणि

कॅप्टन लिमये यांचे दुसऱ्या बाजूस ठेवले, तर लिमयांनी विनोदी लेखनालादेखील कसा एक वेगळा स्वभाव दिलेला आहे, वेगळे वळण दिलेले आहे हे आपल्याला दिसून येते.

अतिशयोक्ती हा कोणत्याही विनोदाचा एक मूलधर्म असतो. अर्थात आज माझ्यासारख्या वक्त्याने अध्यक्षांसमोर विनोदासंबंधी बोलणे हा एक विनोदच आहे. परंतु एक वाचक म्हणून जे मला वाटते ते मी आपल्याला सांगतो, की ह्या अतिशयोक्तीचे जे एक अतिशयोक्त असे रूप पुढे आपल्याला मराठी साहित्यामध्ये दिसावयास लागले, त्यामुळे विनोदाचा जो काही एक मूळ उद्देश होता, तो त्या ठिकाणी पराभूत झाला आहे, असे आपल्याला वाटते. कारण कोणतीही चांगली गोष्ट असली तरी तिचा अतिरेक अखेरीस त्या चांगुलपणाची देखील हानी करणारा असतो. ठकीचे लग्न वगैरे जे गडकऱ्यांचे–बाळकरामाचे–विनोदी लेख आहेत, त्यांच्यामध्ये आपल्याला हे प्रत्यंतर येते. अतिशयोक्ती ही देखील कुठपर्यंत ताणत न्यावी ! कोल्हटकरांचे एक फार सुंदर वाक्य एका नाटकात आहे. त्यांनी असे म्हटले आहे की, बंदूक मारण्यासाठी नेम धरणारा मनुष्य एक डोळा मिटतो. परंतु एखाद्या माणसाने असे म्हटले की, एक डोळा मिटल्यानंतर नेम इतका चांगला लागतो तर दोनही डोळे मिटले तर किती चांगला लागेल ! आणि तसा जर त्याने प्रयोग करून पाहिला तर नेम लागायचा तो कुठेतरी लागेल परंतु जिथे लागायला पाहिजे तिथे लागणार नाही. चांगल्या गोष्टीचा-देखील अतिरेक आणि विचारशून्य उपयोग हा असा हानिकारक होताना दिसतो

परंतु कॅप्टन लिमये यांनी जे काही एक विनोदाचे स्वरूप आपल्या साहित्यामध्ये सिद्ध केलेले आहे, हे माझ्या दृष्टीने वास्तवाच्या अधिक जवळ जाणारे आहे. जीवनाला अधिक स्पर्श करणारे आहे. आणि इतकेच नव्हे तर जीवनाचा जो प्रांत पूर्वीच्या विनोदी लेखनाने व्यापला होता, त्याच्याही पलीकडे जाणारे आहे. कॅप्टन लिमये यांचा जीवनाचा अनुभव हा फार मोठा आहे आणि तो त्यातला एक फार महत्त्वाचा भाग आहे.

प्रा. आंबेकरांनी लिहिलेल्या एका लेखामध्ये मी वाचले की, कॅप्टन लिमये हे पुण्याला काही वर्षे रहात होते आणि पुणेकर होण्याची त्यांची इच्छा होती. ते पुणेकर झाले नाहीत हे एका दृष्टीने बरे झाले. म्हणजे या दृष्टीने की बाहेरचे जग त्यांना पहावयास मिळाले आणि विशिष्ट एका मर्यादेमध्ये ते राहिले नाहीत. तेव्हा हा जो एकंदर व्यापक जीवनाचा अनुभव त्यांना मिळालेला आहे, हा अनुभव त्यांच्या विनोदी साहित्यात देखील आपल्याला दिसून येतो. परंतु आज या ठिकाणी आणखी एक नवीन विचार आपल्या-समोर श्री. राम कोलारकर यांनी मांडलेला आहे आणि तोही फार महत्त्वाचा आहे. कथा किंवा कादंबरी हा काही माझ्या अभ्यासाचा किंवा विचाराचा विषय नाही. परंतु अभ्यासाचा विषय नसला तरी, काही आपले म्हणून विचार असतात. म्हणून त्यासंबंधी मी थोडक्यात आपणास असे सांगू इच्छितो की, मराठी लघुकथेचे जनक हे कॅप्टन लिमये आहेत असे कोलारकर म्हणतात, हे आपण सर्वांनी मान्य करायला पाहिजे. कोलारकर हे संशोधक आहेत आणि संशोधक हे काही ना काही तरी भानगडी नेहमी निर्माण करीत असतात.

अनुक्रमणिका

एकदा इतिहासाच्या भुयारामध्ये ते शिरले म्हणजे कोणता निर्णय घेऊन ते पुन्हा त्यातून बाहेर येतील आणि आपल्या विचाराला काही एक नवीन प्रोत्साहन, चालना देतील त्याचा नेम नसतो. ही एक फार महत्त्वाची गोष्ट त्यांनी या संशोधनामुळेच आपल्याला सांगितली आहे आणि त्याच्या पाठीमागची कोलारकरांची जी तपश्चर्या आहे ती अतिशय मोठी आहे. या पुस्तकाची नुसती जर आपण सूची पाहिली तर कथांचे आणि कथांसाठी वृत्तपत्रांचे डोंगरच्या डोंगर त्यांनी अक्षरशः पालथे घातलेले आहेत असे आपल्याला दिसून येते. आणि ही नुसती मेहनत आहे असे नव्हे, त्याच्यापाठीमागे कथेसंबंधीची एक अतिशय चांगली अशी समज आहे, एक बुद्धीही आहे आणि त्या दृष्टीने त्यांनी या कथांचे संपादन केलेले आहे. त्यांनी हा जो एक शोध लावला किंवा त्यांनी हा जो एक नवीन निर्णय आपल्यापुढे ठेवला आहे, त्याच्यासंबंधी म्हणूनच मला नक्की आदर वाटतो. त्याच्याबद्दल मला काही शंका नाही.

परंतु मला एक असं वाटतय की, जनक एकच असावा किंवा असायला हवा, ही जी आपली एक सांसारिक नीतिमत्तेची कल्पना आहे, ती साहित्याच्या क्षेत्रामध्ये न्यायबुद्धीने खरोखर काहीही कारण नाही. कारण ती खरोखर नेता येत नाही अशी परिस्थिती आहे. ही फार कठीण गोष्ट आहे. कोणत्याही कलेच्या किंवा साहित्याच्या प्रांतामध्ये जेव्हा काही एखादे परिवर्तन घडून येते तेव्हा त्या परिवर्तनाच्या जाणिवा या त्या समाजामध्ये अगोदर निर्माण झालेल्या असतात. सूर्योदयापूर्वी सूर्याचा प्रकाश जसा आकाश-आकाशाचा एक कोपरा-व्यापून टाकतो, त्याप्रमाणे परिवर्तन होण्यापूर्वी, परिवर्तनाची जाणीव ही समाजात कुठंतरी उगवलेली असते, आणि त्यामुळे ह्या परिवर्तनाचे जे एक आकलन आहे, हे आकलन अनेकांना अनेक प्रकाराने या ठिकाणी होत असते. मला तर नेहमी असे वाटते की, कोणत्याही काळातील क्रान्तितत्त्व हे त्या काळाच्या दाराशी शिलारूप झालेल्या आहिल्येप्रमाणे पडलेले असते आणि ते एखाद्या रामचंद्राच्या हस्तस्पर्शाची प्रतीक्षा करते. परंतु त्या ठिकाणी रामचंद्र हा एक होता. या ठिकाणी रामचंद्र अनेक असतात, आणि ते असणे स्वाभाविक असते, नव्हे आवश्यक असते. कारण शंकराच्या डोक्यातून गंगा अवतरली त्याप्रमाणं कोणा एका लेखकाच्या डोक्यातून सर्वस्वी काही नवीन अवतरते हे असंभवनीय आहे. कोणतीही साहित्यातील किंवा कलाक्षेत्रातील क्रांती ही मूलतः उत्क्रांतीच असते, असे मला वाटते. त्याला काही एक पार्श्वभूमी असते, पूर्वसूत्र असते. एक उदाहरण म्हणून मी आपल्याला सांगतो की, केशवसुत हे मराठी काव्याचे जनक, आधुनिक मराठी काव्याचे जनक, हे समीकरण आम्ही इतके मान्य केले आहे की ते आम्ही अगदी बाळबोध करून टाकले आहे. ज्यांचा काव्याशी संबंध हा मर्यादित आहे त्यांना असे वाटते, परंतु खरोखर तसे नाही. त्या काळातील साऱ्या काव्याचे जर आज निरीक्षण केले तर, जे केशवसुतांनी केले आहे ते करण्याचा प्रयत्न त्या कालामध्ये अनेक कवींनी केलेला आहे असे आपल्या लक्षात येईल. नारायण वामन टिळक, कवी दत्त, विनायक, माधवानुज

इत्यादी सर्वांनी हेच करण्याचा प्रयत्न केला आहे. तांब्यांनी देखील केलेला आहे. आणि त्या सर्व कवींनोही केशवसुतांच्यापासून प्रेरणा घेतली किंवा स्फूर्ती घेतली असे म्हणायला काही जागा नाही. त्या साधारण पंधरा-वीस वर्षांत झालेले हे कवी आहेत. म्हणून मला सारांशाने सांगायचे आहे ते असे की, कोणत्याही काळातील जे परिवर्तन असते ते त्या काळच्या आकाशामध्ये अगोदर कोठेतरी निर्माण झालेले असते. आणि लिमयांच्या-सारख्या श्रेष्ठ प्रतिभाशाली लेखकांचे श्रेय हे आहे आणि त्यांची महती ही आहे की, हे जे कालतत्त्व आहे ते ते आपल्या प्रतिभेने शब्दांमध्ये आकलन करू शकतात, आपल्या शब्दांच्या द्वारा मांडू शकतात. असे लेखक त्या वेळेला आणखीही काही झाले असतील. परंतु हा वाद आपण बाजूला ठेवू. कारण जनक एक असतो की नाही त्याच्याबद्दल हा प्रश्न आहे. एकच असला तरी कॅप्टन लिमये हेच आहेत, याच्याबद्दल मलाही काही शंका नाही. परंतु हे आपण मानायचे की काय, हा प्रश्न आहे. परंतु हा प्रश्न जरी आपण बाजूला ठेवला तरी या संग्रहामध्ये समाविष्ट झाल्याने जी आम्हांला पहिल्यानेच वाचाव-यास मिळाली ती कॅप्टन लिमयांची कथा ही असामान्य कथा आहे याच्याबद्दल मात्र माझ्या मनामध्ये तिळमात्र शंका नाही. आश्चर्य असे की १९१२ ते १९२९ या साधारण १५-२० वर्षांमध्ये लिहिलेल्या या कथा आहेत! आणि त्या कथांचे एकंदर स्वरूप आपण जर बघितले तर, जाणिवेच्या दृष्टीने, तंत्राच्या दृष्टीने, प्रयोगशीलतेच्या दृष्टीने, त्या कथा ५० वर्षे पुढे जाणाऱ्या आहेत हे आपल्या लक्षात येते. ही जी एक स्वतःच्या काळाच्या पलीकडे जाण्याची ताकद आहे, ती ताकद त्या काळामध्ये इतर कथालेखकांमध्ये फारशी दिसत नसावी. दिसत नसेल, असे मला नक्की माहीत नाही, कारण तो तितका माझ्या वाचनाचा विषय नाही. परंतु लिमयांच्या कथा वाचून मी आश्चर्यचकित झालो, विस्मयचकित झालो, याबद्दल शंका नाही. ‘मेकॅनो’ नावाची कथा पाहून तर मला असे वाटते, की आजच्या एखाद्या प्रतिभाशाली लेखकाला देखील इतके स्त्री-मनाचे, सूक्ष्म आणि नाजुक असे चित्रण करता येणे कठीण आहे. किती कोमल आणि मधुर अशा प्रकारचे चित्रण आहे त्यात! या कथेमध्ये कथानकाचा भाग काहीही नाही. त्या स्त्रीने पूर्वीचे काहीतरी एक चित्र आपल्या डोळ्यासमोर उभे केले आणि एक गृहस्थ शेजारी आल्यावर तिच्या मनामध्ये ज्या काही एक भावना जागृत झाल्या, त्याचे चित्रण असलेली ही साधी गोष्ट आहे. केवळ अडीच-तीन पानांची. तीही मोठ्या टाईपात छापली म्हणून अडीच पाने. इतक्या त्या छोट्या कथेमध्ये त्या स्त्रीच्या मनाचे इतके भावसुंदर रूप प्रकट करून दाखविण्याचे कथाकाराचे विलक्षण सामर्थ्य आहे. ही कथा वाचल्यानंतर खरोखर मला स्वतःला असे वाटले की आपण काही तरी मराठीमधले अद्वितीय असे काही वाचत आहोत. त्यांतले वाक्य वाचून मला असे वाटते की हे वाक्य कदाचित आपण लिहिले असते! किंबहुना असे वाटते की, आपल्याला कधीही हे लिहिणे जमले नसते आणि हे आपल्याला कधीही सुचलेही नसते! स्वतःच्या भावना व्यक्त करताना ‘मी पाटीवरती उगाच चरे काढत बसले!’

हे वाक्य वाचल्यावर हे विलक्षण सामर्थ्यवान असं वाक्य आहे असे मला वाटले. पाटीवरती, स्लेट पाटीवरती तुम्ही दगडांनी चरे जर ओढले तर त्याचा आवाज, त्याची तुमच्या मनावरती होणारी काही विचित्र संवेदना हे सगळे जर आपण लक्षामध्ये आणले तर ह्या साध्या वाक्याने आपल्याला किती सांगितले गेले आहे हे लक्षात येते. अशा प्रकारच्या अनेक कथा त्यांनी लिहिल्या आहेत. अत्यंत सूक्ष्म अशा प्रकारचे विश्लेषण मनाचे आणि परिस्थितीचे, त्यांनी केले आहे. त्या काळातील साहित्याला सदाशिवपेठी साहित्य अशा प्रकारची एक पदवी कित्येकांनी दिली आहे हे आपल्याला माहीत आहे. ती देण्यामागे काही एक टिकेचा हेतू असावा, अवहेलनेचा हेतू असावा. अर्थात त्याच्यामध्ये काही गैर नाही. ज्याला सदाशिव पेठ माहीत आहे त्याने सदाशिव पेठेसंबंधीच लिहावे. त्यांनी उगाच शुक्रवार, नारायण अशासंबंधी लिहू नये. कारण हे लिहिल्याने उगीच अकारण भानगडी निर्माण करून ठेवतात. तेव्हा आपल्या अनुभवाचे क्षेत्र जेवढं आहे, त्या अनुभवाच्या क्षेत्रामागे केवळ कल्पनेनेच जर लेखक जाऊ लागला तर त्यातून चांगले वाङ्मय निर्माण होण्याची फारशी शक्यता नसते. हौस भागली एवढे होईल. शेवटी वाङ्मयाची खोली किती आहे, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे आणि त्याचा व्याप किती आहे, विस्तार किती आहे हा गौण मुद्दा आहे. वाङ्मयाला खोली पाहावयाची आहे हे जरी खरे असले तरी अशा विशिष्ट प्रकारच्या समाजाचे म्हणून ज्या वाङ्मयाचा उल्लेख करण्यात येतो, त्या समाजाच्या जीवनाच्या सर्व कडांना स्पर्श करण्याची ताकद त्या साहित्यामध्ये पाहिजे. हे जर भोवऱ्यासारखे एकाच ठिकाणी फिरत राहिले आणि खूप खोल आतमध्ये जावयास लागले तर ते त्या सर्व समाजाचे वाङ्मय ते खरोखर होऊ शकत नाही.

कोणी आपल्या बंगल्याच्या अंगणात, परसामध्ये एखादी खूप खोल जाणारी नळ-विहीर म्हणजे ट्यूब वेल खोदली, तर त्या बंगल्याची गरज ती भागवेल. परंतु गावासाठी नदी पाहिजे आणि देशासाठी समुद्र पाहिजे. या व्यापक गोष्टी त्या ठिकाणी हव्यात. त्यांच्याशिवाय गत्यंतर नाही. तेव्हा सर्व समाजाला जे आपले म्हणून म्हणता येईल, असे जे साहित्य आहे, त्याचा विस्तार हा जरूर असावयास पाहिजे आणि विस्तार ही गोष्ट आपण खोलीच्या बरोबरीने संमत करायला पाहिजे. त्या वाङ्मयाचं एक वैशिष्ट्य म्हणून, सामर्थ्य म्हणून त्या विस्ताराचे पहिले दर्शन जर कुठे मराठी साहित्यामध्ये होत असेल तर ते कॅप्टन लिमये यांच्या कथा-वाङ्मयामध्ये होते, याबद्दल मलाही शंका वाटत नाही. कारण नुसत्या स्थळांच्या दृष्टीने नव्हे तर व्यक्तीच्या दृष्टीने, स्वभावदर्शनाच्या दृष्टीने, मानसिक अवगाहनाच्या दृष्टीने, त्यांनी खूप व्यापक अशा प्रकारचे लेखन केलेले आहे. त्यांनी लढाईमध्ये आपल्या आयुष्याची अनेक वर्षे घालविली, हे त्याचे प्रमुख कारण होय. परंतु लढाईला पुष्कळ लोक जातात, आणि पुष्कळ लेखकही गेले आहेत. परंतु तेथल्या जीवनाचे ग्रहण करण्याची ताकद ही जी लिमयांच्या प्रतिभेमध्ये होती ती अन्यत्र आपल्याला दिसून

येत नाही. काही शिपायांची त्यांनी वर्णन केलेली मनःस्थिती अतिशय प्रभावी आहे. त्या समरांगणातल्या जीवनाचे आकलन लिमयांना झालेले आहे हे त्यावरून लक्षात येते.

आपल्याला पुष्कळदा असे वाटते की, युद्ध, लढाई, समरांगण वगैरे म्हटल्यावर तिथं वीररसाशिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टींचा संबंध येत नाही. ही अगदी भाबडी समजूत आहे. सतत २४ तास ते तेथे घोषणा करीत असतात आणि काही तरी वीर-रसात्मक असे त्या ठिकाणी घडत असते, असे अनेकांना वाटते. परंतु हे खोटे आहे. आणि हे खोटे आहे हे कोणाला कळते? तर प्रत्यक्ष रणांगणावर जी लिमयांसारखी माणसं जातात त्यांना. शहरामध्ये बसून, लढाईपासून दूर अशा आम्हा लोकांना मात्र वाटते की तिथे सर्व वीररसाचे माहेरघर उभे राहिलेले आहे. लिमयांचे तसे नाही. आणि म्हणून त्यांनी रंगविलेली ती चित्रे युद्धभूमीवरील माणसांच्या मनांचे विविध पैलू दर्शविणारी आहेत. नुसत्या वीररसाचा गौरव करणारी, जयजयकार करणारी अशी ती नाहीत. लढाई हा खरोखर एक प्रकारचा मॅग्नीफाईंग ग्लास आहे, बृहद्दर्शक भिंग आहे. त्याच्याखाली मनुष्य टाकला की, त्याच्यामधील ज्या काही भल्याबुऱ्या-उदार-पणाच्या-अनुदारपणाच्या, चांगुलपणाच्या-वाईटपणाच्या, स्वार्थाच्या, निःस्वार्थाच्या, ह्या सर्व वृत्तींचा त्या ठिकाणी गुणाकार झालेला दिसून येतो. आणि मनुष्य हा त्याच्या काही एका विलक्षण, आदिवासी अशा स्वरूपामध्ये त्या ठिकाणी प्रगट झालेला आपल्याला पाहावयास मिळतो. हे अशा प्रकारचे माणसाचे रूप कॅप्टन लिमयांनी पाहिले हे त्यांच्या प्रतिभेचे सर्वात मोठे सामर्थ्य आहे असं मला वाटते. हे आपल्याला त्या काळामध्येच नव्हे तर आजच्या काळातही कोणाच्या लेखनात पहावयास मिळत नाही.

मनोविश्लेषण, मनोगाहन वगैरे शब्द फारच अलीकडचे आहेत. लिमयांच्या काळामध्ये ही चलनी नाणी साहित्यामध्ये रूढ झालेली नव्हती. परंतु परिभाषेच्या अगोदर ज्ञान नेहमी येते. परिभाषा ही नंतर येते. त्याप्रमाणे लिमयांच्या साहित्यातील मनोविश्लेषणाचे अंग अतिशय प्रभावी रीत्या साकार झालेले आपल्याला दिसून येते. श्री. कोलारकरांनी सांगितल्याप्रमाणे तांत्रिक दृष्ट्याही त्यांनी अनेक प्रयोग केलेले आहेत. त्यांच्या कित्येक गोष्टींना शेवट नाहीत. कित्येक गोष्टींचे शेवट संदिग्ध ठेवलेले आहेत आणि एका गोष्टीचे तर अनेक शेवट त्यांनी दर्शविले आहेत. असे होऊ शकले असते, कदाचित असेही होऊ शकले असते अशा रीतीने. तेव्हा ही जी काही एक प्रयोग-शीलतेची वृत्ती आहे, ती अतिशय दुर्मिळ आहे, आणि म्हणून मला असे वाटते की, जनकत्वासंबंधीच्या कोलारकरांसारख्या संशोधकांनी, टीकाकारांनी किंवा आपल्यासारख्या विद्वानांनी त्यासंबंधी जो काही एक विचार करायचा तो करावा. परिचित विश्वाच्या पलीकडे ज्या काळाची नजर गेली नव्हती—एवढेच नव्हे तर आजच्या काळातही बऱ्याच प्रमाणात गेलेला नाही-त्या एका विशेष भावनांच्या प्रांतामध्ये आपले अनुभव ज्यांनी आमच्यापर्यंत आणून पोहोचविले असे लिमये हे श्रेष्ठ, असामान्य लेखक आहेत असे माझ्यासारख्या सामान्य वाचकालाही वाटते. तेव्हा मी अत्यंत नम्रपणाने या

भीष्माचार्यांना अभिवादन करतो. त्यांना यापुढच्या काळामध्ये दीर्घायुष्य मिळावे, आरोग्य मिळावे आणि वृद्धापकाळामध्ये काही स्वप्ने शिल्लक राहतात की नाही कोणास ठाऊक, परंतु जर काही त्यांची अशी जीवनस्वप्ने असली, त्यांच्या अंतःकरणाला प्रिय असे काही संकल्प असले तर ते सर्व पुरे होवोत अशी मी प्रार्थना करतो.

## साभार-स्वीकार

**गोमंतकीय लेखकांच्या मराठी ग्रंथांची सूची** – का. वा. केंकरे, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४; ५ रु.

**साहित्यातील अश्लील आणि ग्राम्य** – रा. शं. वाळिंबे, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे ३०; ८ रु.

**मुंबई आणि मुंबईकर** – गंगाधर गाडगीळ, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे ३०; ८ रु.

**लो. टिळकांचे पुण्यस्मरण** – ( कार्य व तत्त्वज्ञान ). शं. रा. दाते, काळ प्रकाशन, पुणे ३०; ५० पैसे

**जेव्हा माणूस जागा होतो** ( आत्मकथा ) – गोदावरी परुळेकर, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; १५ रु.

**गडकऱ्यांची संसारनाटके** – त्र्यं. वि. सरदेशमुख, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; १० रु.

**आदिभारत** ( प्राचीन भारतीय इतिहास ) ले. – श्री. अ. डांगे, अनुवाद रोझा देशपांडे, अपूर्व प्रकाशन, मुंबई १४; १६ रु.

**मायबाप** ( कथा ) – वामन इंगळे, साधना प्रकाशन, पुणे, ३०, ६ रु.

**दादासाहेब फाळके** ( चरित्र ) – इसाक मुजावर, साधना प्रकाशन पुणे, ३०, ६ रु.

**मुलांचा आदर्श संत डॉमनिक साविओचे चरित्र** – एलायस वी. रॉड्रिग्ज, मार्ग प्रकाशन, पुणे १४; १-२० पैसे

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर** ( जीवनदर्शन ) माणिकराव गायकवाड, बी आ. टी. चाळ नं. २, मुंबई ११; २ रु.

**राधामाधव** ( काव्य ) श्री. भि. वेलणकर, राजीवश्री प्रकाशन, ए. जी. स्ट्रीट मुंबई ४; ४ रु.

**मराठी आख्यान-कविता** ( एक अभ्यास ) गं. ब. ग्रामोपाध्ये, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४; २ रु.

**निर्धार** ( समरगीते ) रा. मा. दिवेकर, पो. भादवण ( कोल्हापूर ) १ रु.

अनुक्रमणिका

# झाशीवालीचे नाट्यावतार :
## १८७० आणि १९७० नाटक जन्मशताब्दि *

भीमराव कुलकर्णी

१०० वर्षांपूर्वी झाशीच्या राणीच्या जीवनावर एक महत्त्वाचे नाटक लिहिले गेले आहे. त्यानंतर बरोबर शंभर वर्षांनी कवि कुसुमाग्रजांनी याच विषयावर या वर्षी नाटक लिहिले आहे. हा योगायोग मोठा गमतीचा आहे. पहिल्या नाटकाच्या जन्म-शताब्दीचे हे वर्ष होय. त्या निमित्ताने या दोन्ही नाटकांबद्दल काही लिहिणे उद्बोधक ठरेल असे वाटते.

१८७० साली लिहिल्या गेलेल्या नाटकाचे नाव आगगाडीच्या डब्याप्रमाणे मोठे लांबलचक आहे आणि ते मराठीतल्या पहिल्या ऐतिहासिक नाटकाच्या धर्तीवर आहे. मराठीतले पहिले ऐतिहासिक नाटक म्हणजे १८६१ साली प्रसिद्ध झालेले विनायक जनार्दन कीर्तने यांचे **'नाटक, थोरले माधवराव पेशवे यांजवर'** हे होय. 'मराठे म्हणजे लुटारू, त्यांच्या दरबारात दाद ना फिर्याद, सर्व वुचाडून घेऊन अलख गोसावी म्हणून परत पाठविण्यास चिंता नाही.' ही तत्कालीन समजूत अंतर्यामी बोचत असल्याने, थोरल्या माधवरावांच्या न्यायनिष्ठुरतेचे, प्रजाहितदक्षतेचे, विनम्र परंतु ताठ बाण्याचे आणि रामशास्त्र्यांच्या निःस्पृहतेचे चित्र रंगवून 'स्वसत्तेच्या छायेस देखील न ओळखणाऱ्या' मराठी दरबाराचे चित्र रंगविण्यासाठी वयाच्या विसाव्या वर्षी कीर्तन्यांनी हे नाटक लिहिले, आणि ज्ञानप्रसारकसभेपुढे त्यांनी ते मोठ्या तडफेने वाचून दाखविले.¹

---

* १८७० साली दोन महत्त्वाची ऐतिहासिक नाटके मराठीत लिहिली गेली आहेत. दुसऱ्या नाटकाचा परिचय यथावकाश करून देण्यात येईल.

१. 'ते ऐकून सर्व सभेस फार आनंद झाला. इतकेच नाही, तर रा. रा. डाक्तर भाऊ दाजी, व रा. सा. महादेव गोविंद शास्त्री इत्यादी विद्वान व थोर ग्रहस्थांच्या स्तुतीसही ते पात्र झाले, असे पाहून याचे लहानसे पुस्तक छापून प्रसिद्ध करावे' अशी →

१८६१ साली तरुण कीर्तन्यांनी अशा तऱ्हेचे नाटक लिहिण्यास प्रवृत्त व्हावे याला फार मोठा अर्थ होता. त्यांच्याच बरोबरीने शिक्षणासाठी कोल्हापूरहून मुंबईस आलेले त्यांचे समवयस्क व समानधर्मी मित्र, माधव गोविंद रानडे व विठ्ठलराव पाठक ( हे पुढे सातारा हायस्कूलचे हेडमास्तर होते ) यांनी याच सुमारास मराठ्यांच्या इतिहासावर तारुण्यसुलभ उत्साहाने 'कडक लेख लिहून ' आपल्या शिष्यवृत्त्या गमावल्या होत्या. विष्णु मोरेश्वर महाजनी यांनी लिहिल्याप्रमाणे,[१] ' ही मंडळी मराठ्यांच्या इतिहासाच्या रसात डुलत होती व नवीन वारे ( १८५७ चे ) त्यांच्या ठिकाणी खेळत होते. ' १८५७ नंतरच्या दहशतीच्या आणि निर्नायकी अवस्थेत तत्कालीन स्वाभिमानी तरुणांचा पहिला उद्रेक म्हणून कीर्तन्यांच्या पहिल्या नाटकाचे महत्त्व विशेष आहे.[२]

केवळ कालसापेक्ष दृष्टीनेच नव्हे तर एकंदर मराठी नाटकांच्या इतिहासात कीर्तन्यांचे हे नाटक अनेक दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यातील माधवराव, रमाबाई, रामशास्त्री व राघोबा यांची व्यक्तिचित्रणे तत्कालीन मराठी वाङ्मयात अतिशय दुर्मिळ वाटावीत अशा प्रकारची आहेत. नाटककाराने नाटकाला कौटुंबिक जिव्हाळ्याची पार्श्वभूमी देऊन मोठी हृद्यता निर्माण केली आहे. तत्कालीन पौराणिक नाट्यलेखनपद्धतीला पूर्णपणे फाटा दिला आहे आणि शेक्सपियरच्या तंत्राचे अनुकरण करून निवडक प्रसंगांची नाट्यानुकूल मांडणी केली आहे. आणि, बुकीश व पौराणिक नाटकांची परंपरा धुडकावून देऊन मोठ्या आत्मविश्वासाने नाटकाचा शेवट शोकपर्यवसायी केला आहे.

मराठीतले पहिलेच ऐतिहासिक नाटक, ते लिहिले गेले त्या कालखंडाच्या किती तरी पुढच्या कालखंडातील नाट्यलेखनाचा प्रत्यय देणारे आहे. खाडिलकरांनी १८९५ साली लिहिलेल्या ' सवाई माधवरावाचा मृत्यू ' या नाटकाच्या ते जवळपास ठेविता येईल.[३] त्यानंतर मराठीतले दुसरे ऐतिहासिक नाटक लिहिले गेले ते १८८० साली. म्हणजे १८५७ चे वारे अंगी खेळत असल्यामुळे पहिले नाटक लिहिले गेले तर त्या-

→बहुतेक सभासदांनी व कित्येक सद्गृहस्थांनी इच्छा व्यक्त केल्याचे पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत नमूद करण्यात आले आहे.

१. विविधज्ञानविस्तार, १९०४.

२. हा उद्रेक पुढे थंड झाला. त्यानंतर कीर्तन्यांनी दुसरे ' जयपाळ ' नावाचे नाटक लिहिले ते बायबलमधील कथानक घेऊन. नंतर ते पुढे संस्थानी राजकारणात अडकले ते शेवटपर्यंत. न्या. रानडे यांची तरुणपणची ' मराठी बाण्याचा कडक लेख ' लिहिण्याची वृत्ती पुढे राहिली नाही आणि इतिहाससंशोधक म्हणून पाठकांनी पुढे कसला व्यासंग केला नाही.

३. मौज अशी की १८९४ साली मार्तंड नारायण दवणे यांनी, ' संगीत श्री थोरले माधवराव पेशवे यांचे ( ५ अंकी ) नाटक ' लिहिले ते कीर्तने यांच्या नाटकाचे सहीसही अनुकरण करून. त्यात किर्लोस्करांच्या धर्तीवर पदे टाकून त्याला ' संगीत ' बनविले इतकेच.

नंतर नऊ वर्षांनी १८५७ वरच दुसरे ऐतिहासिक नाटक लिहिले गेले. '**नुतनेतिहासांतर्गत मनोल्हादक झाशाख्य पुराधीश्वरी लक्ष्मीबाई इचे नाटक**' हे त्याचे लांबलचक नाव. या नाटकाचे लेखकही, विश्वनाथ मोरेश्वर शास्त्री नाशीककर,[४] नारायण गोपाळ दामले, व विनायक हरी शिनकर असे एकूण तीन आहेत. या तीन लेखकांनी, कोणी कोणता भाग लिहिला हे प्रस्तावनेत उल्लेख नसल्यामुळे काही कळावयास मार्ग नाही. मात्र नाटकाच्या अंतरंगात बारकाईने पाहिले तर, या तिघांपैकी प्रत्येकाचे म्हणून काही निराळे वैशिष्ट्य आहे, हे चांगल्या रीतीने दिसून येते. कारण या नाटकात, 'योग्य प्रसंगी संस्कृत, प्राकृत, हिंदुस्थानी आणि गुजराती या भाषांचा उपयोग केला आहे.' आणि खास संस्कृत संवाद–श्लोक आणि आर्यावृत्तांत काही मराठी पदे लिहिणारा त्यांपैकी कोणी एक दिसतो, तर तत्कालीन इंदूरझाशीसारख्या मध्यप्रांतीय हिंदुस्थानीत संवाद लिहिणारा आणि निरनिराळ्या रूढ पदांच्या चालींवर हिन्दुस्थानीत पदरचना करणारा दुसरा कोणी दिसतो. तर तिसरा मराठी संवाद, पदे आणि विनोदनिर्मितीसाठी नाटकाचा शेवटचा भाग लिहिणारा कोणी दिसतो. अशी विभागणी करून त्यांनी नाटक लिहिले आहे, असे मला म्हणायचे नाही. परंतु नाटक वाचताना मनाचा जो कल होतो, त्याकडे मुद्दाम मला अंगुलीनिर्देश करावयाचा आहे.

हे नाटक चेंबर्सच्या 'इंडियन रिव्होल्टस' नामे इतिहासाच्या आधाराने रचिले आहे, असे लेखकत्रयींनी अगोदरच सांगितले आहे. त्याचबरोबर अनेक मित्रांनी अशा तऱ्हेची ऐतिहासिक कृती तयार करण्याची बरेच दिवस निकड लाविली होती, आणि त्यामुळे आपण हे नाटक लिहिले असल्याचे त्यांनी सांगितले आहे. 'जितकीं इतिहासात पात्रें सांपडलीं तितकी काईम ठेऊन बाकीचीं मनःकल्पित घातलीं आहेत.' असा खुलासाही केला आहे.

चेंबर्सच्या इतिहासाच्या पुस्तकावर सारी भिस्त ठेविल्याने नाटकाच्या साऱ्या आशयावर इंग्रज–इतिहासकारांच्या दृष्टिकोणाचा प्रभाव स्पष्ट दिसून येतो. त्यामुळे इंग्रजांनी न्यायान्यायाने जी राज्यपद्धती चालविली होती तीमध्ये स्वदेशाभिमानाने आडकाठी निर्माण करण्याचा ज्यांनी प्रयत्न केला, त्या साऱ्यांना अविचारांती अपयश कसे आले हे या नाटकातून दाखविण्यात आले आहे. मात्र ५७ चे बंड स्वदेशाभिमानातून निर्माण झाले आहे, हे नाटकात मुख्यत्वेकरून दाखविले नाही. सूत्रधार–विदूषकाच्या प्रवेशात सुरवातीला स्वदेशाभिमानाचा उल्लेखच काय तो आहे! विश्वासघाताने आपल्या कैदेतील इंग्रज बायकांमुलांची निर्घृणपणे हत्या करणारी आणि स्वतःच्या परस्वाधीन अवस्थेमुळे बंड करण्यास प्रवृत्त होऊन या शौर्यहीन देशात पुरुषांनाही लाजविणारी अशी झाशीची राणी या नाटकात दाखविली आहे आणि त्याचबरोबर सर ह्यू रोज आणि त्याचे सहकारी यांच्या युद्धकौशल्याचे व चिकाटीचेही चित्र रेखाटले आहे.

---

४. वि. वा. शिरवाडकर (कवि कुसुमाग्रज) हेही नाशिकचेच!

कीर्तन्यांच्या वर उल्लेखिलेल्या नाटकात नांदी नाममात्र म्हणजे केवळ एक गद्य वाक्य आहे. बाकी इष्ट देवताआवाहन व वंदन, नटी-सूत्रधार किंवा सूत्रधार–विदूषक प्रवेश व शेवटी भरतवाक्य इत्यादी साऱ्या तत्कालीन नाट्यलेखनातील संकेतांना फाटा दिला आहे. परंतु या दुसऱ्या नाटकात मात्र हे सारे संकेत अगदी कसोशीने पाळण्यात आले आहेत. नाटककारत्रयींपैकी शास्त्रीबुवांची या बाबतीत चांगलीच करडी नजर असावी असे वाटते. कारण या नाटकातील सूत्रधार गणेशाला वंदन करतो ते संस्कृतातून आणि गणेश प्रकट होऊन दोघांचा बराच मोठा संवाद होतो तोही संस्कृतातूनच. मात्र सूत्रधार सरस्वतीला आवाहन करतो ते मात्र प्राकृतात ( मराठीत ) आणि दोघेही कटाक्षाने मराठीच बोलतात ! पुढे नाना तऱ्हेच्या युद्धप्रसंगांचे निवेदन करताना सूत्रधाराच्या तोंडी अनेक ठिकाणी संस्कृत श्लोकांचा वापर केला आहे. त्याच्या तोंडच्या ह्या श्लोकांची रचना गीतेच्या पहिल्या अध्यायातील युद्धतयारीच्या वर्णनाच्या धाटणीवर आहे, आणि प्रत्यक्ष युद्धाचे वर्णन करताना त्याच्या तोंडी ज्या आर्या वापरण्यात आल्या आहेत त्यांच्या रचनेवर मोरोपंतांच्या कर्णार्जुनयुद्धाची झाक आहे ( नव्हे, मोरोपंती शब्दरचनाच येथे उपयोजिली गेली आहे. )

मात्र सूत्रधार–विदूषक प्रवेश हे पारंपारिक पद्धतीने आणि रसहीन-आंधळेपणाने वापरण्यात आले नाहीत. त्यांचा कल्पकतेने उपयोग करून घेतल्याने नाट्यवस्तूची परिणामकारकता अनेक पटींनी वाढली आहे. यातला विदूषक सुरुवातीला शब्दांची ओढाताण करून शाब्दिक कोट्यांनी आणि काहीतरी वेडेवाकडे बोलून हास्यनिर्मिती करणारा असाच वाटतो आणि आहेही. तो झोपाळू, भित्रा व आळशी आहे, परंतु त्याची पारंपरिकता एवढ्यापुरतीच मर्यादित आहे. काहीतरी वेडेवाकडे बोलून क्षणभर हसविणारा आणि लगेच काहीएक खोचक प्रश्न विचारून तो वाचकांना एकदम अंतर्मुख करतो आणि पेचात पाडतो. इंग्रजी नाटकातील जेस्टरप्रमाणे तो अधूनमधून मूळ प्रश्नाला नेमका हात घालतो. हे त्याचे विनोदामागे दडलेले रांगडे शहाणपण या नाटकाला उपकारक ठरले आहे. सुरुवातीच्या प्रवेशांतून तो राणी आणि वंडवाले यांची थट्टा करीत असल्यासारखा वाटतो. पण ही थट्टा वरपांगी असते. पंधराव्या प्रवेशात राणी धारातीर्थी पडल्याचे सूत्रधार सांगतो, तेव्हा विदूषक म्हणतो :

> " काय तुम्ही जिकडे तिकडे उदास करून सोडिलेंत. दिव्यांना देखील काळीमा आली. आता म्हणजे कांहीं ऐकावें अशी आशा राहिली नाहीं. ती भिकारी मेली, माझी बायेको मरत पडली आहे, एक मुलगा भुईवर टाकिला आहे, आणि दुसरा मुलगा मेलों तर काय होईल म्हणून रोज विचारितो. बरं बाप जवरा मसणा घरांत जीव गेलेला आहे तो रोज मी कां मेलों म्हणून भांडत असतो. अशा चोहोंकडून अडचणी; इकडे आलों:तों इतका वेळ बरेंच चाललें, परंतु आतां अगदी बेचैनी झाली आहे. "

१८५७ च्या बंडानंतरच्या हिंदुस्थानच्या किंकर्तव्यमूढतेवरचे हे एक अतिशय बोलके असे भाष्य आहे ! सूत्रधार-विदुषकांच्या संवादांतून असा परिणाम साधला गेलेले हे मराठीतले नाटक लक्षात राहील अशा प्रकारचे आहे. विदूषक-सूत्रधारांचा हा उपयोग अभिनव आहे असेच म्हटले पाहिजे. आणखी मुद्दाम लक्षात घेण्यासारख्या या नाटकात दोन महत्त्वाच्या गोष्टी आहेत.

पहिली म्हणजे, या नाटकात अंक नाहीत. सलग एकामागून एक असे एकूण २४ प्रवेश आहेत. आणि काही प्रवेशांमध्ये झाशीमधे झालेला बंडाचा प्रादुर्भाव, राणीचे नेतृत्व आणि इंग्रजांनी राणीवर केलेली चढाई यांची सुसंगत हकीकत सांगण्यात आली आहे. प्रत्येक प्रवेशाच्या शेवटी सूत्रधार–विदूषक येतात आणि झालेल्या घटनेची चर्चा करतात. प्रत्यक्ष लढायांची दृश्ये प्रवेशरूपाने न दाखविता त्यांची वर्णने सूत्रधार–विदूषक यांच्या संपूर्ण प्रवेशांनी साकार करण्यात आली आहेत. ह्या विदूषक-सूत्रधारांच्या सतत प्रत्येक प्रवेशात येण्याने सत्तावनच्या घटनांतील सारी गुंतागुंत उलगडली जाते आणि सत्तावनची सारी बैठक सुस्पष्ट होते.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, या नाटकातील १६ ते २४ ह्या नऊ प्रवेशांचे कार्य. त्यापूर्वीचा पंधरावा प्रवेश सगळ्यांत मोठा म्हणजे छापील २२ पृष्ठांचा आहे आणि या प्रवेशामधे ग्वाल्हेरीस झालेल्या लढाईचे संपूर्ण वर्णन आहे. साराच्या सारा प्रवेश सूत्रधार-विदूषक यांच्या संवादरूपाने आहे. राणीचे एकीचे आणि शिस्तीचे प्रयत्न, तिचा आवेश यांच्या पार्श्वभूमीवर एकीकडे इतर फौजेची व रावसाहेबादिकांची नादानी आणि दुसरीकडे उन्हाळ्याने त्रस्त झालेला परंतु अत्यंत कर्तव्यदक्ष असा ह्यू रोज आणि त्याने केलेली तयारी ( कोल्ह्याची शिकार असली तर वाघाची तयारी पाहिजे म्हणजे बेत फसत नाही या शब्दांत मार्मिकतेने इंग्रज राजनीतीचे वर्णन केले आहे. ) यांची विस्ताराने कल्पना दिली आहे. नानातऱ्हेच्या ' शस्त्रांसहित घोड्यावर स्वार बनून सैन्यामध्ये विजेप्रमाणे चमकणारी राणी, ज्यांनी तिला प्रत्यक्ष लढताना पाहिले त्यांनी तिला अष्टभुजा देवीची उपमा दिली, ती शेवटी मानवी अबला असल्यामुळे पतन पावली, ' इथे नाटक संपायला हवे होते. विशेषतः वर निर्देशिलेले विदूषकाचे भाषण नेमके या ठिकाणी येते. त्या भाषणानंतर हे नाटक संपले असते ( पृ. ९१ ) तर मोठे औचित्यपूर्ण ठरले असते. परंतु नाटक शोकांत ठरले असते. शास्त्रीबुवांना ते मंजूर नसावे. राणीच्या मृत्यूनंतर १५ व्या प्रवेशाची आणखी आठ पृष्ठे खर्चून नाटककारांनी, बंडवाल्यांचा झालेला पाडाव आणि शिंद्यांची ग्वाल्हेरीस झालेली स्थापना यांचे वर्णन केले आहे. शिंद्यांचे राज्य शिंद्यांना परत मिळाले, न्यायी व पराक्रमी इंग्रजांचा जय झाला, असा ' गोड शेवट ' होऊन नाटक संपायला काय हरकत होती ? तसेही होत नाही. त्यानंतर तब्बल नऊ प्रवेश ( छापील ३२ पृष्ठे ) लिहिण्यात आले आहेत आणि त्यांचा ' झाशाख्य पुराधीश्वरी लक्ष्मीबाई 'शी सुतराम संबंध नाही. हे सारे नऊ प्रवेश म्हणजे एक गमतीचे असे स्वतंत्र उपनाटक आहे. नाटकाच्या नामकरणामध्ये ' मनोल्हादक '

हे विशेषण वापरण्यात आले आहे. राणीचे कथानक तर विषाद उत्पन्न करणारे आहे! मग ' मनोल्हादक ' हे विशेषण कशासाठी ? या विशेषणाची योजना या पुढच्या प्रवेशासाठी मुद्दाम झाली आहे, हे स्पष्ट आहे.

हे पुढचे नऊ प्रवेश मी पहिल्यांदा वाचले तेव्हा मला त्यांचे प्रयोजन काय हे नीट कळेना. मग नंतर लक्षात आले की, मूळ नाटकाशी बादरायणसंबंधाने जोडलेला हा एक मनोरंजक फार्स आहे.* ह्या फार्समध्ये ग्वाल्हेरमधील चंद्रसेना नायकीणीची एक गमतीची हकीकत दिली आहे. राणीचा पाडाव झाल्यानंतरच्या ग्वाल्हेरीतील इष्कबाजीचे आणि अंदाधुंदीचे आकर्षक चित्र यात रेखाटण्यात आले आहे. चंद्रसेना नायकीणीच्या मैफलीला महाराष्ट्रातील काही मराठी मंडळी हजर राहतात. तिच्या रागदारीच्या ' हा हू ' संगीताला कंटाळतात. त्याला लावणीची व तमाशाची सर नाही म्हणून नाके मुरडतात. त्यातील सावकाराचे सोंग घेतलेला विनायकराव[1] वाटोळे भरपूर बिदागी देऊन आणि ५७ च्या लुटीत पळविलेला हजार रुपयांचा शालू तिच्या अंगावर फेकून मैफल काबीज करतो आणि रात्री तिच्याकडेच मुक्कामास राहतो.

---

*श्री. ना. बनहट्टी, **मराठी रंगभूमीचा इतिहास खंड पहिला** या ग्रंथात ' झाशीच्या राणीची लढाई ' या नावाच्या फार्सचा उल्लेख केला आहे. ( पृ. २४४, २८३, ४२३ ). परंतु मूळ ऐतिहासिक नाटकास शेवटी फार्स जोडण्यात आला आहे, हे या ठिकाणी लक्षात घ्यावयास हवे. नाटकाचे पुस्तक मूळ प्रा. बनहट्टी यांनी पाहिलेले दिसत नाही. नाटकाच्या १७ व्या प्रवेशापासूनच्या भागास ' नकल ' असे जाड ठशात निराळे नाव दिले आहे. नकल म्हणजे फार्स. मराठीतील पहिला फार्स अमरचंद वाडीकर मंडळीने १९ जानेवारी १८५६ रोजी सादर केल्याची साधार माहिती प्रा. बनहट्टी यांनी सादर केली आहे. परंतु लिखित स्वरूपातला उपलब्ध फार्स १८८३ नंतर सापडतो, अशी बहुतेकांची समजूत दिसते. आता झाशीच्या राणीच्या नाटकास लावलेला १८७० चा फार्स हा मराठीतला पहिला उपलब्ध मुद्रित फार्स होय, असे सध्यातरी निःसंदिग्धपणाने म्हणावयास हरकत नाही.

१. हा वाटोळे नायकीणीशी बोलताना मुद्दाम जी धेडगुजरी हिंदुस्थानी बोलतो ती पाहिल्यावर, आजच्या दूधवाल्या भैय्याशी हिंदी बोलणाऱ्या मराठी गृहिणीचे पु. ल. देशपांडे यांनी केलेले विडंबन आठवते. उदा. तो म्हणतो,

' नहीं नहीं. पण मी किदर गेलो है. लोकक्‌ू समजे नहीं, कि मी तुमच्या घरात रह्या; वास्ते ऐसें किया. '

' वेपार ! काय विचारता ! वास्ते तो ए बात केली ना, अब्रूकू फार भिना चाहिये. मेरे मनमे रहने का था, वो मेरेकूं माहीत अथवा तुमकू खबर; लोकांना कायकू बताना. पु. ल. देशपांड्यांची परंपरा शोधताना आता कमीतकमी शंभर वर्षे मागे जाता येते.

पहाटेस लवकर उठून विनायकराव तिच्याकडचे सारे दागिने पळवून नेतो. दुसऱ्या दिवशी ब्राह्मणाचे सोंग घेऊन फौजदाराकडे जाऊन लुटीतला माल तिच्याकडे असल्याचे सांगतो. फौजदाराला त्या नायकीणीकडे जाण्यास काही निमित्त हवे असते. तिच्याकडे लुटीची शाल मिळताच, नाईकीणीशी त्याचे चांगले सूत जमते आणि त्याच्या रात्री रंगू लागतात.

या ग्वाल्हेरी मामल्याचे फार्सद्वारा चित्र रंगविल्यानंतर नाटकाच्या शेवटी भरत–वाक्य येते ( त्यास ' भूपाळी ' हे नाव दिले आहे ). हे भरतवाक्य मोठे सूचक आहे. या शेवटच्या पदामध्ये, राणीच्या कर्तृत्वावर भाष्य केले आहे. प्रजावत्सल, कर्तबगार आणि धर्मनिष्ठ अशा अबलेने रणांगणी साऱ्यांना कुंठित केल्यावर, इंग्रजासारख्या बलाढ्य शत्रूने अन्यायाने त्या रणरागिणीचे निर्दाळण केले पण पुरुषांनीही खाली माना घालाव्या असा पराक्रम करून ती अमर झाली असे मोठे कृतकृत्यतेचे उद्गार काढले आहेत. राणीचे राज्य आम्ही खालसा केले परंतु आपल्या पराक्रमाने साऱ्या भारतवर्षात ती ' राणी ' म्हणून चिरंजीव झाली, अशा अर्थाचे उद्‌गार सेनापती ह्यू रोज याने काढले होते. तोच भाव या नाटकात शेवटी व्यक्त झाला आहे. आपल्या मरणाने कृतार्थ झालेले हे उदात्त चित्र, या अर्थाने ' शोकपर्यवसायी ' नाही, असेच नाटककारांनी अभावितपणे सुचविले असावे काय ?

१९७० साली कवि कुसुमाग्रजांसारख्या प्रतिभाशाली नाटककाराच्या हातून ' वीज म्हणाली धरतीला ' ही नाट्यकृती निर्माण झाली आहे. ही कृती निर्माण करताना पारसनिसांचे लक्ष्मीबाईचे चरित्र आणि सुप्रसिद्ध हिंदी लेखक वृंदावनलाल वर्मा यांनी लिहिलेली चरित्रपर कादंबरी यांचा कुसुमाग्रजांनी प्रामुख्याने उल्लेख केला आहे. या नाटकाचा विचार करण्यापूर्वी ह्या दोन्ही पुस्तकांची पार्श्वभूमी थोडक्यात अगोदर नीट समजाऊन घेतली पाहिजे.

१८९० सालच्या वसंत व्याख्यानमालेत पंडित वसंतराव यांचे ' वायव्येकडील प्रांत व अयोध्येकडील प्रांत येथील तीस वर्षांच्या मागील हकीकत ' या नावाचे अतिशय आकर्षक असे व्याख्यान झाले. कादंबरीच्या धर्तीवर त्यांनी तिखटमीठ लावून झाशीच्या राणीसंबंधी जी हकीकत सांगितली, त्याचे वृत्त केसरीत प्रसिद्ध झाले. ते कर्मधर्मसंयोगाने राणीचे दत्तकपुत्र दामोदरराव यांच्या नजरेस पडले व त्यांनी त्याबद्दल केसरीत एक पत्र लिहिले. दामोदरराव यांच्या या पत्रामुळे कुतूहल जागे होऊन प्रसिद्ध इतिहाससंशोधक द. ब. पारसनीस यांनी लो. टिळकांच्या प्रेरणेने दामोदरराव यांजकडून बरीच माहिती मिळवून १८९४ साली सुमारे ४०० पृष्ठांचे विस्तृत चरित्र प्रसिद्ध केले. राणीचे पती गंगाधरराव व यांची स्त्रैणता आणि राणीने क्रूरतेने इंग्रजस्त्रीपुरुषांची सूड म्हणून केलेली कत्तल या रूढ समजुतींचा परिहार करण्याची पराकाष्ठा या चरित्रात करण्यात आली आहे. त्यासाठी दामोदररावांनी पुरवलेल्या माहितीचा त्यांनी प्रामुख्याने उपयोग

केला आहे.* परंतु या गोष्टींमध्ये त्यांना फारसे यश आले नाही. कारण त्यांचे सारे पुरावे एकतर्फी आहेत. पारसनिसांनी हे चरित्र सजविताना गोडसेभटर्जींच्या अप्रसिद्ध प्रवासवृत्ताचाही भरपूर उपयोग करून घेतला होता. परंतु गोडसेभटर्जींनीच गंगाधररावांच्या स्त्रैणतेचे मोठे बोलके चित्र उभे केले आहे, ही गोष्ट मात्र हेतुपुरःसर त्यांनी उघडकीला आणली नव्हती. ** इंग्रजांनीच आपल्या स्त्रीमुलांची कत्तल करून राणीला बदनाम केले, हा त्यांचा युक्तिवाद तर मोठा हास्यास्पद होता. पारसनिसांच्या या चरित्रावर लिहिताना लो. टिळकांनी देखील, 'मधूनमधून कादंबरीच्या धर्तीवर रस-भरित वर्णने घालण्याचा ग्रंथकाराने प्रयत्न केलेला दिसतो, व ती कितपत साधार आहेत हे कळत नसल्यामुळे केवळ ऐतिहासिक चरित्र या नात्याने पुस्तकाची किंमत कमी वाटण्याचा संभव आहे, असा स्पष्ट इशारा दिला आहे.S राणीच्या बाजूने पारसनिसांनी जे चित्र रंगविले आहे ते ' फाजील तरफदारी ' चे आहे, असेही म्हटले आहे. पारसनिसांच्या या चरित्राचा निष्कर्ष, ' झाशीची राणी कोणी महत्त्वाकांक्षी बंडखोर कृत्या नसून कपटपटू डलहौसीच्या अपहारबुद्धीने सर्वस्वी नाडलेली व अतिशय जुलमामुळे बेफाम होऊन गेलेली ' गरीब गाय ' होती असे त्यांनी मोठ्या खुबीने दाखविले आहे. ' या शब्दांत त्यांनी मोठ्या सूक्ष्मतेने मांडला आहे. ' स्त्रीस्वभावाच्या साहजिक कोतेपणामुळे कोणाच्या तरी नादी लागून ती पुढे बंडवाल्यात अग्रगण्य झाली, हे आपणास कबूल केले पाहिजे.' हे याबाबतीतले परखड मत त्यांनी स्पष्टपणे सांगितले आहे. लो. टिळकांचे हेच मत महाराष्ट्रातील विद्वानांमध्ये पक्के रूढ झालेले दिसते.

---

* १८९५ साली एका अनामिकाने आणखी एक छोटे चरित्र प्रसिद्ध केले आहे. त्यातला आशयही पारसनिसांप्रमाणेच आहे. त्याने हे चरित्र दामोदररावांना अर्पण केले आहे. हेही चरित्र दामोदररावांच्याच प्रेरणेने लिहिलेले असावे. ह्या चरित्राची फारशी दखल घेतली गेली नाही असे दिसते.

** गंगाधरबाबा हा लौकिकात आठ प्रकाराचे षंढ आहेत, त्याप्रमाणे हा राजा षंढ आहे. गंगाधरबाबाचे आचरण असे होते की, आपले वाड्यात मार्ड.वर दोहो-चोहो रोजी पुरुष वेष टाकून स्त्रीचा वेष घ्यावा. पैठणी नेसून जरीकाठी चोळी अंगात घालीत असे...वगैरे. स्त्रियांचे सर्व अलंकार जडावाचेसुद्धा घालून स्त्रियांबरोबर बोलणी वगैरे करीत असे. अशा कारणावरून गरीब लोक असा वर पाहून देणे त्यापेक्षा मुलीस पाण्यात लोटणे चांगले असे बोलत. काही लोक असे म्हणत की, आठ प्रकार षंढात आहेत त्याप्रमाणे हा असावा...सचेतन पुरुषाचे शिश्न हातात धरून खेळ केला म्हणजे त्या षंढास चेतना व्हावी हा एक प्रकार त्यातच आहे. हा प्रकार या राजास असावा. (**माझा प्रवास**-संपा. द. वा. पोतदार, पुणे १९६६, पृ-३३-३४)

S. **केसरी**, ७ मे १८९५

विविधज्ञानविस्तारामध्ये पारसनिसांच्या चरित्रग्रंथांचे अत्यंत भेदक असे परीक्षण राजारामशास्त्री भागवत यांनी केले आहे. मराठ्यांच्या इतिहासातील कर्त्या पुरुषांच्या कार्याचे विवेचन करून त्यांचे त्यांनी वर्गीकरण केले आहे. त्यांतला शिवाजी हा पहिल्या वर्गांतला तर झाशीची राणी ही आठव्या वर्गांतली. 'कारण तिचा लढा स्वराज्यसंस्थापनेसाठी किंवा धर्मरक्षणासाठी नव्हता तर केवळ स्वार्थ साधण्याचा किंवा सूड घेण्यासाठी होता. माणसांची योग्य पारख नसल्यामुळे, राज्यकारभाराच्या अनभिज्ञतेमुळे आणि अवसानघातकी लष्कर भरतीमुळे राणीचा पाडाव झाला आणि हे सारे स्पष्ट' असताना विनाकारण फुगवून लिहिणारी पारसनिसांची लेखणी 'वाग्जाली' असल्याचा त्यांनी निर्वाळा दिला आहे. अशाच प्रकारचा अभिप्राय न. चिं. केळकरांनीही व्यक्त केला आहे १९१६ साली लक्ष्मीबाई पुण्यतिथीसंबंधाने बोलताना केळकरांनी मुद्दाम कटुता स्वीकारून म्हटले की, 'ज्या राजकीय दृष्टीने बंडाला बंड म्हणतो त्या दृष्टीने लक्ष्मीबाईसाहेबांनी बंड केले नव्हते. इंग्रज सरकारला येथून घालवून द्यावे, असा त्यांचा हेतू नव्हता, तर त्यांची सरकारविरुद्ध तक्रार होती...ही एवढी हकीकत सांगण्याचे कारण काही सुज्ञ माणसांना अजूनही याबाबतीत शंका येते. म्हणून हा वृतांत सांगितला.'[1]

या पार्श्वभूमीवर वृन्दावनलाल वर्मा यांच्या हिंदी कादंबरीबद्दल विचार केला तर, असे म्हणता येईल की, ही मुळातून कादंबरी आहे. आणि ती लेखकाने, 'अपरिहार्य परिस्थितीतून राणीचे शौर्य जन्मास आले' हे पारसनिसांचे मत टाकून देऊन, 'स्वराज्य स्थापनेसाठी राणीसाहेब लढल्या' असा मनाचा ग्रह करून घेऊनच लिहिली आहे. त्यासाठी त्यांनी जे संशोधन केले ते अस्सल कागदपत्रांधारे नसून लोकांच्या सांगोवांगीवरूनच.

कुसुमाग्रजांनी आपल्या नाटकासाठी या दोन्ही पुस्तकांचा उपयोग केला असला तरी, राणीचे चित्र उभे करताना त्यांनी केवळ ऐतिहासिक दृष्टीने न पाहता कलावंताच्या दृष्टीने पाहिले आहे, असे दिसून येते. इतिहासातील तपशिलातून ऐतिहासिक व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाचे कलात्मक दर्शन घडविणे हे प्रतिभावंताचे महत्त्वाचे कार्य असते. अशा रीतीने 'नव सर्जन' कुसुमाग्रजांनी घडविले आहे. परंतु ते घडवीत असताना एक ऐतिहासिक कलाकृती म्हणून कुसुमाग्रजांच्या या कृतीच्या अनेकविध मर्यादा एकदम स्पष्ट झाल्या आहेत.

१८५७ ची जी आग अगोदरच निर्माण झाली होती, तिच्यात परिस्थितीवश राणी सामील झाली, असेच कुसुमाग्रजांनी दाखविले आहे. परंतु राणीमुळे त्या 'आगी'ला

---

* "लक्ष्मीबाई झांशीकरीण", पुस्तक २७, अंक ३, ४, ५, ६, मार्च-एप्रिल-मे–जून १८९५.

१. समग्र केळकर वाङ्मय, इतिहास खंड, पृ. ९२६–२७.

नवा अर्थ कसा प्राप्त झाला, हे दाखवित असताना कुसुमाग्रजांच्या प्रतिभेने राणीकडे केवळ 'एक पराक्रमाची, तेजाची पुतळी' या सांकेतिक अर्थाने पाहिले नाही. तर तिच्या रूपाने, कुठल्या तरी अगम्य आंतरिक ओढीने या यज्ञात उडी घेणाऱ्या स्त्रीच्या संवेदनांचे धागेदोरे उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. सत्तावनमधील लक्ष्मीबाई हे असे एकच व्यक्तिमत्त्व होते की, ते इतरांच्याहून निराळे, खूप उंच होते, हे कुसुमाग्रजांच्या प्रतिभेला दिसले होते, परंतु हे तेज तिच्या एकटीच्या रूपाने प्रकटले नसून अनेकांच्या आंतरिक आगीचे ते प्रतीक होते आणि ही आग तिच्याइतकीच तिच्या बरोबरीने आपल्या आयुष्याची राखरांगोळी करून घेणाऱ्या तिच्या सखींतही धुमसत होती आणि ह्या साऱ्या स्त्रिया अशाच काही अगम्य वेडाने झपाटल्या होत्या असे त्यांनी दाखविले आहे. ही राणी, म्हणूनच व्यष्टिरूप नसून समष्टिरूप आहे, हा भाव त्यांना व्यक्त करायचा आहे. त्यासाठी वर्मांच्या कादंबरीतील ' मोतीबाई 'ला त्यांनी जुलेखाचे रूप दिले आहे. पूर्ववयातील कलावंतीणीच्या व्यवसायातील ही स्त्री म्हणजे एक प्रखर अशी जळती ज्योत आहे. राणीच्या कौटुंबिक पार्श्वभूमीवर जुलेखाचा आत्मयज्ञ त्यामुळे इतका प्रभावी वाटायला लागतो की ती सबंध नाटकभर राणीला खाऊन टाकते. त्यामुळे हे नाटक म्हणजे केवळ लक्ष्मीबाईचे राहत नाही तर ते लक्ष्मीबाई, जुलेखा, मुंदर व काशी अशा चौघींचे होते. ( त्यांतील काशीबाई फिकी पडते, ही गोष्ट निराळी. ) पारसनिसांच्या चरित्रामुळे झाशीची राणी 'गरीब गाय' वाटते असे टिळकांनी म्हटले आहे. कुसुमाग्रजांच्या नाटकामुळेही तोच भाव मनात प्रकटतो.

याचे कारण काय असावे ? मला वाटते, राणीच्या जीवनातील कृतिशीलतेचा ठसा या नाटकामध्ये अतिशय सौम्य रीतीने उमटला आहे. आपणाला उमलेले सत्य प्रकट करताना नाटककार ऐतिहासिक पार्श्वभूमीपेक्षा इतिहासातील व्यक्तींचे मनोविश्लेषण करण्याकडे अधिक लक्ष देतो. त्यामध्ये नाटककार शिरवाडकरांवर कवि कुसुमाग्रज नेहमी मात करतात. काव्यमय भाषाशैली आणि मार्मिक कल्पनाशक्ती यांच्या सहाय्याने नाटकातील संभाषणे साकार होऊ लागतात, त्यावेळी, स्वतंत्रपणे त्यातील कल्पनाशक्तीचे कितीही कौतुक वाटले तरीही, नाट्यवस्तूवर त्यांचे आक्रमण होत राहते. आणि नाटक म्हणून ही कलाकृती दुबळी पडते. ही भाषाशैली आणि हे विश्लेषण विसाव्या शतकातील,अत्याधुनिक विचारांचे ठायीठायी दर्शन घडविते ( कुसुमाग्रजांच्या साऱ्याच नाटकांत असे होते ) .त्यामुळे नाटकात ऐतिहासिक वातावरण तयार होण्यात अनेक अडचणी निर्माण होतात.

१८७० साली लिहिल्या गेलेल्या नाटकाची भाषा ही, ज्या कालखंडाचे चित्रण त्या नाटकात झाले आहे त्या कालखंडाची प्रातिनिधिक स्वरूपाची अशी आहे. विशेषतः हिंदुस्थानी भाषेचा वापर करताना ती मराठी वाचकांना सहजगत्या समजेल इतकी साधी आहे. पात्रानुसारी भाषा वापरण्याचे नाटककारांचे कौशल्य आज देखील लक्षात

राहावे असे आहे. नाटकात मारवाडी भाट्ये व्यापाऱ्यांची भाषाही तशीच नाट्यपूर्ण आहे.[1] विदूषकाच्या तोंडी मधेच बाणकोटी बाल्याची भाषा येते, तीही अशीच लक्ष वेधून घेण्यारी आहे.[2] म्हणजे तत्कालीन नाटकांप्रमाणे या नाटकात केवळ ग्रांथिक भाषा नसून ती नाट्यानुसारिणी आहे. या तत्कालीन भाषेच्या उठावामुळेच अगोदर अर्धे-अधिक ऐतिहासिक वातावरण तयार होते. याच्या उलट कुसुमाग्रजांची अत्याधुनिक कल्पनांनी युक्त अशी काव्यमय भाषा ही इतिहासकालीन वातावरणापासून आपणाला सतत दूर ठेविते. ती, जणू काही ऐतिहासिक पात्रे आणि प्रसंग यांतून भूत-काळाच्या अद्भुतरम्य व गूढ वातावरणातून वाचकांना ओढून काढून पंख कापलेल्या पक्षाप्रमाणे वर्तमानातच त्याला जखडून टाकते. ऐतिहासिक पार्श्वभूमीची जाणीव असणाऱ्या सुजाण वाचकांना हा अनुभव त्रासदायक ठरतो.

१८७० च्या नाटकामध्ये काही प्रवेशांमध्ये शिळाप्रेसवर छापलेली अशी काही चित्रे आहेत. त्यातली कित्येक चित्रे अगदी बाळबोध, किंबहुना काही तर लहान मुलांनी काढलेली वाटावीत अशा रीतीची आहेत. परिमितीविरहित अशी ही चित्रे आज पाहताना मोठी गंमत वाटते. या चित्रांमध्ये गुजराती पद्धतीची वस्त्रप्रावर्णे असलेली व हुक्का ओढणारी राणी ( पत्रिकेचे मुखपृष्ठ ) जशी आहे, तशीच मुसलमानी शिपाया-सारख्या मर्दानी पोषाखातील राणीही आहे. ह्या चित्रामध्ये जो एक ढोबळपणा आहे, तोच व्यक्तिचित्रणामध्ये आहे. कुसुमाग्रजांनी जी राणी उभी केली, तिचे प्रतीकात्मक चित्र नाटकाच्या मुखपृष्ठावर चित्रकाराने साकार केले आहे ( पत्रिकेचे मुखपृष्ठ पाहा ). धूसर, गुंतागुंतीचे आणि गूढ असे.[3] त्या चित्राप्रमाणे, राणीच्या चित्रणातील काही सूक्ष्म, नाजुक छटा लक्षात घेऊनही त्यांची नायिका स्पष्ट होत नाही. ही दोन्ही चित्रे शंभर वर्षांत लिहिल्या गेलेल्या या दोन नाटकांच्या अंतरंगाबद्दल कितीतरी सांगून जातात.

१८७० चे नाटक मुंबईच्या 'रॉयल' छापखान्यात छापले आहे. त्याची छपाई फार चांगली आहे. मांडणी, दोन शब्दांमधील अंतर, मजकुराची रचना इत्यादी दृष्टीने त्यामध्ये दोष काढावयास कुठे जागा नाही. शेवटी कठीण शब्दांचा कोश आणि

---

१. केहेवतछे के "पाडानीं लढाई नें झाडनो खे" माटे हमारा जेवा आ काममा अमस्ता मरीजसे. होय जेम थवानुं होय तेम थवाय.

२. काय सांगताव काय जाने ! जवां तवां विंग्रजांचा वडीजाव सांगताव ! हां ! ते ! त्यांनी काय बांगड्याच भरल्या होताव काय ?

३. मात्र 'मेरी झांशी नही दूंगी' या राणीच्या उद्गारातूनच तिचा लढा स्वातंत्र्यासाठी नसून स्वतःच्या राज्यलोभापायी होता हे अलीकडील न. र. फाटकां-सारख्या इतिहासकारांचे मत अभावितपणे कुसुमाग्रजांच्या नाटकावर चित्रकाराने नोंदलेले आहे !

शुद्धिपत्रही दिले आहे. हा सापेक्ष १०० वर्षांनंतर आज राहिलेला नाही, असे दिसून येते.

आणखी एका गोष्टीचा जाता जाता उल्लेख करावयास हवा. १८७० च्या नाटका-प्रमाणेच कुसुमाग्रजांचे प्रवेश छोटे छोटे आहेत. काही वेळेला तर रंगभूमीवर घडणाऱ्या एखाद्या नाट्यपूर्ण प्रसंगामुळे नाटक गतिमान होते, असे वाटते न वाटते इतक्यात प्रवेश आटोपतो आणि दुसऱ्या प्रवेशाकडे वळावे लागते. प्रयोगदृष्ट्या त्या पुढच्या प्रवेशाच्या मांडणीसाठी बरेच तांत्रिक कौशल्य लागते. त्यामुळे प्रायोगिकदृष्ट्या कुसुमाग्रजांचे नाटक बरेच गैरसोईचे तर आहेच परंतु त्याच्याही पुढची महत्त्वाची गोष्ट ही की, नाटकही अशा बाह्य साधनांच्या म्हणजे नेपथ्य, प्रकाशयोजना, ध्वनिमुद्रण व ध्वनिसंकलन इत्यादीकांच्या फार कचाट्यात सापडल्यासारखे वाटते.

युद्धासारख्या अवघड दृश्य साधनांचा परिणाम सहजगत्या साधण्यासाठी जुन्या नाटकामध्ये सूत्रधार-विदूषकाचा चांगलाच उपयोग करून घेण्यात आला आहे. जुन्या काही परंपरांचा असा चांगलाही उपयोग होतो. शेवटी, कौशल्य सारे रचनेत आहे हेच खरे !

## साभार–स्वीकार

**सावट** ( अनुवादित कादंबरी-रिबेका ) हेरंब देशपांडे, महाराष्ट्र सहकार ग्रंथ भवन, पुणे २; ६ रु.

**गोष्टीरूप विनोबाजी** साने गुरुजी, साधना प्रकाशन, पुणे ३०; ५ रु.

**भारतीय समाजवादाची वाटचाल** मधु दंडवते, साधना प्रकाशन, पुणे ३०; २=५०

**चंद्राबाई कोण ?** ( मूक साधक स्त्रीची जीवनकथा ) केदारनाथ, ज्युपिटर पेपर मार्ट, रविवार, पुणे २; ३ रु.

**जन्ममृत्यूमोक्षरहस्य** स्वामी विज्ञानानंद, न्यू वे आश्रम, लोणावळा

**दुनन** ( कविता ) भाऊ मांडवकर, सेवा प्रकाशन, अमरावती २, ३–५०

**पिंपळपान** ( गोविंदाग्रज ) संपादक कुसुमाग्रज, प्रस्तावना रा. शं. वाळिंबे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; ५ रु.

**मृगावर्त** ( कविता ) कु. ब. निकुंब, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; ३॥ रु.

**मृत्युगीत** ( कविता ) म. गो. देशपांडे, मृत्युंजय प्रकाशन, पुणे २; ८ रु.

# डॉ. मुरलीधर गणेश पानसे

अशोक रा. केळकर

---

मराठी भाषा, वाङ्मय, आणि संस्कृती ह्यांचे इतिहासज्ञ अभ्यासक, साहित्याखेरीज नाट्य, संगीत, नृत्य ह्याही कलांचे जाणकार रसिक, क्रीडापटू आणि क्रीडारसिक — आणि ह्या विविध क्षेत्रांमधल्या संस्थांतून काम करणारे कार्यकर्ते, बाल, समवयस्क, आणि ज्येष्ठ ह्या सर्वांनाच जवळचे वाटणारे एक सुहृद असे हे समृद्ध व्यक्तिमत्व आपल्यामधून अकाली हरपले आहे. डॉ. मु. ग. पानसे ह्यांच्या ठिकाणी सहसा एकत्र न येणारी आणि आलीच तर न नांदणारी अंगे एकवटलेली होती. एका बाजूला आयुष्यात वारंवार आलेल्या संकटांना तोंड देणारा, प्रतिकूल परिस्थितीमुळे पिचून न जाणारा कणखरपणा आणि तशीच जिद्द त्यांच्यामध्ये होतीच. मात्र त्याचबरोबर पुष्कळांच्यामध्ये दिसणारा कडवटपणा किंवा समोरच्या माणसाच्या भलेपणाबद्दलची साशंकता इथे नव्हती, उलट एक अनपेक्षित कोवळीक होती. त्यांच्या खेळकर आणि निगर्वी स्वभावामुळे ते तरुणमंडळीत सहजी मिसळून जात, त्याचबरोबर त्या मंडळींना धाक वाटावा असा एक करडा अलिप्तपणाही त्यांच्याजवळ होता. राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक बाबतीत आधुनिक मंडळींत त्यांची ऊठबस होती, परंतु जुन्या, बाळबोध वळणाच्या लोकांनाही त्यांच्याशी वागताना — बोलताना अवघड वाटत नसे.

अलौकिक प्रतिभा त्यांच्याजवळ होती अशातला भाग नाही. थोड्या भांडवलावर जास्तीत जास्त फायदा उठवणारे बहुप्रसव कसबही त्यांच्या ठिकाणी नव्हते. परंतु ते खऱ्या अर्थाने विद्यारत होते — विद्याजड मात्र नव्हते — हेही तितकेच खरे. डोळस निराग्रहीपणा, दीर्घोद्योगी व्यासंग, आणि मांडणीचा नेटकेपणा हे त्यांच्या लेखनाचे विशेष आहेत. इंग्लिश आणि मराठी ह्या दोन्ही भाषांतून ते लिहीत. मराठी आणि महाराष्ट्र हे जरी त्यांच्या अभ्यासाचे विषय होते तरी महाराष्ट्राचे भारतातील अन्य

प्रदेशांशी संबंध आणि मराठी भाषा आणि वाङ्मय ह्यांची संस्कृत आणि प्राकृत ह्या-मध्ये रुजलेली मुळे ह्यांचे त्यांना सतत भान असे. ह्या तीनही भाषांचा अभ्यास त्यांनी केला, पण ते रमले मराठीतच. भाषेचा ऐतिहासिक अभ्यास आणि वाङ्मयाचा संहिता-लक्षी अभ्यास ह्या क्षेत्रात आधुनिक दृष्टी रुजवण्याचा प्रयत्न डेक्कन कॉलेजमधील अध्ययनकार्यामध्ये डॉ. सु. मं. कत्रे ह्यांनी केला. त्याचा पुरेपूर फायदा घेऊन आणि त्याला चिकाटीची जोड देऊन ज्ञानेश्वरीच्या भाषावैशिष्ट्यांवरील आपला पदवीप्रबंध त्यांनी सिद्ध केला आणि मराठी भाषेचे अध्ययन आणखी एक पाऊल पुढे नेले. जुनी मराठी आणि अर्वाचीन मराठी (म्हणजे ज्ञानेश्वरांच्या नंतरच्या काळापासून आज-पर्यंतची) ह्या दोन अवस्थांचे स्वरूप स्पष्ट होण्यास नंतरच्या अभ्यासकांना पानसे यांच्या प्रबंधामुळे मदत झाली.

श्रीपतिभट्ट ह्याचा 'ज्योतिष-रत्न-माला' हा मूळ संस्कृत ग्रंथ आणि त्यावरील मराठी टीका ह्यांचे संपादन करून त्याला भाषाविषयक प्रस्तावना त्यांनी जोडली. ही मराठी टीका श्रीपतिभट्ट ह्या मूळ ग्रंथकाराच्याच हातची आहे आणि तिच्यामधील मराठी त्यामुळे ग्रंथकारकालीन मराठीचाच एक नमुना ठरते हे त्यांचे प्रतिपाद्य वादग्रस्त ठरले तरी त्यांच्या संपादनकार्याची उपयुक्तता त्यामुळे कमी होत नाही.

डेकन कॉलेजमधील संस्कृत महाकोशाची पूर्वतयारी म्हणून संस्कृतमधील जुने कोश संपादून प्रसिद्ध करण्याचा एक उपक्रम तिथे झाला. त्याचा भाग म्हणून सहज-कीर्ति ह्याचा 'सिद्धशब्दार्णव' हा संस्कृत समानार्थी शब्दांचा कोश त्यांनी संपादिला.

प्रा. गं. बा. सरदार आणि प्रा. दि. के. बेडेकर ह्यांच्या वैचारिक साहचर्यामुळे सामाजिक पार्श्वभूमी आणि सामाजिक जाणीव ह्यांबद्दल सतत जागृत राहणारे पानसे ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाकडून तिला समकालीन अशा यादवकालीन समाजाकडे वळावेत हे साहजिकच होते. यादवकालीन संस्कृती ही एका जुन्या काळाचा ह्रास दर्शवणारी होती का एका नव्या जाणिवेची पहाट होती हा एक प्रश्न उपस्थित करण्यासारखा आहे. (चित्रकार द. ग. गोडसे ह्यांच्या **पोत** ह्या ग्रंथात त्याचे उत्तर प्रथमपक्षी ठामपणे मांडण्यात आले आहे.) महाराष्ट्राच्या संस्कृतीच्या प्रारंभीच्या घडणीमध्ये जैन धर्मीयांचा मोठा वाटा असला पाहिजे, परंतु आजच्या महाराष्ट्रातील जैन मात्र गुजरात राजस्थानमधले श्वेतांबर किंवा कर्नाटकामधले दिगंबर असे अल्पसंख्य तेवढेच आहेत, खास मराठी दिसत नाहीत. हे कसे काय ? ह्या किंवा इतर अशा प्रश्नांचा उलगडा होण्यास अस्सल साधनांच्या आधारे यादवकालीन मराठी संस्कृतीचे चित्र काढणे आवश्यक होते. ते कार्य त्यांनी आपल्या **यादवकालीन महाराष्ट्र इ. स. १००० ते १३५०** ह्या अल्पावधीत दुर्मीळ झालेल्या ग्रंथात करून ठेवले आहे.

पानसे इतिहासाचे अभ्यासक असले तरी ते वर्तमानाला विसरून इतिहासात रमणारे नव्हते. आजच्या संक्रमणकाळातील भारतात जाणवणाऱ्या भाषिक समस्यांची सोडवणूक व्हायची असेल तर किमान शिक्षित समाजाचा तरी भाषेचे अंतःसूत्र आणि

तिचा व्यवहार ह्याच्याबद्दलचा समज वाढला पाहिजे हे त्यांच्या मनाने घेतले. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या भाषा-समितीचे निमंत्रक (१९६७-६९) ह्या नात्याने त्यांनी पुण्यातील आणि, हो, पुण्याबाहेरील अभ्यासकांच्या व्याख्यानांची एक माला योजली, चिकाटीने ती योजना तडीस नेली, आणि त्याहीपेक्षा जिकिरीचे काम म्हणजे व्याख्या-त्यांकडून लेख लिहून घेऊन त्याचे खऱ्याखुऱ्या अर्थाने त्यांनी संपादनही केले. हा ग्रंथ आणि त्यातील 'भाषा आणि साहित्य' हे एक प्रकरण हे त्यांचे शेवटचे महत्त्वाचे प्रकाशन ठरले.

इतक्या वर्षांच्या अभ्यासाने एक परिपक्वता पानशांना लाभली होती अलीकडेच लाभलेल्या व्यावहारिक स्वास्थ्यामुळे त्यांना नवी उमेदही आली होती. ह्यातून त्यांच्या-कडून अधिक संशोधन आणि लेखन होईल अशी अपेक्षा होती.

प्रतिकूल परिस्थितीत बळ देणारे सुखी गृहजीवन आणि सुदृढ शरीरयष्टि त्यांना लाभलेली होती. त्यांच्यामागे त्यांच्या पत्नी आणि तीन मुलगे असा परिवार आहे.

ह्यानंतर त्यांचा संक्षिप्त जीवनपट, त्यांच्या आणि त्यांच्यावरच्या लेखनाची सूची ही जोडली आहेत. लेखनसूची तयार करताना डेक्कन कॉलेज ग्रंथालयातील श्री. रा. पां. गोस्वामी ह्यांची मदत झाली हे आभारपूर्वक नमूद करायला हवे.

**जीवनपट :**

| | |
|---|---|
| १९१८ | पुणे येथे जन्म (९ सप्टेंबर)<br>पुणे येथे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण (मुख्यतः न्यू इंग्लिश स्कूल व फर्गसन कॉलेज) |
| १९४१ | मुंबई विद्यापीठाची बी. ए. पदवी प्राप्त |
| १९४७ | डेक्कन कॉलेजमधून मुंबई विद्यापीठाची पी-एच. डी. पदवी भाषा-विज्ञान विषयात प्राप्त; विवाह : नीला (द्वारका रामकृष्ण पत्की) |
| १९४७-९ | रुइया कॉलेज, मुंबई येथे अध्यापन |
| १९५०-६२ | डेक्कन कॉलेज, पुणे येथील संस्कृत महाकोश योजनेत काम केले. |
| १९५७ | पुणे विद्यापीठाची एम्. ए. (संस्कृत) पदवी प्राप्त. |
| १९६२-६४ | लेक्चरर इन इंडो-आर्यन, पुणे विद्यापीठाचा डेक्कन कॉलेजमध्ये असलेला भाषाविज्ञानविभाग |
| १९६४ | डिसेंबर पासून रीडर इन इंडोआर्यन, डेक्कन कॉलेजचा भाषा-विज्ञानविभाग |
| १९६८-६९ | सहकार्यवाह, लिंग्विस्टिक सोसायटी ऑव्ह इंडिया |
| १९७० | पुणे येथे कर्करोगाने मृत्यु (२२ ऑगस्ट) |

**कै. डॉ. मु. ग. पानसे यांच्या लेखनाची सूची :**

१९४३ पी-एच्. डी. प्रबंध: Linguistic peculiarities of Jnaaneshvarii with index verborum. Poona : Deccan College. Submitted to the University of Bombay, 1943 (accepted 1946). प्रकाशित : **Bulletin of the Deccan College Research Institute** 10 : 2 (Sept. 1950, publ. Jan. 1951), 10 : 3 (March 1651), 10 : 4 (March 1952). ग्रंथरूपाने दोन भागात : Poona : Deccan College, 1953.

१९४४ लेख : Episodial variants in the Marathi version of Aadiparvan. **Annals of the Bhandarkar Oriental Research Institute** 26.

१९५० लेख : ज्ञानेश्वरी आणि बालकसृष्टी. **महाराष्ट्र** १५ : ३. १२ (मार्च १९५०). ज्ञानेश्वरीतील बालकविषयक उल्लेखाधारे विवेचन.

१९५३ लेख : भारतीय देशभाषांच्या तुलनात्मक अभ्यासाची योजना, डेक्कन कॉलेज संस्थेमध्ये भरलेल्या भाषाभिज्ञ परिषदेच्या कार्याचा परिचय. **नवभारत** ६ : ११. ५३-७ (ऑगस्ट १९५३).

१९५४ लेख : ज्ञानेश्वरीतील कानडी शब्द. **म. म. चित्रावशास्त्री अभिनंदन ग्रंथ.** पुणे.

१९५५ लेख : Rajwade-text of Shripati's Jyotisha-ratna-maalaa. **BDCRI** 14 : 3, 195-207 (1952, publ. 1955).

१९५६ लेख : Nominal stem-formants in Old Marathi. **BDCRI** 17 : 2, (Sept. 1955, publ. April 1956) प्राचीन मराठीतील तद्भव प्रातिपदिकांच्या अंतीचे कृदन्त आणि तद्धित प्रत्यय.
परीक्षण : ना. गो. कालेलकर. ध्वनिविचार. पुणे : डेक्कन कॉलेज, १९५५. **नवभारत** ९ : ५. ६१-३ (फेब्रु. १९५६).
परीक्षण : वि. मो. केळकर. **ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या.** पुणे : भारतीय धर्मतत्त्वज्ञान-संस्कृति-मंडळ, १९५६. **नवभारत** ९ : १२, ६५-७ (सप्टेंबर १९५६).

१९५७ संपादित ग्रंथ : Jyotisha-ratna-maalaa of Shriipatibhatta, **BDCRI** 17 : 4. 237-502 (March 1956, publ. July 1957). ग्रंथरूपाने : Poona : Deccan College, 1957. मूळ संस्कृत ग्रंथ, त्यावर मूळ लेखकाची मराठी टीका.

१९५८ लेख : Old Marathi avasvara and vedic ava √svr. **BDCRI** 18 : (1957-8, publ. 1958).

१९५९ लेख : यथार्थदीपिका : गीतेचे मराठीतील एक दर्शन. **प्रसाद** ( मार्च १९५९ ).

१९६० लेख : Siddhashabdaarnava of Sahajakiirti. **BDCRI** 20-1-6 ( 1959-60, publ. 1960 )
लेख : Shriipati's Marathi commentary on his own Jyotisha-ratna-maalaa. **P. K. Gode commemoration volume** 3.151-6. Poona : Oriental Book Agency.
लेख : महाराष्ट्राचा प्रदेशविस्तार : ऐतिहासिक समालोचन. **महाराष्ट्र जीवन : परंपरा प्रगति आणि समस्या.** संपादक गं. बा. सरदार. भाग १. ४९-६८. पुणे : जोशी आणि लोखंडे प्रकाशन.

१९६२ लेख : Some peculiar words from Rauhineya-carita [ of Devamuurti ]. **Poona Orientalist** 26:3-4. 131-9 ( 1961-2 ). जैन संस्कृत ग्रंथातील काही चिन्त्य शब्दांचे अर्थ, उगम, अवतरणे, इत्यादी.

१९६३ ग्रंथ : **यादवकालीन महाराष्ट्र इ. स. १००० ते १३५०.** मुंबई : मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय. १२ रु. १२ + २६२ पृ. + नकाशा + चित्र अर्पण : गं. बा. सरदार यांस. पुरस्कार : अनंत काणेकर. ग्रंथ-संग्रहालयामार्फत एशिया फाउंडेशनची अभ्यासवृत्ति १९६०-१. प्रमुख आधार : यादव शिलाहारकालीन कोरीव लेख. शेवटच्या काही प्रकरणांची मुद्रणप्रत पानशेत पुरात नष्ट झाली, ती नव्याने लिहावी लागली.

१९६४ लेख : मध्ययुगीन जैन संप्रदाय आणि महाराष्ट्र. **भारतीय इतिहास आणि संस्कृति** १ : १. ९-२७ ( एप्रिल १९६४ ).

१९६५ संपादित ग्रंथ : **Siddhashabdaarnava of Sahajakiirti.** Poona : Deccan College, 1965. 9 + 228 pp. पहिली मुद्रणप्रत पानशेत पुरात नष्ट १९६१. नव्याने लिहून प्रकाशित. संस्कृत समानार्थशब्दकोश.
लेख : संहिता संपादन आणि डॉ. वि. भि. कोल्हे. **नवभारत** १८ : ९ ८-१७ ( जून १९६५ ). पानसे-संपादित ज्योतिषरत्नमालेचे परीक्षण कोलत्यांनी विदर्भ-संशोधन-मंडळ वार्षिक १९६३ मध्ये केले त्याला उत्तर.

१९६६ लेख : फारसी आणि अरबी लिपी. **साधना** ( २४-९-१९६६ ) १३-५. आकाशवाणी पुणे केन्द्रावरून ध्वनिक्षेपित झालेले व्याख्यान.

१९६७ परीक्षण : अ. का. प्रियोळकर. **ग्रांथिक मराठी भाषा आणि कोंकणी बोली.** पुणे, पुणे विद्यापीठ, १९६६. **सत्यकथा** ( ऑगस्ट १९६७ ) ७०-३.
लेख : मध्ययुगातील धर्म आणि राज्यशासन. **नवभारत** २० : ११. १९-२५ ( ऑगस्ट १९६७ )

लेख : आत्मानंद : एक पारमार्थिक दृष्टिकोण. **ज्ञानदूत** (दिवाळी १९६७) २४५–६.

लेख : मराठी भाषेची प्रकृति. **सत्यकथा** (डिसेंबर १९५७) ७–१४, ४४. डॉ. वि. भि. कोलते ह्यांच्या १९६७ च्या मराठी साहित्य संमेलनामधील अध्यक्षीय भाषणाचा परामर्श.

लेख : Religion and politics in the early Mediaeval Deccan, A. D.1000–1350. **Journal of Indian History** 45 : 3. 673-87 ( Dec. 1967 ).

१९६८ लेख : संतवाङ्मयाची भाषा. **साहित्य विचार आणि समाजचिंतन : प्रा. गं. वा. सरदार गौरवग्रंथ.** संपादक : **भा. शं. भणगे.** मुंबई : ओरिएंट लॉंगमन्स.

परीक्षण : John C. McLaughlin. A Graphemic–phonemic study of a Middle English manuscript : The Hague, Moutonl 1965. **BDCRI** 26 : 3-4 : 48 ( 1965-6, publ. 1968 ).

परीक्षण : A. K. Priolkar ( ed. ) Doutrina Christan–Poona : Univ. of Poona, 1965. **BDCRI** 26 : 3-4. 59-62 ( 1965-6, publ. 1968 ).

लेख : प्रादेशिक भाषा : शिक्षणाचे माध्यम. **महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका** अंक १६३. १–११ (ऑक्टो. डिसें. १९६७, प्रकाशन जाने. १९६८ ). लेखावरील दि. धों. कर्वे यांच्या पत्रास उत्तर. **म. सा. प.** अंक १६५ ( एप्रिल–जून १९६८ ).

टिपण : 'शब्दवेध' या नव्या सदराचा उपक्रम. **म. सा. प.** अंक १६६. ५८ ( जुलै–सप्टें. १९६८, प्रकाशन डिसें. १९६८ ).

लेख : महाराष्ट्र दर्शन : मध्ययुग. **ज्ञानेश्वर** ( पुनरुज्जीवित ) १ : १. ११–६ ( नोव्हें. १९६८ ). आकाशवाणीवरील व्याख्यान.

१९६९ परीक्षण : सुभाषचंद्र अक्कोळे : **प्राचीन मराठी जैन साहित्य.** नागपुर-पुणे : सुविचार, १९६८. **म. सा. प.** अंक १६७. ६२–३ ( ऑक्टो.–डिसें. १९६८, प्रकाशन फेब्रु. १९६९ )

लेख : मध्ययुगीन महाराष्ट्र. मांडवी ७ : ५. ४–६ ( मे १९६९ ). ग्रामविकास ( मे १९६९ ) ७–९. ३७ ( दोन ठिकाणी प्रकाशित ).

परीक्षण : सुलभा ब्रम्हे व प्रकाश गोळे. **पानशेतप्रलय.** पुणे : गोखले अर्थशास्त्र संस्था, १९६८. **समाज–प्रबोधन–पत्रिका** अंक २९. ५६–८ ( सप्टें.–ऑक्टो. १९६९ ).

संपादित ग्रंथ : **भाषा : अंतसूत्र आणि व्यवहार.** पुणे : महाराष्ट्र–साहित्य–परिषद, १९६९. पंधरा +:१६४ पृ. परिषदेच्या भाषा–समितीच्या विद्यमाने १९६७ साली झालेल्या व्याख्यानांचा संग्रह. संपादन आणि संपादकीय प्रस्तावना; आणि एक व्याख्यान : भाषा आणि साहित्य (पृ. १३५–५५).

१९७० लेख : वाङ्मयविद्या ( Philology ) : स्वरूप व व्याप्ती. **म. सा. प.** अंक १७१–२. ३–१७ (ऑक्टो. १९६९-मार्च १९७०, प्रकाशन : मार्च१९७० ).
संकलन : An Indo-Aryan dialect of Central Asia. **Vaartaavaha** : Bulletin of the Central Institute of Indian Languages, No. 3. 17-24 ( April 1970 ). सोविएत यूनियन मधील पारिया या भारतीयआर्य भाषेवरची रशियन सामग्रीवरून संकलित केलेली माहिती.
लेख : Prakrit and Marathi [ in summary ]. Dandekar, R. N. and Ghatage, A. M. ( ed ). **Proceedings of the Seminar in Prakrit Studies June 23-7, 1969.** Poona : Univ. of Poona, 1970. Page 84.

अप्रकाशित : Nominal derivatives in Indo-Aryan. ग्रंथरूपाने प्रकाशित करण्यासाठी संस्कारित प्रत तयार करण्याचे काम चालू होते.
Regional individuality of Maharashtra. **Indica.**
Statistical information about Indian languages. Contribution to a projected book on Indian Languages by several authors.
History and literature under the Marathas. Presented at the first Maratha History Seminar at Deccan College, Poona, 1968.
लिंगायत संप्रदाय, आकाशवाणी, पुणे केंद्र, ध्वनिक्षेपित १७–६–१९६५. ' महाराष्ट्रातील तीन संप्रदाय ' ह्या व्याख्यानमालेतील व्याख्यान.

**कै. डॉ. मु. ग. पानसे ह्यांच्या विषयीच्या लेखनाची सूची :**

प्रभाकर कुलकर्णी : डॉ. मु. ग. पानसे. **तरुण भारत,** २९–८–१९७०
' दूरस्थ स्नेही ' [ अशोक प्रभाकर कामत ? ] : मृत्यूने अकाली ओढून नेलेला अभ्यासक. **केसरी** ( रविवार ३०–८–१९७० ).
ग. प्र. प्रधान : डॉ. मु. ग. पानसे. **साधना** २३ : ३. २५ (२९-८-१९७०).
ना. गो. कालेलकर : डॉ. मु. ग. पानसे. **रविवार सकाळ** ( ३०–८–१९७० ).

अनुक्रमणिका

# पुस्तक-परीक्षणे

## दुःख माझे रंगले

कवि—योगेश्वर अभ्यंकर,
प्रकाशक : वा. गं. ढवळे, भारत-गौरव ग्रंथमाला, मुंबई २, मूल्य आठ रुपये.
परीक्षण लेखक—रा. श्री. जोग.

## रात्र कधी संपूच नये

लेखक—प्रभाकर तामणे, ठोकळ प्रकाशन, श्री लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रस्ता, पुणे २. पृ. १८६, मूल्य आठ रुपये परीक्षण लेखक—रवींद्र घवी

## स्त्रीफळा

लेखक—भीमराव कुलकर्णी, दत्त प्रकाशन, १६२३ सदाशिव पेठ, पुणे ३० पृ. १५६, मूल्य सात रुपये. परीक्षण लेखक—रवींद्र घवी.

## इतिहास कोण घडवितो ?

लेखक—श्री. अ. डांगे, अभिनव प्रकाशन, ७ अंबासदन, जेरबाई वाडिया रोड, परळ, मुंबई १२. पृ. ४६. मूल्य रु. १–५०
परीक्षण लेखक : रा. वि. ओतुरकर

## दुर्दम्य : खंड पहिला

लेखक—गंगाधर गाडगीळ, सुविचार प्रकाशन, पुणे व नागपूर, पृ. ३५० किंमत दहा रुपये. परीक्षण लेखक : भीमराव कुलकर्णी

## हातभट्टी

लेखक—शंकरराव खरात, कुलकर्णी ग्रंथागार शनिवार, पुणे ३०, पृ. २४६ मूल्य दहा रुपये परीक्षण लेखक : भीमराव कुलकर्णी

## मनवृंदावन

कवयित्री : सुशील पगारिया, क्रांति प्रकाशन, जळगाव, पृ. ६४ मूल्य चार रुपये
परीक्षण लेखक : भीमराव कुलकर्णी

## क्रांतिकारक टिळक आणि त्यांचा काळ

लेखक—अनंत जनार्दन करंदीकर, काळ प्रकाशन, १४०४ सदाशिव, पुणे २. पृ. ४२४, मूल्य पंधरा रुपये परीक्षण लेखक : ग. वि. केतकर

## दुःख माझे रंगले

योगेश्वर अभ्यंकर हे नाव रेडिओवर भावगीते ऐकणाऱ्यांच्या परिचयाचे असलेच पाहिजे. ह्या अभ्यंकरांच्या ४१ कवितांचा हा वा. ग. ढवळे यांनी काढिलेला कविता-संग्रह आहे. रेडिओवरील भावगीते मात्र यात आलेली नसून अलीकडे जिला भाव-कविता असे म्हणण्यात येते, अशी आपली कविता अभ्यंकरांनी या कवितासंग्रहात वाचकांना सादर केली आहे. यातील बरीचशी कविता जुन्या अभंग-ओवी छंदात लिहिलेली आहे. हा छंद सहज-सरल भावनाविष्कारास नेहमीच फार अनुकूल असतो. तसा तो येथेही झालेला आहे. काही थोड्या कवितांत मात्रारचना आहे, तीही साधेच रूप घेऊन सहज–सरलतेने व्यक्त झाली आहे. ही अशी कविता नव-कवितेच्या आजच्या जमान्यात काव्य म्हणून मान्य होणे कठिण दिसते. कवीचे व्यक्तित्वही साधे-भोळे दिसते, तो प्रामाणिक दिसतो आणि भावनेस काही आवेग आला की लगेच तिला रचनाबद्ध करून टाकतो. यात काही प्रेम–कविता आहे, पण तिलाही प्रणयचंचला भ्रूलीला अवगत नाहीत; वक्रोक्तीही माहीत नाही असे वाटते. भावनेची उत्कटता तीव्र होण्याआधीच ती प्रकट होते. तिच्यामध्ये भोवतालच्या जीवनाविरुद्ध बंड करण्याची वृत्ती दिसत नाही, कटुताही नाही. त्या जीवनातील दंभ, ढोंग तिला कळते, पण सरळ नापसंती व्यक्त करण्यापलीकडे ती झेप घेत नाही. कवीची ईश्वराकडे तक्रार असली तरी त्याच्यावर श्रद्धा आहे. निळ्या नभापलीकडे आपला 'विश्वनाथ' राहतो असे त्याला वाटत असते, आणि क्वचित 'तेथे आहे किंवा नाही' अशी शंका त्याला टोचत असली तरी कवी सश्रद्ध आहे व ईश्वराचे नाव कर्म करिताना ध्यावयास तो सांगतो. कवीला निसर्ग आनंद देतो, संगीत मुग्ध करिते, परंतु हे विषय त्याचे मन व्यापून टाकीत नाहीत. यात मातेचे प्रेम, मायबोलीचा अभिमान, पत्नीविषयीचा स्नेह, कवितेचा छंद, सुख-दुःखांनी मिश्रित जीवन, व्यवहारी जग इत्यादी अनेक परिचित विषयांना जागा मिळते. नुकत्याच झालेल्या परकीय आक्रमणातील सैनिक, त्याची पत्नी, त्याची भगिनी यांनाही तेथे स्थान आहे. त्यांच्या भावनांचा आविष्कार करीत असता 'अणुशक्ती–उपासना आज तारणार देश' असेही तो संदेशवजा सांगून जातो. अनेक वेळा ही कविता प्रतिपादनाचे रूप धारण करिते, तिला केवळ आत्माविष्काराचे रूप राहत नाही. जे प्रतिपादन किंवा जो आत्माविष्कार येथे आहे, तो अगदी बालबोध आहे, त्यात दुर्बोधता तिळमात्रही नाही. पण यामुळे या कवितेची पदवी उंचावली असे मात्र झालेले नाही. सामान्य प्रश्न, सामान्य सुखदुःखे साधेपणाने या कवितेत व्यक्त झाली आहेत.

अशा या कवितेची सजावट मात्र आजवर झाली नसेल इतकी रंगीबेरंगी आणि श्रीमंत झाली आहे. प्रकाशकांनी आपली प्रतिभा आणि शक्ती खर्ची घालून हा काव्य-

संग्रह काढला आहे. संग्रहातील कवितेच्या अंगभूत साधेपणाशी इतका मेक-अप विसंगत वाटतो. एवढा शृंगार पेलण्याचे सामर्थ्य तिच्यामध्ये असते, तर 'चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः' असे म्हणावयास काहीच हरकत राहिली नसती.

## रात्र कधी संपूच नये

"रात्र कधी संपूच नये...असं वाटण्याची वेळ माणसाच्या आयुष्यात केव्हा ना केव्हा तरी येत असते...पण रात्र संपते, दिवस उजाडतो...कधी कधी नवं जीवनही घेऊन येतो" असा संदेश देण्यासाठी जणू लिहिलेली प्रभाकर तामणे यांची 'रात्र कधी संपूच नये' ही कादंबरी. तिची कथा थोडक्यात अशी. रमेश देशमुख या वकिलास तीन वर्षांची शिक्षा झाली आहे. सुटकेच्या आदल्या रात्री त्याच्या मनात भावनांचे तुफान उसळलेले आहे. त्याला वाटते आहे ही रात्र कधी संपू नये, पुन्हा तुरुंगाबाहेरच्या जगात जावे लागू नये... कारण या तरुण व कर्तबगार वकिलाचा एकदा वंदना या सुंदर व सुस्वभावी स्त्रीशी विवाह झाला होता. त्यामुळे रमेश आपला जावई व्हावा ही आबासाहेब मराठे यांची इच्छा अपूर्ण राहिली. त्यातच आबासाहेब हे यशस्वी सनातनी वकील. रमेशच्या वकिलीतील नावलौकिकामुळे त्यांना असूया वाटू लागते. रमेशचे जीवन उद्ध्वस्त करण्याचा डाव ते रचतात. वंदनाच्या विवाहपूर्व प्रेमाचा खोटा व कल्पित पुरावा ते मोठ्या चतुराईने रमेशला दाखवतात. त्या धक्क्याने संतप्त झालेला रमेश वंदनाला टाकून बोलतो. त्या बोलण्याने दुखावलेली वंदना राहूलला–तिच्या लहान मुलाला–मागे ठेवून विहिरीत जीव देते. रमेशचा सुखी संसार उद्ध्वस्त होतो. नंतर तो वडिलांच्या आग्रहास्तव दुसऱ्या संसाराचा डाव टाकतो. परंतु त्याची दुसरी पत्नी सरोज ही मत्सरी, स्वार्थी, आळशी, भांडखोर असल्याने हा संसार दुःखाचा होतो. म्हणून रमेश तमाशांना जाऊ लागतो. तिथे किशोरी ही अल्पवयीन नर्तिका त्याचे मन रिझवते. एक दिवस पत्नीशी भांडून बाहेर पडलेल्या व गाडीतून सुसाट वेगाने निघालेल्या रमेशला वाटेत किशोरी भेटते. ती संकटात असते, म्हणून रमेश तिला वाचवण्यासाठी दूर एका हिल स्टेशनवर घेऊन जातो. परंतु किशोरीची मानलेली आई म्हणजे मुलींचा विक्रय करणारी स्त्री, रमेशने किशोरीला पळवून नेण्याची पोलिसात तक्रार करते. रमेशची पत्नी त्याच्याशी घटस्फोट घेते. अल्पवयीन मुलीला पळवून नेल्याच्या आरोपावरून रमेशवर खटला भरला जातो. छळाच्या भीतीने किशोरी खोटी साक्ष देते व रमेशने आपणास पळवून नेले असे सांगते. रमेशला तीन वर्षांची शिक्षा होते....म्हणून जगाला विटलेल्या रमेशला ही रात्र संपू नयेशी वाटते. पण रात्र संपते,

रमेशची सुटका होते, बाहेर किशोरी उभी दिसते. तिने तीन वर्षे रमेशच्या मुलाचे संगोपन केलेले असते. शेवटी ती आपल्या छळाची कहाणी रमेशला सांगते व प्रेमाची खात्री पटवते. रमेशचे किशोरीशी लग्न लागते. नवा संसार ( सुखाचा ) सुरू होतो.

ही कथा लेखकाने १८१ पृष्ठांत निवेदनचातुर्याने फुलवून आणि फुगवून सांगितली आहे. या कादंबरीला ५ पानी प्रस्तावना लिहून श्री. ग. दि. माडगूळकर यांनी तिचे गुणवर्णन केले आहे. ' ही कादंबरी सामाजिक व कथानकप्रधान आहे. ती चित्रकलेच्या तंत्राने लिहिली आहे. तीत चढत्या क्रमाने परिणाम साधणारी दृश्ये एकामागे एक साकारतात. विलक्षण वाटणारे नाट्यप्रसंग कथेत ठायी ठायी आहेत. लेखकाच्या लेखणीने संयम मुळीच सोडला नाही. यशस्वी वकील कैदी कसा झाला ? हे कुतूहल त्यांनी अखेर पर्यंत कायम ठेवले आहे इ. वैशिष्ट्ये त्यांनी सांगितली आहेत. जाता जाता मनोविश्लेषणात्मक कादंबऱ्या व कथानकप्रधान कादंबऱ्या यांच्यासंबंधीची काही विवाद्य मतेही त्यांनी मांडली आहेत. अर्थात या ठिकाणी कादंबरीचे परीक्षण अभिप्रेत असल्याने या मतांची चिकित्सा सोडून देऊ. मात्र त्यांनी सांगितलेली या कादंबरीची वैशिष्ट्येच तिची वाङ्मयीन वैगुण्ये ठरत आहेत असे वाटते. कारण कथालेखकाने निव-डलेल्या विशिष्ट तंत्रामुळे त्याला वाचकाचे कुतुहल सतत चाळवत ठेवून उत्सुकता अखेरच्या क्षणापर्यंत कायम टिकविण्यावरच लक्ष केंद्रित करावे लागले आहे. कथा वाचनीय करण्यासाठी असे करण्यास काहीच हरकत नाही. परंतु असे तंत्र सांभाळताना निवडलेल्या विषयावर अन्याय होता कामा नये. या कादंबरीचा विषय मुळीच वेगळा नाही व आहे त्या विषयालाही लेखक न्याय देऊ शकलेला नाही.! प्रिय पत्नी वारल्या नंतर एका दुसऱ्या स्त्रीशी संसार करताना संवेदनाक्षम मनाच्या तरुणाची अवस्था किती शोचनीय होत असेल ? ही शोचनीयता हा या कादंबरीचा विषय आहे. तो हळु-वारपणे वर्णन करायचा म्हटल्यास फार हृदयंगम होणारा आहे. या मुख्य व हृद्य गोष्टीकडे बरेचसे दुर्लक्ष करून आणि एका उमद्या वकिलास तीन वर्षं शिक्षा का झाली या रहस्याचे कुतूहल अखेरपर्यंत कायम ठेवण्यावर लक्ष केंद्रित करून लेखक लिहिताना दिसतो. परिणामी त्या तरुणाच्या मनातील हृदयस्पर्शी भावसंघर्ष अस्पर्शच राहिला आहे. एवढेच नव्हे तर तो नायक आणि त्याची पहिली पत्नी वंदना, दुसरी पत्नी सरोज, तिसरी पत्नी, नर्तिका किशोरी, नायकाचे वडील अण्णा, वंदनाचे वडील तात्या, नायकाचा मित्र शरद ( हे पात्रतर सर्वथा फालतू आणि अनावश्यक ) ह्या साऱ्या व्यक्तींना निर्जीव कळसूत्री बाहुल्यांचे स्वरूप येते. त्यांच्या स्वभावातील ठोकळेबाजपणा तर अगदी अकलात्मक व असह्य वाटतो. कोणत्याही व्यक्तीचं किंवा तिच्या दुःखाचं मनाला भिडावं असे वर्णन लेखक करू शकलेला नाही. मनाला जाणवते ती लेखकाची उत्सुकता ताणून ठेवण्याची धडपड....

वाचकांचे कुतूहल चाळवत ठेवल्याने कथा वाचनीय होते तर तिच्यातील यशस्वी व्यक्तिचित्रणाने आणि भेदक जीवनदर्शनाने ती श्रेष्ठ, कलात्मक होते. म्हणून

दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या. म्हणून कथा कथानकप्रधान आहे की मनोविश्लेषणात्मक आहे हा वाद महत्त्वाचा नसून ती किती समर्थ जीवनदर्शन घडविते हे महत्त्वाचे असते. त्या दृष्टीने ही कादंबरी यशस्वी आहे असे वाटत नाही. ती वाचनीय देखील एका मर्यादित अर्थानेच झाली आहे. कारण चाणाक्ष वाचकाला लेखकाच्या निवेदन कौशल्याची लकब एकदा कळली की कुतूहलजागृती आणि कुतूहलपूर्ती यांमधील ताण अंदाजाने हेरता येतो. तो अंदाज फारसा चुकत नाही. लेखकाने वापरलेली भावनात्मक प्रतीकेही शब्दांसारखीच वापरून वापरून गुळगुळीत, झिजलेली दिसतात. (उदा. तुळशी वृंदावनाचे प्रतीक) या कादंबरीतील पटकथात्मक रचनाही फारसी प्रभावी ठरलेली दिसत नाही. नाटक वाचताना आणि पाहताना जो फरक जाणवतो तोच फरक पटकथा वाचताना आणि पाहताना पडत असावा असे निदान ही कादंबरी वाचताना जाणवले. कारण कादंबरीतील भाऊक प्रतीचे दृश्य स्वरूपात जो परिणाम साधतील आणि सामुदायिक मनाला जे आवाहन करतील तो परिणाम मला तरी कादंबरी वाचताना जाणवला नाही. एकूण या कादंबरीत नाही तंत्राचे नाविन्य की नाही जीवनदर्शनाचा वारकावा. कादंबरी वाचून संपल्यावर वाचकाच्या मनावर एकच परिणाम होतो. तो हा की, 'वा! वकिलाला तीन वर्षे शिक्षा का झाली हे कुतूहल लेखकाने शेवटपर्यंत कायम टिकविले आहे!' हे या कादंबरीचे यश का हेच तिचे अपयश!

■ ■

## स्त्रीफळा

प्रा. भीमराव कुलकर्णी यांचा 'स्त्रीफळा' हा दुसरा कथासंग्रह. त्यात १३ कथा आहेत. काहीसे विचित्र नाव आणि विनोदी मुखपृष्ठ (स्त्रीच्या गोलंदाजीने पुरुषाचा त्रिफळा उडतो आहे.) पाहता हा विनोदी कथासंग्रह असावा असे वाटते. पण संग्रहातील सर्वच कथा विनोदी नाहीत. काही हलक्याफुलक्या विनोदाचे तुषार उडविणाऱ्या (टक्कर, सांडु गुरुजी), काही कारुण्याच्या काठावर रेंगाळणाऱ्या (शांत अशांत, स्त्री, व्याख्यान, सुटका इ.) आणि काही विनोद आणि कारुण्य यांच्या मनोज्ञ मिश्रणाने ओलावलेल्या (फी, का?, अंगार इ.) आहेत. सर्वच कथा वाचनीय असल्या तरी मला आवडल्या तिसऱ्या प्रकारच्या कथा.

'शांतअशांत' आणि 'बिंदू' या कथा 'पण लक्षात कोण घेतो?' आणि 'भावबंधन' या गाजलेल्या साहित्यकृतींशी निगडीत आहेत. पहिली कथा हरिभाऊंच्या त्या कलाकृतीवर होणाऱ्या वेगवेगळ्या परिस्थितीत असलेल्या स्त्रियांच्या वेग-

वेगळ्या प्रतिक्रिया दर्शविते, ' बिंदांदू ' ही कथा ' भावबंधन 'चे कर्ते राम गणेश गडकरी यांच्या कॉलेजजीवनातील एका प्रसंगावर आधारलेली असावी. हा प्रसंग घडला होता की नाही हे मला ठाउक नाही. पण त्या नाटकातील इंदू, बिंदू या स्त्रियांच्या कुरुपतेवर केलेला कठोर विनोद कुरुप स्त्रियांच्या मनावर कसे ओरखाडे पाडतो हे परिणामकारकपणे दिसते. मात्र गडकऱ्यांनी हा निष्ठुर विनोद का केला असावा त्याचे कारण सांगण्याचा लेखकाचा कथेमागचा उद्देश आहे!

' का ? ' ' फळा ' ' अंगार ' या कथांत नवविवाहित दांपत्यांच्या अवखळ, लटक्या रागानुरागांची जी चित्रे दिसतात ती मोहक, मनोरम वाटतात. तसेच त्यातील कारुण्यही मनाला चटका लावून जाते. सांसारिक जीवनातील हासू आणि आसू लेखकाने खेळकर आणि तितक्याच हळुवारपणे दर्शविले आहेत. ' टक्कर ' या कथेतील एक निराळा अनुभव मिस्किल निवेदनामुळे वाचनीय झाला आहे.

' सांडु गुरुजी ' आणि ' सुटका ' या दोन कथा किस्स्यासारख्या आहेत. असे किस्से सांगणे या लेखकाला उत्तम साधते. पहिल्या कथेतील इरसाल व्यक्ती ( सांडु गुरुजी, त्यांची बायको आणि स्वतः निवेदकही ! ) आणि दुसरीतील एक क्रूर वाटणाऱ्या माणसाच्या अंतःकरणातील नाजुक भावनांचा झरा यांचे कुशल चित्रण लेखकाने केले आहे.

' फूऽऽ गट्टी ' कथेत एका बालमनाचे दर्शन घडते. तर व्याख्यान या कथेत आपल्याकडच्या विचारवंतांच्या कृतिशून्यतेचा मर्मभेदक उपहास लेखकाने केला आहे. या कथेतील प्राध्यापक विवेकानंदांवर व्याख्यान देऊन आणि ' एका तरी गरीबाच्या आपण उपयोगी पडले पाहिजे ' असा संदेश देऊन एका पुढाऱ्याच्या गाडीतून वेगाने स्टेशनकडे निघाला आहे. तेवढ्यात त्या गाडीचा धक्का लागून एक गरीब रिक्षावाला जखमी होतो. हा अपघात गाडीच्या वेगामुळे झालेला असतो. त्यामुळे तो रिक्षाड्रायव्हर आपल्यावरील अन्यायाविरुद्ध निकराने भांडू लागतो. ज्याच्या गाडीत बसून प्राध्यापक महाशय निघाले आहेत तो राजकीय पुढारी लाच देऊन, धाकदपटशा करून त्या रिक्षावाल्यास गप्प करू पाहतात. पण रिक्षावाला शरण जात नाही. शेवटी प्राध्यापक महाशयांना उशीर होतो. या कारणासाठी तो धीरोदात्तपणे झगडणारा सामान्य रिक्षावाला गाडी जाऊ देतो. आणि हे सारे तो प्राध्यापक मात्र विलक्षण थंडपणे, अलिप्तपणे पहात उभा असतो. कोणतेच भाष्य प्रत्यक्षपणे न करणारी ही कथा फार बोलकी होते...... ' फी ' या कथेत कारुण्याच्या पार्श्वभूमीवर विनोद फुलत गेल्याने ती मोठी हृदयंगम झाली आहे.......एका मध्यमवर्गीय घरातील लहान मूल मेले आहे. त्याला जाळण्याची कामगिरी शाम कुलकर्णी नावाच्या शाळकरी पोरावर आली आहे. हा पोरगा शाळेची १३ आणे फी कशी भरायची या विवंचनेत आहे. तो गावातल्या चारसहा जणांच्या मदतीने ते प्रेत घेऊन स्मशानात आलाय. थंडीचा कडाका पडलाय. मग जळणाऱ्या सरणाजवळ बसून शेकणारी, विडी पेटवणारी ती माणसे, त्यांतील एक

शौचास पळतो, सरणाशीच निवेदक कुलकर्णी स्वप्न पाहात झोपतो, तेवढ्यात काहीजण शिवीगाळ करत लाकडं, गोवऱ्या आणतात. प्रेताची विल्हेवाट लावतात आणि मग कामाची मजुरी घ्यावी तसे त्यातील एकेकजण निर्दयपणे शामकडून पैसे वसूल करतात. प्रेताच्या टाळूवरचे लोणी खाणारे जे मानवी जीवन त्याचे स्मशानाच्या पार्श्वभूमी-वरील हे वर्णन अत्यंत प्रभावी वाटते. त्यात शाम कुलकर्णीच्या निरागस निवेदनामुळे ते सारे कारुण्यात भिजत जाते. साधीच कथा वेगळ्या पातळीवर चढते.

या कथांची वाङ्‌मयीन वैशिष्ट्ये पाहू जाता असे दिसले की, सर्वच कथा छोट्या, आटोपशीर आहेत. लहान कथा लिहिताना नेमक्या आणि अर्थपूर्ण तपशीलावर भर द्यावा लागतो. ते या लेखकास चांगले साधले आहे. त्यामुळे कथा वाचनीय झाल्या आहेत. अर्थात या कथा आपणास वाचनीय वाटतात त्या केवळ त्यातील आटोपशीर चटकदारपणामुळे असे मात्र नाही. तर या कथांत जीवनातील चमत्कारिक अनुभव कलात्मक पातळी धारण करताना दिसतो. पुन्हा मूळचा अनुभव असा विचित्र आणि नाट्यपूर्ण असतो की तो वाचनीय करण्यासाठी लेखकास तंत्रामंत्राचा जाणीवपूर्वक आधार घ्यावा लागत नाही.

काही कथा ' फ्लॅश बॅक ' पद्धतीने सांगितल्या असल्या तरी त्यांचे एक नाविन्य-पूर्ण, वेगळे वैशिष्ट्य जाणवते. ते हे की, मागचे पुढचे प्रसंग वर्णन करताना लेखक त्या प्रसंगातील कालानुक्रम निवेदनात विरघळून टाकतो. मनःपटलावर अनेकदा वेगवान-रीतीने सरमिसळ झालेले संज्ञाप्रवाह वाहताना आढळतात. त्यावेळी जो संमिश्र अनुभव आपणास येतो तसाच अनुभव या कथा वाचताना येतो. काळाचे भान हरपून मनो-विश्वाचे एकदम प्रत्ययकारी दर्शन घडते. पुन्हा त्यामुळे एकाच अनुभवास एकाच वेळी विविध रूपे, विविध रंग येऊ लागतात. या चमत्कारिक अनुभवप्रक्रियेची प्रचीती या तंत्रामुळे येते व कथावस्तूला चांगलाच उठाव मिळतो.

जीवनानुभव वैचित्र्याने आणि व्यापकतेने समृद्ध झालेला असला की तांत्रिक गोष्टींचा फारसा आधार न घेताही ललितलेखन उत्तम साधून जाते या गोष्टीची प्रचीती ' त्रीफळा ' वाचताना येते. हेच या लेखकाचे खरे सामर्थ्य आहे.

■ ■

## इतिहास कोण घडवितो ?

' समाजाला व त्याच्या इतिहासाला चालना देणारी प्रमुख शक्ती कोणती ? आणि समाज घडविण्यात जनता व वीर पुरुष कोणते कार्य करतात ' हे प्रश्न आता स्वातंत्र्योत्तर वीस वर्षानंतरच्या काळात इतिहासकाराला परखडपणे विचारण्याची वेळ

आली आहे. असे प्रश्न या छोटेखानी पुस्तकात मांडून त्यांचे उत्तरही कॉ. डांगे यांनी दिले आहे. समाजविकासाच्या वस्तुनिष्ठ व्यक्तींनी इतिहासास चालना मिळते व इतिहास घडविण्यात जनता प्रामुख्याने कार्य करते. सारांश वीरपुरुष हा परिस्थितीजन्य असतो अशी त्यांच्या मते उपरोक्त दोन्ही प्रश्नांची उत्तरे त्यांनी दिली आहेत. हे प्रश्न इतिहासाच्या अभ्यासकास निःसंशय महत्त्वाचे आहेत व त्यांची उत्तरे कॉ. डांगे यांनी दिली हे लक्षात घेता ती अनपेक्षित आहेत असे कुणालाच वाटणार नाही.

या पुस्तकात कॉ. डांगे यांनी इ. स. १९६९ साली भोपाळ येथे मध्य प्रदेशाच्या इतिहासपरिषदेचे उद्घाटन करताना जे भाषण केले त्याचे भाषांतर निरनिराळ्या ५ लेखांत करून त्यास च गांधीजींच्या जन्मशताब्दीस लिहिलेल्या आणखी एका लेखाचे भाषांतर ६ वा लेख म्हणून जोडले आहे. पुस्तकांत दोन विषयांचे विवेचन केले आहे. एक ' इतिहास व गांधीजी ' आणि दुसरा ' जातिव्यवस्था व अस्पृश्यता '. वस्तुनिष्ठ भौतिक परिस्थितीने इतिहास घडविला ' गांधी ही व्यक्ती इतिहासाचे साधन बनली ' (पृ. ९) हा निष्कर्ष पहिल्या विषयाबाबत त्यांनी सांगितला आणि समाजाच्या अंतिम मूलकारणाचा शोध मनुष्याच्या मेंदूत नव्हे तर, उत्पादनाच्या आणि विनिमयाच्या पद्धतीच्या बदलांत, अर्थात प्रत्येक विशिष्ट कालखंडातील आर्थिक जीवनात घेतला पाहिजे. अर्थात जातिसंस्था व अस्पृश्यता ही त्या बदलांचेच फळ असून पुढील काळात जातिसंस्था व अस्पृश्यता नष्ट व्हावयाची असेल तर यंत्रयुगास वेगाने निमंत्रण दिले पाहिजे, कारण ' भारताच्या भूमीवर उभा राहिलेला प्रत्येक नवा कारखाना जातिसंस्थेचे थडगे बनतो ' असा निष्कर्ष कॉ. डांगे यांनी उत्पन्न केलेल्या दुसऱ्या प्रश्नाबाबत सांगितलेला आहे.

प्रस्तुत प्रश्न विचारास चालना देणारे आहेत यात शंका नाही. इतिहास व गांधीजी या विषयाच्या चर्चेत कॉं. डांगे यांनी कार्लाइलच्या प्रसिद्ध वीरपुरुष सिद्धांताचे खंडन करण्याचा यत्न केला आहे. एका अर्थी भारतातील विद्यमान राजकीय व सामाजिक कोलाहलाच्या अवस्थेत वीरपुरुष सिद्धांताच्या मंडनापेक्षा खंडनच अधिक आवश्यक आहे. कारण वीरपुरुष सिद्धांतावर विश्वास ठेवणारा अशा परिस्थितीत जनतेचा उद्धार करणारा कोणीतरी पुढे येईल अशा भाबड्या आशेवर विसंबून राहतो व जनता दैववादी वैफल्यात बुडून राहते हे खरे, पण शास्त्राच्या चर्चेत परिस्थितीला अवश्य असलेला निष्कर्ष सांगण्याच्या मोहापेक्षा तर्कशुद्ध निष्कर्ष मांडणे हेच अधिक महत्त्वाचे आहे. या दृष्टीनें कॉ. डांगे यांच्या सिद्धांतांचे परीक्षण करता गांधीजी हे वस्तुनिष्ठ परिस्थितीचे साधन बनले असे प्रतिपादन करणे हे निखालस चुकीचे आहे असे म्हटले पाहिजे. कॉ. डांगे यांच्या मीमांसेवर पहिला आक्षेप असा घेता येतो की त्यांचे विवेचन एक प्रकारे भाऊबंदकी नाटकांतील ज्योतिषाच्या ' पाहिले आणि सांगितले ' या पद्धतीचे आहे. इ. स. १९१९ साली जालियनवाला बागेत झालेल्या कत्तलीने गांधींनी ब्रिटिश साम्राज्यविरोधक पवित्रा घेतला हे ऐतिहासिक सत्य असले तरी तशी घटना घडल्यानंतर

कॉ. डांगे म्हणू शकतात की जनतेत साम्राज्यविरोधी संततेची भावना उत्पन्न झाली व त्यामुळे गांधी ही 'व्यक्ती इतिहासाचे साधन बनली'. ब्रिटिशांनी भारतात जुलूम व कत्तली केल्या त्यांपेक्षाही हिंस्र व भयानक असे अत्याचार पोर्तुगीजांनी, डचांनी व फ्रेंचांनी आपापल्या वसाहतींतून प्रसंगोपात्त केल्याचे इतिहासांत नमूद आहे मग तेथे आणखी गांधींसारखे कोणी इतिहासाचे साधन बनण्यास पुढे का आले नाहीत ? दुसरे असे की जनतेत साम्राज्यविरोधी भावना उत्पन्न झालेली होती हे खरे असले तरी त्याकाळी निःशस्त्र व हतबल जनतेत सत्याग्रहाची अध्यात्मिक शक्ती जागृत करून तिच्या ठिकाणी अहिंसक प्रतिकाराचा विश्वास उत्पन्न करण्यात गांधीजी हे नुसते निमित्तमात्रच नव्हते तर सर्वस्वी कारणीभूत होते हे लक्षात घेणे जरूर आहे. सारांश येथे वस्तुनिष्ठ परिस्थितीने इतिहास घडविला नसून वीरपुरुषाने (गांधींनी) इतिहासास कलाटणी दिली असेच इतिहासकारास नमूद करावे लागेल. त्याबरोबर नेताजी सुभाषचंद्रबोस यांच्या आझाद हिंद सेनेच्या हिंसक मार्गानेही तत्कालीन भारतीय इतिहासास कलाटणी मिळणे शक्य होते की नाही हा विचार इतिहासाच्या अभ्यासकास लक्षात घ्यावा लागतो. असो. याविषयावर येथे अधिक चर्चा करण्याची आवश्यकता नाही.

जातिव्यवस्था आणि अस्पृश्यता याविषयांवरील कॉ. डांगे यांचे विवेचन असेच एकांगी व अर्धसत्य आहे. जातिसंस्थेच्या उगमाचा शोध व त्या संस्थेचा विकास यांचा विचार करताना समाजशास्त्र, मानववंश शास्त्र, भूगोल, मानवी टोळ्यांच्या परिभ्रमणाचा इतिहास यांतील काही एक गोष्टींचा विचार न करता कॉ. डांगे यांनी मार्क्सप्रणीत वर्गसिद्धान्ताच्या आधारे आपली मीमांसा पुढे मांडलेली आहे, वर्ण जाती व वर्ग यांची गल्लत केलेली आहे व अस्पृश्यतेच्या उगमाची मीमांसा तर त्यांना मुळीच समाधानकारक रीतीने करता आलेली नाही. 'अस्पृश्यतेचा जन्म का झाला ?' असा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर कॉ. डांगे देतात 'शोषक व शोषितांतील संबंध चिघळले, श्रीमंती आणि दारिद्र्य यांतील अंतर अतिशय वाढले आणि शूद्र व दास बनविलेल्या जातींची बंडे अमानुष दडपशाही करून दडपण्यात येऊ लागली **हे त्याचे कारण आहे.**' (पृ. ३२) या डांग्यांच्या उत्तराने खुद्द डांग्यांचे तरी समाधान होईल का नाही याची मला जबरदस्त शंका आहे ! एका तासाच्या अवधीत व्याख्यान देताना विभूतित्व, जातित्व व अस्पृश्यतेची मीमांसा यांसारखे महत्त्वाचे विषय समाधानकारक रीतीने हाताळता येत नाहीत हे मला मान्य आहे. पण अशावेळी या विषयाला दुसऱ्या बाजू असतील असे सावध विधान करून ठासून विधान न करण्याची काळजी घ्यावी हे इष्ट असते. पण जे विधान करावयाचे ते ठासून करावयाचे हात्र कॉ. डांग्यांचा खाक्या, त्यामुळे शास्त्राचे अभ्यासक डांगे व प्रचारक डांगे यांची गमतीदार गल्लत मात्र वाचकांस पहावयास मिळते.

मार्क्सप्रणीत मानवी प्रगतीच्या पाच टप्प्याच्या आधारे जातीची उपपत्ती लावण्याच्या नादात कॉ. डांगे हे विसरतात की शंभर वर्षांपूर्वी होऊन गेलेला कार्ल

मार्क्स व त्याची मीमांसा ही, तो ज्या काळात व परिस्थितीत होऊन गेला त्या काळातील विचारांनी मर्यादित झालेला होती ही गोष्ट मार्क्सचे एक अभ्यासक डॉ. लोहिया यांनी आपल्या Wheel of History या ग्रंथात पृ. २७ ते ३१ वर दाखवून दिलेली आहे. मार्क्सला आदिम साम्यवाद, दासप्रथा, सरंजामशाही आणि कम्युनिझम् (पृ. २१) असे मानवी विकासाचे पाच टप्पे दिसले, पण मानवी विकास हा या स्टेशनवर कायमचा थांबणार होता काय? कम्यूनिझमप्रणीत भांडवलशाही हा पुढला टप्पा बिचाऱ्या मार्क्सला दिसला नसेल, पण झेकोस्लोव्हाकियावर जबरदस्ती करणाऱ्या व यूरोप आपल्या टाचेखाली ठेवू पाहणाऱ्या रशियाचे उदाहरण डोळ्या-समोर असणाऱ्या कॉ. डांग्यांनाही दिसू नये याचा अर्थ एवढाच की विवेचक डांग्यांवर प्रचारक डांग्यांची जबरदस्ती झाली. असो. या विषयावर खूपच चर्चा करता येईल.

या छोटेखानी पुस्तकाचे समीक्षण पुरे करण्यापूर्वी कॉ. डांगे यांची ऐतिहासिक विधाने चुकीची वाटतात तेवढी त्यांच्या नजरेस आणण्याची परवानगी घेतो. पृ.१२ वर 'त्याच्या (बुद्धाच्या) राजकुमार शिष्याने राज्य मिळविण्यासाठी त्याच्या डोळ्यादेखत स्वतःच्या पित्याला ठार मारले' हे विधान बिंबिसाराचा मुलगा अजातशत्रु याला उद्देशून आहे. बिंबिसाराला अजातशत्रूने मारले हे खरे, पण तेव्हा अजातशत्रु हा बुद्धाचा शिष्य नव्हता. त्याच्या आयुष्यात झालेले परिवर्तन बरेच नंतरचे आहे. (भारतीय विद्याभवन इतिहास खं २ पृ.-२७). दुसरे विवेचन पृ. ३४ वरील. यांतही कालविपर्यासाचा दोष घडला आहे. ब्राह्मणांची मध्यस्ती टाळावी म्हणून दलितवर्गातील साधूंनी भक्ती व नामस्मरणाचा मार्ग सांगितला. पण त्यांना पुनः आपल्या वर्चस्वाखाली ठेवून घेण्यासाठी उच्चवर्गीयांनी भगवंताच्या तोंडून स्त्रियो वैश्या तथा शूद्राः तेऽपियांतिपरांगतिम् असे आश्वासन दिले असे कॉ. डांगे म्हणतात. त्यांचे हे विधान चूक वाटते, कारण नामस्मरणाचा भक्तिमार्ग हा भगवद्गीतेच्या नंतरचा असला पाहिजे. असो. कॉ. डांगे यांचे लेखन नेहमीच प्रचारक खरे परंतु प्रक्षोभक व विचारास चालना देणारे असते. तसे हे छोटेखानी पुस्तक आहे.

■ ■

## दुर्दम्य–खंड पहिला

'दुर्दम्य' ही लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचे जीवनचित्र कादंबरीरूपाने साकार करणारी कृती आहे आणि गंगाधर गाडगीळांसारख्या समर्थ लेखकाने ती साकार केली आहे.

लोकमान्य टिळकांच्या जीवनावरची ही कादंबरी सुमारे ३५० पृष्ठांत साकार करण्याची मूळ कल्पना होती परंतु प्रत्यक्षात मात्र ३५० पृष्ठांमध्ये टिळकांच्या जीवनाचा १८९८ पर्यंतचा, म्हणजे त्यांच्या राजकीय जीवनाला पहिल्या राजद्रोहाच्या शिक्षेमुळे उठाव आला आणि त्यांनी आपल्या कर्तृत्वाचे तोरण बांधले, इथपर्यंतचाच भाग आला आहे. म्हणजे या कादंबरीचा हा केवळ पहिला खंड आहे.

हा पहिला खंड कादंबरीकाराने ज्या पद्धतीने उभा केला आहे तीच पद्धत त्याने शेवटपर्यंत अवलंबिली तर राहिलेला खंड केवळ याचप्रमाणे सुमारे ३५० पृष्ठांत आटो पेल असे वाटत नाही.

याचे कारण लोकमान्य टिळकांचे समग्र चरित्र तपशिलासह उभे करण्याचा हा एक प्रयत्न आहे. आणि हे चरित्र उभे करताना जी निवड लेखकाने केली आहे ती कादंबरीकारापेक्षा चरित्रकाराला साजेशी अशी आहे. त्यामुळे ही कृती कादंबरीपेक्षा चरित्राला अधिक जवळची आहे आणि विचारांती ती तशी आहे, हेच योग्य आहे आणि इष्ट आहे असे वाटते.

माझे हे विधान काहींना विलक्षण वाटण्याची शक्यता आहे, परंतु चरित्रात्मक कादंबरी नावाच्या वाङ्मयप्रकाराला मराठीत पहिल्याप्रथम रूप देताना ज्या अभूतपूर्व अडचणींना मला तोंड द्यावे लागले, त्या अनुभवाच्या आधारानेच मी हे बोलतो आहे. ह्या मांडवाखालून जाताना जे व्रत पाळावे लागते त्यामुळे कादंबरीलेखनामध्ये चरित्रात्मक कादंबरी लेखनाचे शिवधनुष्य पेलणे ही सुळावरची पोळी आहे, असे माझे ठाम मत आहे. गेल्या काही वर्षांत चरित्रात्मक कादंबऱ्यांची जी लक्षणीय निर्मिती झाली आहे, तिच्या अवलोकनानंतर हा वाङ्मयप्रकार पेलताना होणारी अनेकांची त्रेधातिरपीट पाहून तर हे मत आणखीनच बळकट होते.

लोकमान्य टिळकांचे अथपासून इतपर्यंत सारेच आयुष्य अत्यंत संग्रामशील असे आहे. त्यामुळे अशा संग्रामशील आणि तेजोमय अशा जीवनचित्रणाची कादंबरी-लेखनासाठी निवड करणे आणि रूढ पारंपारिक पद्धतीने लेखन करणे अनेक अर्थाने बरेच सोपे असते. अशा व्यक्तींच्या जीवनातील उत्कट प्रसंगांची नाट्यपूर्ण मांडणी केली आणि मराठी वाचकांची नाडी माहीत असल्यामुळे साऱ्या लेखनाची बैठक भाव-विवशतेची ( Sentimentality ) ठेवली तर लेखन लोकप्रिय ठरल्याखेरीज राहात नाही. गाडगीळांनी विषय निवडण्याबाबतीत काही वेगळेपणा दाखविला नसला तरी तो मांडताना मात्र बराच विचार केला आहे, असे दिसून येते. कारण टिळकांच्या जीवनातील एकेक प्रसंग त्यांनी क्रमवारीने, अगदी सरळ रेषेत एकासमोर एक, अशा रीतीने उभे केले आहेत. त्यामधला साधेपणा इतका विलक्षण आहे की कित्येक वेळेला तो सुबोधपणाकडे झुकतो की काय असे वाटायला लागते. परंतु वस्तुस्थिती तशी नाही. प्रत्येक प्रसंग सरळ, साध्या परंतु कलात्मक रीतीने साकार करताना टिळकांच्या व्यक्तिमत्त्वावर त्यांचे सारे लक्ष असते. टिळकांची दुर्दम्य महत्त्वाकांक्षा आणि निर्भय बाणा कसा

अनुक्रमणिका

आक्रमक होत गेला आणि एक सामान्य वाटणारा तरुण तत्कालीन पुणेरी वातावरणावर हळूहळू स्वतःची छाप कशा रीतीने ठेवीत गेला हे त्यांनी चांगल्या प्रकारे दाखविला आहे. अशासारखी कादंबरी लिहीत असता चरित्रनायकावर सुरुवातीपासून भावक्षेपगाने विभूतिमत्वाची छाप न मारता, अशा व्यक्तीतील नेमका माणूस दाखविणे फार कठीण असते. गाडगीळांचा प्रयत्न असा 'माणूस' दाखविण्यावर आहे आणि हाच या कृतीचा महत्त्वाचा विशेष आहे. टिळकांच्याबद्दल गाडगीळांच्या मनात अत्यंत आदर आहे आणि त्या आदराला त्यांनी कुठेही तडा जाऊ दिला नाही, परंतु तरीही ते दडपण दूर सारुन हाडामांसाची ही व्यक्ती आपल्या वैयक्तिक आणि परिस्थितीने घेरलेल्या अभेद्य अशा दुबळेपणावर आणि अंधःकारावर कशा रीतीने प्रहार करू शकली याचे फार मोठे कुतूहल आपल्या सर्वांना आहे. त्यांच्याबद्दलची चरित्रविषयक सारी साधनसामग्री धुंडाळूनही मनातले हे सारे कुतूहल पूर्ण होईलच असे नाही. गाडगीळांनी हे कुतूहल या कृतीत सतत जागे ठेविले आहे आणि आपल्या परीने याची सयुक्तिक मीमांसाही केली आहे. ही मीमांसा अत्यंत सूचक अशा पद्धतीने ललित लेखनाच्या पातळीवर जाऊ शकली नाही, कारण नाइलाजाने त्यांनी सारी, संपूर्ण बैठकच चरित्रलेखनाच्या पातळीवर ठेवल्याने त्यांच्या लेखनावर मर्यादाच फार आल्या आहेत. आणि या मर्यादा ओलांडून जाणे हे सध्यातरी गाडगीळांसारख्या प्रतिभावंताला आव्हानच ठरले आहे. सध्या तरी, मराठीत लालित्यपूर्ण चरित्रलेखनाची वाण लक्षात घेऊन गाडगीळांच्या कृतीने ही उणीव भरून निघेल असे वाटते. टिळकचरित्रविषयक साऱ्या साधनसामग्रीचा उपयोग करून टिळकांची विद्यार्थिदशा, त्यांचा न्यू इंग्लिश स्कूलमधील उमेदवारीचा काळ, आणि त्यानंतरची राजकीय साधकावस्था यांचे त्यांनी केलेले चित्रण, टिळकांची घडण कशी होत गेली याची चांगली कल्पना देते. विशेषतः पहिल्या आणि दुसऱ्या भागामध्ये टिळक आणि त्यांचा परिसर यांचे चित्रण करताना सुसंगत रीतीने त्यांच्या आजूबाजूच्या व्यक्तिमत्त्वांचे दर्शन गाडगीळांनी फार चांगल्या रीतीने घडविले आहे. डेक्कन कॉलेजातील टिळकांचे सहाध्यायी, न्यू इंग्लिश स्कूलमधील त्यांचे सहकारी यांची व्यक्तिचित्रे टिळकांच्या संदर्भात चांगली लक्षात राहतात. त्यांमध्ये वामन शिवराम आपटे व न्या. मू. रानडे यांच्या व्यक्तिचित्रणांमध्ये जी उपहासाची छटा अवतरली आहे त्यामुळे ती एकांगी वाटतात. तिसऱ्या भागात संमतिवयाच्या कायद्या-संबंधाने, चहा ग्रामण्यप्रकरणामध्ये आणि १८९७ च्या प्लेगसमयी टिळकांच्या व्यक्ति-मत्त्वाला जी गती मिळाली, त्याच्या संथ चित्रणामुळे पहिल्या दोन भागांइतका तिसरा भाग परिणामकारक वाटत नाही. तिसऱ्या भागापासून टिळकांच्या जीवनचरित्राची मांडणी करण्यासाठी भरपूर साधने उपलब्ध आहेत. त्यामुळे मूळ भाषणे, ठराव, चर्चा जशीच्या तशी देण्यामध्ये कलात्मक दृष्टीला तडा जातो. तुरुंगातून सुटून आल्यावर 'पुनश्च हरि ॐ' हा पहिलाच जो अग्रलेख टिळकांनी लिहिला तो वाचताना टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाची सारी अंगे अगदी स्पष्ट होतात. त्यांतील लोकांच्या ऋणाचा भार टिळक

किती भावमयतेने उराशी बाळगत होते, हे लक्षात येते. ह्या खंडाच्या शेवटी या भावमयतेचा उपयोग यापेक्षाही अधिक करून घेतला असता, तर हा साराच प्रसंग अधिक उठावदार झाला असता.

■ ■

## हातभट्टी

मराठी कादंबऱ्यांमध्ये सध्या चरित्रात्मक व ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या बरोबर झोपडपट्टीविषयक कादंबऱ्यांचा जमाना सुरू झाला आहे. शंकरराव खरात यांची ' हातभट्टी ' ही कादंबरी, या झोपडपट्टीविषयक कादंबऱ्यांमध्ये अत्यंत महत्त्वाची ठरावी अशी आहे.

झोपडपट्टीतील कंगाल, बुभुक्षित जीवनाबरोबरच कर्करोगाप्रमाणे हातपाय पसरणारी गुन्हेगारी आणि ती ज्यातून उदित होते, त्या हातभट्टीचे साक्षात विश्वरूपदर्शन घडवून वाचकांना विचारोन्मुख करण्याचे मौलिक कार्य या कादंबरीने केले आहे. आजपर्यंत झोपडपट्टीविषयक ज्या कलाकृती निर्माण झाल्या, त्यामध्ये तपशिलाच्या व माहितीच्या दृष्टीने या कादंबरीतील चित्रण अव्वल दर्जाचे ( Fitted with full and first hand information ) आहे.

आजच्या सुसंस्कृत आणि वेगडी जीवनामध्ये मश्गुल असलेल्या शहरीजीवनाला त्या वेगडीपणाच्या मुर्दाडपणामुळे ठायीठायी अमंगळ, ओंगळ अशी झोपडपट्टीची लक्तरे लोंबत आहेत. झोपडपट्टीचा आणि त्याच्याचबरोबरीने दिवसेंदिवस उग्र स्वरूप धारण करणाऱ्या वाढत्या गुन्हेगारीचा अन्योन्य संबंध असून आजच्या दृष्टीने हा एक अत्यंत ज्वलंत असा सामाजिक प्रश्न बनला आहे. शंकरराव खरातांची दृष्टी ही मूलतः सामाजिक दृष्टीने विचार करणाऱ्या साक्षेपी अशा विचारवंतांची असल्यामुळे त्यांनी या कादंबरीची रचना मोठ्या पोटतिडीकीने केली आहे. त्यामुळे झोपडपट्टीतील गुन्हेगारी आणि त्या गुन्हेगारीमध्ये गुरफटत गेल्यामुळे तेथील साऱ्यांच्या जीवनप्रवाहाला आलेले विलक्षण अमानवी, अस्थिर स्वरूप ही चिंतेची बाब ठरावी हाच दृष्टिकोण त्यांनी येथे सतत ठेविला आहे. असे करीत असताना गुन्हेगारीमध्ये निर्ढावलेल्या मनांची मग्रुरी, मस्ती आणि त्या पोटी निर्माण झालेली बेफिकिरी आणि निर्भयता याचे त्यांनी साक्षात चित्र उभे केले आहे. त्यामध्ये त्या व्यक्तींच्या अतीव शिवराळ उक्ती व कृतींही त्यांनी अगदी सहजतेने व्यक्त केल्या आहेत. सारी झोपडपट्टीच कशी हातभट्टीमय होते आणि हातभट्टीखेरीज झोपडपट्टीतील प्रत्येक व्यक्तीचे लौकिक जीवन अशक्य कसे होते, हातभट्टीचा दादा हा एका अर्थाने कसा विलक्षण कल्पक आणि धडाडीचा असतो, याचेही चित्र येथे वस्तुनिष्ठ दृष्टीने साकार झाले आहे. बाली, जॉली व गुल्ल्या यांच्या रूपाने

झोपडपट्टीतील हातभट्टीच्या आधारावर विलक्षण बेगुमानपणे वावरणाऱ्या तरुणांचे दर्शन घडविताना लेखकाने त्यांच्या अनेकविध हालचालींचे अत्यंत वास्तव चित्र उभे केले आहे आणि त्यांची ही वाताहत कशी होत जाते, हेही सुचविले आहे. चिमा आणि चंद्रीच्या रूपाने शरीरविक्रय करणाऱ्या मादक स्त्रियांच्या बाजारी विश्वाची या वातावरणाला जोड देऊन हातभट्टीच्या अधीन होऊन त्यांचे गल्ले भरणाऱ्या व्यसनासक्त समाजाचेही यथार्थ दर्शन घडविले आहे. सबंध कादंबरी हातभट्टीचा दादा, त्याचे हस्तक व पोलीस यांच्या भोवती फिरत ठेविली असता, या झोपडपट्टीमध्ये या हातभट्टीच्या चरकात माणसे कशी सापडत जातात आणि त्यांची सर्वांगाने वाताहात होते, हे दाखविण्यासाठी कादंबरीमध्ये नान्या व त्याचे कुटुंब यांच्याभोवती ही हातभट्टीमय झोपडपट्टी फिरत ठेविली आहे. रेल्वेत काम करणारा, सुखाने संसार करणारा नान्या विनाकारण पोलिसांच्या धाडीत अडकविला जातो आणि त्यामुळे नोकरी जाते. शेवटी असहाय्य होऊन तो हातभट्टीवर रात्रपाळी करतो आणि दुसऱ्या धाडीत त्याला तुरुंगाची हवा खावी लागते. शेवटी त्याची सुशील पत्नीही या हातभट्टीच्या चरकात सापडते व तुरुंगात जाते, मुलांना रिमांडहोममध्ये ठेवण्यात येते आणि सुटून आल्यावर तीही हातभट्टीत सामील होतात आणि त्यातून शेवटी जवळजवळ सारे घर वेचिराख होते. नान्याची ही होणारी वाताहात अंतःकरण पिळवटून टाकते. आणि त्याबरोबर त्याच्या या अधःपतनाला आजची सामाजिक चौकटच जबाबदार आहे, आणि ती बदलण्याची ताकद आपल्यामध्ये नाही, या कल्पनेने मन विषादाने भरून येते. काळ्यासारख्या पोलीस अधिकाऱ्याचे एखादे अपवादात्मक उदाहरण सोडले तर एकंदर जीवनचित्रणातून ह्या समस्येच्या भेसूरपणाचे स्वरूप लक्षात येऊन मन गजबजून उठते.

शंकररावांसारख्या शांत मनोवृत्तीच्या विचारवंताने विनाकारण भडकपणाच्या आहारी न जाता वास्तवपूर्णतेने उलगडलेली ही कहाणी जे काही सांगून जाते, त्यामुळे मन कमालीचे अस्वस्थ बनते. कलात्मकतेच्या दृष्टीने लेखक अनेक ठिकाणी काहीसा उणा पडत असला तरी मूळ अनुभव आणि त्यातील अस्वस्थ करण्याची शक्ती अशा काही विलक्षण पातळीवरची आहेत की, त्यामुळे या कादंबरीच्या रूपाने एका ज्वलंत सामाजिक प्रश्नाचे हे चक्षुर्वैसत्यं वर्णन समाजशास्त्रज्ञांना, शासकांना, विचारवंतांना विचार करावयास लावील यात शंका नाही.

■ ■

अनुक्रमणिका

## मनवृंदावन

'मनवृंदावन' हा श्रीमती सुशील पगारिया या होतकरू कवयित्रीचा एक महत्त्वाचा कवितासंग्रह आहे. जानेवारी १९७० मध्ये म. सा. परिषदेच्या हीरक-महोत्सवातील कविसंमेलनप्रसंगी त्यांनी म्हटलेल्या काही कवितांमुळे त्यांचे नाव रसिकांच्या चांगलेच लक्षात राहिले. त्या पाठोपाठ त्यांच्या साठ एक कवितांचा हा संग्रह प्रसिद्ध झालेला आहे.

ह्या कवितासंग्रहातील कविता सहज जरी चाळल्या तरी, या बहुसंख्य छोट्या कवितांतील कवयित्रीच्या काही एका विशिष्ट भावनेचा आविष्कार एकदम लक्ष वेधून घेतो. एकीकडे जीवनाची उत्कट वेडोपी आणि या वेडोपीच्या मागोमाग, एखाद्या साडीला किनार असावी त्याप्रमाणे जाळत जाणारी असीम विकल धारा, अशा दुहेरी स्वरूपाचा, प्रत्येकाच्या मनातला एकीकडे खुलणारा आणि दुसरीकडे सलणारा अनुभव त्यांच्या बऱ्याच कवितांतून वारंवार व्यक्त होतो. असे हे अनुभव त्यांच्या छोट्या मोठ्या कवितातून सहजसाध्या शब्दांतून सहजगत्या साकार होतात आणि चटका लावतात. मात्र ह्याच अनुभवाच्या एकसारख्या धारा बरसू लागल्यामुळे त्यातील एकसुरीत्वाची बोचही तापदायक ठरायला लागते. पहिलावहिलाच संग्रह असल्याने गूढ अनामिक हुरहूर, रेंगाळलेल्या दिशा, असीम क्षीतिज, एकलेपणा यांचा जो संवेदनाशून्य शाब्दिक संकेताचा आणि प्रतीकांचा अनुकरणजन्य हव्यास नवोदितांमध्ये हटकून:जाणवतो तोही कवयित्रीच्या काही कृतींतून जाणवल्याखेरीज राहात नाही. शब्दसौंदर्य, नादमाधुर्य आणि भावगर्भता यांच्या सहज संगमातून ही कविता साकार झाली आहे, असे खांडेकरांनी आशीर्वादपर शब्दात म्हटले आहे. त्याचा प्रत्यय साऱ्याच कवितांतून येतो आणि मुक्तछंदाच्या अनेक प्रकारच्या आविष्कारातील कवयित्रीचे यशही लक्षात रहाते.

■ ■

## क्रांतिकारक टिळक आणि त्यांचा काळ

"आम्ही सशस्त्र क्रांतिकारी लोकमान्य टिळकांना गुरु मानीत असून त्यांना वारंवार भेटून त्यांचे मार्गदर्शन घेत होतो. या गोष्टींचा टिळकचरित्रग्रंथांतून निर्देश नाही. खरे टिळकचरित्र अद्याप अज्ञात आहे." असे प. वा. डॉ. खानखोजे हे म्हणत. १९२० मध्ये नाव बदलून ते भारतात आले होते व टिळकांना भेटले होते. टिळकांनी त्यांना सांगितले की, त्यावेळेच्या परिस्थितीत भारतांत क्रांतिसदृश करण्यासारखे कांही

नसल्यामुळे त्यांनी पुनः तसेच गुप्तपणे अमेरिकेमध्ये जावे. त्या उपदेशाप्रमाणे डॉ. खानखोजे हे परत गेले. ते अमेरिकेतील अशस्त्र क्रांतिकारी " गदर "पक्षाचे एक नेते व कार्यकर्ते होते हे प्रसिद्ध आहे.

श्री. अ. ज करंदीकर यांचा क्रांतिकारक टिळकांसंबंधाचा हा ग्रंथ लोकापुढे येण्यापूर्वीच डॉ. खानखोजे हे दिवंगत झाले होते. त्यांच्या हाती हा ग्रंथ पडला असता तर ते आनंदाने उद्गारले असते की " मला ज्या प्रकारचे टिळकचरित्र पाहिजे होते, ते पुष्कळांशी करंदीकरांच्या या ग्रंथाने पुरविले आहे. " अमेरिकेतील क्रांतियत्नासंबंधी काही गोष्टी कळवावयाच्या तर त्या सांकेतिक भाषेत चित्रशाळेचे श्री. वासूकाका जोशी यांचेकडे कळवाव्या असेही डॉ. खानखोजे यांना टिळकांनी बजावले होते. क्रांतिकारक यांचा टिळकांशी संबंध येत असावा असा संशय त्यावेळी सरकारी अधिकाऱ्यांनाही होता. पण टिळकांच्या अखंड सावधपणामुळे काडीचाही पुरावा सरकारच्या हाती पडला नाही. तसाच तो सर्वसामान्य लहानमोठ्या टिळकचरित्रलेखकांनाही अज्ञात राहिला.

श्री. अ. ज. करंदीकरांची विद्वता चौफेर वाचन आणि सूक्ष्म संशोधन या गोष्टी आश्चर्यकारक आहेत. त्यांनी लिहिलेले ग्रंथ अत्यंत विद्वन्मान्य तर आहेतच, परंतु त्यामुळे करंदीकर हे विद्वाजड नसून ते रसिकही आहेत, फ्रेंच इटालियन स्पॅनिश इ. युरोपिय भाषा व प्राकृत गुजराती उर्दू व हिंदी या भाषा यांचे त्यांना ज्ञान आहे. त्या भाषांतील काही लेखांची मराठी भाषांतरेही मराठी मासिकांमधून त्यांनी प्रसिद्ध केली आहेत. १९४१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या " गांधी-मुस्लिम कॉन्स्पीरसी " या पुस्तकांत गांधीमौलाना यांच्या कारस्थानांतून पाकिस्तान निर्माण होईल असे भविष्य त्यांनी वर्तविले होते ते सहासात वर्षांनंतर सत्य ठरले.

त्यांना प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा किंवा प्रतिक्रियात्मक चेतना श्री. न. र. फाटक यांच्या रानडे व गोखले यांच्या चरित्रांतून टिळकांवर केलेल्या कुत्सित आरोपांमुळे झाली. श्री. न. र. फाटक यांचे त्या दृष्टीने आभारच मानावेसे वाटतात. बरे झाले त्यांनी अनेक वाङ्मयशास्त्रसज्ज अशा श्री. अ. ज. करंदीकरांसारख्या योद्ध्याला किंवा वाद्याला डिवचले. अत्यंत साधार अशी माहिती व सरकारी प्रतिवृत्तांतील आणि इंग्रजी ग्रंथांतील उतारे देऊन, करंदीकरांनी फाटक यांचे आरोप खोडून उलट रानडे-गोखले पक्षच कसा वारंवार सरकारकडे कागाळ्या करून टिळकांवर संकटे आणीत होता हे दाखवले आहे. प्रत्येक ठिकाणी विश्वसनीय आधार दिले आहेत. या ग्रंथात शेवटी संदर्भसूची नसली तरी, तो ग्रंथ वाचल्याने पन्नास साठ ग्रंथ आणि सरकारी प्रसिद्ध कागदपत्रे वाचल्याचा वाचकांना लाभ होतो. हा ग्रंथ इंग्रजीत झाला असता तर बरे झाले असते असे एकवेळ वाटते, पण कोणाही मराठी न जाणणाऱ्या व इंग्रजी जाणणाऱ्या वाचकाच्या हाती जर हा ग्रंथ दिला तर केवळ इंग्रजी उतारे वाचूनही त्याला या ग्रंथाचे पुष्कळसे मर्म समजेल.

हा ग्रंथ म्हणजे टिळकचरित्र नाही, तर त्यांच्या काळाचा, त्या काळातील क्रांति-यत्नांचा, बंगाली व महाराष्ट्रीय क्रांतिकारक समित्यांच्या हालचालींचा, त्यांचा टिळक आणि त्यांचे अनुयायी यांच्याशी आलेल्या गुप्त संपर्काचा साधार इतिहास आहे.

ग्रंथातील पहिली ९० पृष्ठे किंवा चार प्रकरणे वासुदेव बळवंताच्या बंडाच्या पूर्वीच्या इतिहासाची आहेत. " वासुदेव बळवंत आणि टिळक " या पाचव्या प्रकरणा-पासून टिळकांचा संबंध येतो. तेव्हापासून, कोल्हापूर, बडोदा आणि बंगालमधील शस्त्राचारी क्रांतिकारकांची जी गुप्त कारस्थाने होत होती त्यांची पुष्कळच माहिती दिली असून टिळकांशी त्यांचा कसा संबंध आला होता याचे धागेदोरेही उलगडून दाखविले आहेत. १९०८ च्या टिळकांवरील अभियोगाच्या कालापर्यंतचाच यात इति-हास आहे. पुढे १९०८ ते १४ पर्यंत टिळकांच्या अनुपस्थितीत काय झाले, तसेच १९१४ नंतर सहा वर्षांचे टिळकजीवन यांचा परामर्श या ग्रंथात नाही. टिळक लॉर्ड विलिंग्डन यांच्या युद्धपरिषदेतून उठून आल्याचा उल्लेख केवळ अनुषंगानेच आला आहे.

मूळ श्री. न. र. फाटक यांचे रानडे चरित्र व टिळक चरित्र मी पाहिलेले नाही. म्हणून त्याच्या तीव्र प्रतिक्रियेने करंदीकर यांनी सुधारक–मवाळ पक्षाबद्दल लिहिलेले अपशब्द कितपत समर्थनीय ठरतात हे मला नेमके सांगता येणार नाही. पण हे लोक सरकारकडे टिळकांविरुद्ध चहाड्या करीत इ. अपशब्द न वापरता केवळ विदारक वस्तुस्थिती मांडून कार्यभाग श्री. करंदीकरांना साध्य होता असे वाटते. मात्र सुधारक-मवाळ पक्षातील टिळक आणि यांचा पक्ष यांच्या विरुद्ध सरकारला चिथावणी देत, यासंबंधी इतके निर्विवाद पुरावे करंदीकरांनी मांडले आहेत की, ती गोष्ट मान्य करावीच लागते.

बंकीमचंद्राच्या ' आनंद मठ ' कादंबरीची प्रेरणा वासुदेव बळवंतांच्या बंडा-वरून झाली असली पाहिजे. यासंबंधाने करंदीकरांनी केलेले विवेचन नवीन आहे, आणि पटण्यासारखे आहे. ( पृ. १०५ ते ७ ) तसेच ' रँडवधातील गूढ घटना ' पृ. २१३, सुरत कॉंग्रेसपूर्वीचे गोखलेपक्षाचे वर्तन अप्रामाणिकपणाचे होते हा अमलेश त्रिपाठी सारख्या त्रयस्थ ग्रंथकाराचा निर्वाळा पृ. ३४८ इ. अनेक नव्या गोष्टी या ग्रंथावरून समजतात. स्ट्रॅची यांनी १८९७ च्या खटल्यात राजद्रोहाच्या कलमाचा भलता अर्थ केला तो न्या. रानडे यांना त्यांच्यापुढील खटल्यांत दुरुस्त करता आला असता. पण ती दुरुस्ती करण्याचे धैर्य त्यांना झाले नाही. " मग त्यांना सरकारी अन्यायी कारस्थानातील भागीदार का म्हणू नये ? " असे अनुमान पृ. २२६ वर सूचनात्मक रीत्या मांडले आहे. पुण्यातील प्लेगच्या काळात रँडच्या सैनिकांनी केलेल्या अत्याचाराची प्रतिवृत्ते घेऊन टिळक मुंबईला दि. २७ जुलैला गेले होते. गोखले यांनी विलायतेत केलेल्या विधाना-बद्दल माफी मागू नये असा प्रयत्न टिळक करीत असता त्यांना पकडण्यात आले. त्यांना जामिनावर सोडण्याचे २९ जुलै व २ ऑगस्टचे अर्ज रानड्यांनी फेटाळले!

पुढे ४ ऑगस्टला न्या. बद्रुद्दिन तय्यबजी यांनी टिळकांना जामिनावर सोडण्याचे धैर्य दाखवले. पण त्या दिवशीच गोखल्यांचे माफीपत्र टाइम्समध्ये प्रसिद्ध झाले होते. गोखले यांनी गोऱ्या सैनिकांवर केलेले आरोप त्यांच्या पक्षाच्या 'सुधारक' पत्रानेही केले होते. डॉ. माथुर यांच्या इंग्रजी गोखलेचरित्रातून टिळक हे गोखल्यांच्या विधानांना पुरावा गोळा करीत होते या वस्तुस्थितीची क्षुद्रपणाने थट्टा केलेली आहे. तिला अत्यंत साधार उत्तर करंदीकरांनी दिले आहे.

गोखले-रानडे व टिळक यांचे राजकीय आत्यंतिक द्वैत हे आता इतिहासगत झाले आहे. पण श्री. न. र. फाटक व डॉ. माथुर यांनी तो इतिहास उकरून टिळकांना नाहक दोषी ठरवले. त्यामुळे टिळक चरित्रातील व टिळकांच्या प्रतिपक्षीयांच्या कारस्थानातील अनेक धागेदोरे करंदीकरांना ठणठणीत स्पष्टवक्तेपणाने उकलून दाखविणे प्राप्त होऊन त्यांचा हा अपूर्व ग्रंथ लोकांपुढे आला. टिळक हे लोकांची विचारक्रांती करणारे म्हणून 'क्रांतिकारक' म्हणता येतील. सशस्त्र क्रांतीच्या उठावणीला आणि दहशतवादी शस्त्राचारांना त्यांची सहानुभूती व गुप्तपणे साह्यादि असे. टिळक "साधनशुचिता" मानणारे कधीच नव्हते. "साधनोचितता" किंवा साधनांची पर्यायाने उपकारिता ते मानीत होते. शस्त्रबलाने गोऱ्यांनी घेतलेल्या राज्याविरुद्ध शस्त्रबलाचा प्रयोग शक्य झाल्यास त्याचे पाप टिळकांनी मानले नाही. टिळक तुमचे मार्ग सैतानी आहेत, असे गांधीजी टिळकांना म्हणाले होते. पुढे गांधीजींनी ब्रिटिश राज्यालाच 'सैतानी' हे विशेषण लावले. "ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्" या गीतेतील ईश्वरी न्यायानुसार टिळकही ब्रिटिश राज्याला तोडीस तोड झाले.

—

**Dust of time** (इंग्रजी कवितासंग्रह) – कवि आनंद सावंत मल्लू. अव्वल इंग्रजीच्या काळात महाराष्ट्रातील काही घराणी मॉरिशसला जाऊन स्थायिक झाली. सावंत हे त्यांपैकीच होत. आज इंग्रजी भाषा ही त्यांची मातृभाषा असली तरी मराठी भाषा, वाङ्मय व संस्कृती यांबद्दल त्यांना मोठे प्रेम आहे. या प्रेमापोटीच मॉरिशसचे काही तरुण मराठी भाषा शिकवण्यासाठी आज महाराष्ट्रात आले आहेत. श्री. आनंद सावंत हे मॉरिशसच्या केनेडी कॉलेजात इतिहासाचे प्रमुख प्राध्यापक आहेत. गेल्यावर्षी ते मुद्दाम वर्ध्याच्या मराठी साहित्य संमेलनास हजर राहिले होते. त्यानंतर नवाकाळ मध्ये मराठी माणसाच्या आत्मसंतुष्ट वृत्तीबद्दल व त्याला इंग्रजी भाषा नीट येत नसल्याबद्दल मुलाखत देऊन त्यांनी खळबळ उडविली होती. त्यांच्या या कवितासंग्रहात त्यांनी वर्ध्याचे चित्र रंगविले आहे. भारतातील अस्वच्छ खेडी आणि दारिद्र्य यांबद्दल त्यांनी आपल्या कवितेत उपरोधाने खंत व्यक्त केली आहे. आजच्या बेकारीची बोलकी चित्रे त्यात आहेत. त्याबरोबरच काही उत्कृष्ट निसर्गचित्रे व मुलांची स्वभावचित्रेही लक्ष वेधून घेतात.

—

## म. सा. परिषद ग्रंथालय :
## एक आवाहन

परिषदेचे ' वा. गो. आपटे ग्रंथालय ' अद्ययावत असावे.

संशोधकांना आणि अभ्यासकांना याचा नित्य उपयोग व्हावा यांसाठी आम्ही प्रयत्नशील आहोत.

परिषदेने त्या दृष्टीने जुलैपासून आपला संदर्भ-विभाग अभ्यासकांसाठी खुला केला आहे. प्राज्ञ, विशारद, आचार्य, बी. ए., एम्. ए. बी. एड्. एम्. एड्. इ. विद्यार्थ्यांना अभ्यासाची पुस्तके घरी देण्याचीही सोय केली आहे.

तरी परिषदेच्या चाहत्यांना विनंती की—

त्यांनी आपल्याजवळचे मराठी ग्रंथ, जुनी हस्तलिखिते, नियतकालिके व जुन्या दुर्मिळ वृत्तपत्रांचे अंक, परिषदेस भेट म्हणून द्यावे. अभ्यासक त्यांचे सदैव ऋणी राहतील.

←

किंवा

अल्प किंमतीस हे वाङ्मय परिषदेस विकत द्यावे.

**भीमराव कुलकर्णी : कार्यवाह : ग्रंथालय विभाग**

अनुक्रमणिका

# परिषद्-वार्ता

१३ जुलै ते २६ आक्टोबर १९७०

## कार्यवाह, म. सा. परिषद

गेल्या तीन साडेतीन महिन्यांत परिषदेतर्फे पुढील कार्यक्रम झाले. त्यांचा थोडक्यात वृतान्त असा.

**स्मृतिदिन** : कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त दि. १९ जुलैला श्री. प्रभाकर पाध्ये यांचे 'वामनराव व्यक्ति व विचार' या विषयावर व्याख्यान.

**चर्चा-परिसंवाद** : दि. १३ जुलैला डॉ. वेंकटेशशास्त्री जोशी यांच्या 'चिकित्सक आवृत्तीकरिता परिभाषा कोश' या विषयावरील अभ्यासपूर्ण टिपणावर निमंत्रितांच्या बैठकीत उद्बोधक चर्चा झाली. चर्चेत डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. म. दा. साठे, डॉ. प. ल. वैद्य, श्री. वि. वा. परांजपे, श्री. देविसिंग चौहान, डॉ. न. का घारपुरे, श्री चिं. ग. काशीकर, आचार्य स. ज. भागवत, डॉ. म. अ. मेहेंदळे, श्री. शि. द. जोशी, डॉ. ग. वा. पळसुले, डॉ. रा. ग. हर्षे, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. शि. ह. धुपकर, श्री. वा. बा. भागवत, प्रा. कृ. श्री, अर्जुनवाडकर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. म. दे. पंडित, श्री. वि. त्र्यं शेटे, डॉ. अशोक केळकर, आचार्य वि. प्र. लिमये आणि प्रा. भीमराव कुलकर्णी इत्यादींनी भाग घेतला होता.

दिनांक ४ आक्टोबरला प्राचार्य गंगाधर गाडगीळ लिखित 'दुर्दम्य' कादंबरीवर श्री. ना. ग. गोरे यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. प्रा. डॉ. भालचंद्र फडके, श्री. श्री. ज. जोशी, सौ. भावना भार्गवे आणि प्रा. डॉ. द. न. गोखले यांनी परिसंवादात भाग घेतला. या कार्यक्रमास कादंबरीचे लेखक प्राचार्य गाडगीळ हे उपस्थित होते. प्रा. गाडगीळ यांनी शेवटी आपल्या भाषणात कादंबरीलेखनामागील आपली भूमिका आणि लेखनपद्धती समजावून सांगितली. अध्यक्ष श्री. गोरे यांच्या समयोचित समारोपानंतर हा गर्दीचा व अतिशय रंगलेला कार्यक्रम संपला.

**अभीष्टचिंतन** : परिषदेशी विविध नात्यांनी दीर्घकाळ घनिष्ट संबंध असणारे म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचे ८० व्या वाढदिवसानिमित्त १३ सप्टेंबर रोजी निमंत्रिकांच्या बैठकीत अभीष्टचिंतन करण्यात आले. याप्रसंगी 'मराठीगद्य : १८ वे शतक आणि १९ वे शतक' या विषयावर परिसंवाद आयोजित केला होता. प्रा. भीमराव कुलकर्णी, डॉ. म. वि. गोखले, प्रा. गं. बा. सरदार आणि डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी परिसंवादात भाग घेतला होता. शेवटी म. म. पोतदार यांनी या विषयावर मौलिक विचार व्यक्त केले. सुप्रसिद्ध कवि-कथा लेखक आणि परिषदेचे एक कार्यवाह श्री. ग. ल. ठोकळ यांचे ६१ व्या वाढदिवसानिमित्त २७ सप्टेंबर रोजी अभिष्टचिंतन करण्यात आले. याप्रसंगी त्यांनी आपले जपानविषयक अनुभव विशद केले.

अनुक्रमणिका

परिषदेचे माजी चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांच्या दिनांक २६ आक्टोबर रोजी झालेल्या षष्ट्यब्दिपूर्तिसमारंभात परिषदेने भाग घेऊन अभीष्टचिंतन केले.

**भेटीगाठी :** पुण्याचे महापौर श्री. नामदेवराव मते यांनी ५ ऑगस्ट रोजी परिषदेस भेट देऊन परिषदेच्या कार्यासंबंधी समाधान व्यक्त केले. वर्धा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष व प्राचार्य पु. शि. रेगे यांनी १६ आक्टोबर रोजी परिषदेस भेट दिली.

मध्यप्रदेशातील प्रसिद्ध साहित्यिक प्रा. ग. वा. कवीश्वर यांनी मे महिन्यात परिषदेस भेट देऊन उपस्थितांशी मध्यप्रदेशातील महाराष्ट्रीय बांधव व त्यांचे साहित्य यासंबंधी विचारविनिमय केला. त्यांचा उल्लेख गेल्या अंकात राहिला होता.

**दुखवटासभा :** कै. डॉ. इरावती कर्वे आणि डॉ, मु. ग. पानसे यांच्या निधनानिमित्त २९ ऑगस्टला डॉ. एच. डी. सांकलिया यांच्या अध्यक्षतेखाली दुखवटासभा भरली होती. या सभेत डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. अ. गं मंगरूळकर, आचार्य स. ज. भागवत आणि प्रा. विद्याधर पुंडलिक यांची श्रद्धांजली वाहणारी भाषणे झाली.

**आचार्यचे वर्ग :** परिषदेने आचार्यचे वर्ग यावर्षी प्रथमच सुरू केले आहेत. त्याला विद्यार्थ्यांकडून चांगला प्रतिसाद मिळाला आहे. डॉ. वाळिंबे, डॉ. फडके, डॉ. गोखले, डॉ. प्र. न. जोशी, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्रा. ओतुरकर इत्यादिकांचे मार्गदर्शन या वर्गासाठी लाभले आहे.

त्याचप्रमाणें बी. ए. एम्. ए. आदि विद्यार्थ्यांसाठी अल्पवर्गणीत अभ्यासालयाची व घरी अभ्यासार्थ घरी पुस्तके देण्याची सोय करण्यात आली आहे. त्यालाही फार चांगला प्रतिसाद मिळाला आहे.

**केतकर व्याख्यानमाला :** ज्ञानकोशकार केतकर यांच्या स्मृत्यर्थ सुरू करण्यात आलेल्या व्याख्यानमालेतील २ रे व्याख्यान दि. १२ आक्टोबर रोजी डॉ. ना. र. इनामदार यांनी ' डॉ. केतकर यांचे राजकीय विचार ' या विषयावर दिले.

पत्रिकेच्या मागच्या अंकात परिषदेचे वा. गो. आपटे ग्रंथालय हे संदर्भाच्या दृष्टीने समृद्ध व्हावे यासाठी ग्रंथशौकिनांनी आपल्या जवळचे महत्त्वाचे ग्रंथ, नियतकालिके व हस्तलिखिते या ग्रंथालयास भेट द्यावी म्हणून आवाहन करण्यात आले होते. या आवाहनाप्रमाणे प्रा. अ. म. जोशी यांनी आपल्याकडचे अत्यंत महत्त्वाचे व दुर्मिळ असे सुमारे ५० ग्रंथ भेटीदाखल देऊन परिषदेला उपकृत करून ठेविले आहे. परिषद त्यांची ऋणी आहे.

**शाखासभा वृत्तांत :** गेल्या तिमाहीत संगमनेर आणि पंढरपूर या दोन ठिकाणी नव्यानेच शाखा स्थापन झाल्या. २५ ऑगस्टला म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली आणि डॉ. रा. शं वाळिंबे यांच्या हस्ते **संगमनेर** शाखेचे रीतसर उद्घाटन झाले. या प्रसंगी शाखाध्यक्ष प्रि. म. वि. कौंडिण्य यांनी म. म. पोतदार यांचे

अभीष्टचिंतन करून त्यांना शाल व श्रीफळ अर्पण केले. शाखेची घटनाही या प्रसंगी पक्की करण्यात आली. २ आक्टोबरला शाखेच्या वार्षिक सभेत पुढील पदाधिकाऱ्यांची निवड करण्यात आली – प्रि. म. वि. कौंडिण्य (अध्यक्ष), डॉ. सराफ व श्री र. ह. राठी (उपाध्यक्ष), प्रा. लिखिते (कार्याध्यक्ष) डॉ. काटे (कोषाध्यक्ष) श्री अनिल देवधर, श्री. प्र. द. देशपांडे (कार्यवाह) **पंढरपूर** शाखेचे औपचारिक उद्घाटन दि. २६ ऑगस्टला झाले. या वेळी उद्घाटक श्री. नारायण सुर्वे यांचे 'मी का लिहितो ?' या विषयावर व्याख्यान व कवितावाचन झाले. याच दिवशी शाखेच्या सभासदांची बैठक भरून तीत पुढील पदाधिकाऱ्यांची निवड करण्यात आली. श्री. भा. पं. बहीरट (अध्यक्ष) श्री. मनोहर वोंगडे (उपाध्यक्ष) प्रा. एम्. ए. शेख (कोषाध्यक्ष) श्री. एन. डी. चौगुले व श्री. अरुण निकम (कार्यवाह)

**धुळे :** शाखेतर्फे दर शनिवारी राजवाडे संशोधन मंदिरात नवोदित लेखकांच्या बैठकी भरविण्यात येतात व त्यात कथा, निबंध कविता इत्यादींचे वाचन होते. सांप्रत शाखेचे पदाधिकारी पुढील प्रमाणे आहेत – प्रा. ह. श्री. शेणोलीकर (अध्यक्ष) श्री. कांतिलाल गुजराथी (उपाध्यक्ष), श्री. द. रा. भट (कोषाध्यक्ष) प्रा. श्री. वि. खेर (कार्याध्यक्ष) प्रा. यशवंत पाटील व प्रा. व. य. घासकडवी (कार्यवाह)

**जळगाव :** शाखेतर्फे विकास मंडळाच्या सहकार्याने ६ आक्टोबर रोजी प्रा. अदवंत यांच्या अध्यक्षतेखाली कवी विंदा करंदीकर, प्रा. वसंत बापट आणि श्री. मंगेश पाडगावकर यांच्या काव्यगायनाचा बहारदार कार्यक्रम झाला. सांप्रत शाखेचे पदाधिकारी पुढीलप्रमाणे आहेत.–प्रा. ल. नी. छापेकर (अध्यक्ष) प्रि. म. वि. फाटक (उपाध्यक्ष) प्रा. म. मो. केळकर (कार्याध्यक्ष) प्रा. अं. गं. चिपळूणकर (खजिनदार) श्री. श्री. म. हळवे, श्री भगवानराव चौधरी व वि. भा. नेमाडे (चिटणीस)

सांगली शाखेची त्रैवार्षिक निवडणूक २६ जुलै रोजी होऊन पुढील पदाधिकारी निवडून आले – डॉ. ग. वा. तगारे (अध्यक्ष) प्रा. रा. वा. चिटणीस व प्रा. वि. भा. देशपांडे (उपाध्यक्ष) श्री. ई. म. महाजन, श्री. पु. के. दत्तवाडकर व श्री. श्री. ना. शिंदगी (कार्यवाह)

**सोलापूर शाखा** (१) शनिवार दिनांक २६ जुलै १९७० रोजी साहित्यिक आणि साहित्यप्रेमी यांचा मेळावा भरविण्यात आला. त्यात साहित्यिकास त्यांचे साहित्य प्रसिद्ध होण्यात आलेल्या अडचणी, प्रकाशक साहित्यिक संबंध, जुने व नवे साहित्यिक संबंध, इत्यादी विषयांवर उद्बोधक चर्चा झाली.

(२) रविवार दि. २७ सप्टेंबर रोजी श्री. पद्माकर देव व सौ. देव यांच्या "कौन्तेय" या श्री. शिरवाडकर यांच्या नाट्यवाचनाचा कार्यक्रम विशेषतः महाविद्यालयीन विद्यार्थ्यांकरिता म्हणून आयोजित करण्यात आला. तो फार यशस्वी झाला.

अनुक्रमणिका

## आगामी परीक्षा-सत्र

मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी परिषदेने १९३८ पासून सुरू केलेल्या परीक्षांचे यंदाचे ३२ वे सत्र १९ डिसेंबर १९७० पासून सुरू होत आहे.

विविध ठिकाणी या परीक्षांचे कार्य चालविणाऱ्या शाळा व महाविद्यालये यांच्याकडे त्यांच्या मागणीनुसार आवेदन-पत्रके रवाना झाली असून १५ नोव्हेंबर १९७० पर्यंत त्यांनी सर्व आवेदनपत्रे शुल्कासह परिषदेकडे पाठवावयाची आहेत.

आचार्य परीक्षा—प्रथम भाग ४, प्रश्नपत्रिका पुढीलप्रमाणे राहतील.

प्रश्न. १—वाङ्मयप्रकार – नाटक.

प्रश्न. २—प्राचीन ग्रंथकार – तुकाराम.

प्रश्न. ३—निबंध आणि समीक्षणशास्त्र.

प्रश्न. ४—महाराष्ट्र-संस्कृति.

**वि. सू.** प्रश्न. २ मध्ये ‘ नामदेव ’ऐवजी यावर्षी ‘ तुकाराम ’ आहे.

### परीक्षांचा कार्यक्रम ( १९७० )

**प्रथमा**

| | | |
|---|---|---|
| दि. १९ डिसेंबर | ३ ते ६ | प्रश्नपत्रिका १ |

**प्रवेश**

| | | |
|---|---|---|
| दि. १९ डिसेंबर, शनिवार | ३ ते ६ | प्रश्न-पत्रिका १ |
| दि. २० डिसेंबर, रविवार | ११ ते २ | प्रश्न-पत्रिका २ |

**प्राज्ञ**

| | | |
|---|---|---|
| दि. १९ डिसेंबर, शनिवार | ३ ते ६ | प्रश्न-पत्रिका १ |
| दि. २० डिसेंबर, रविवार | ११ ते २ | प्रश्न-पत्रिका २ |
| दि. २० डिसेंबर, रविवार | ३ ते ६ | प्रश्न-पत्रिका ३ |

**विशारद व आचार्य**

| | | |
|---|---|---|
| दि. १९ डिसेंबर, शनिवार | ३ ते ६ | प्रश्न-पत्रिका १ |
| दि. २० डिसेंबर, रविवार | ११ ते २ | प्रश्न पत्रिका २ |
| दि. २० डिसेंबर, रविवार | ३ ते ६ | प्रश्न-पत्रिका ३ |
| दि. २१ डिसेंबर, सोमवार | ११ ते २ | प्रश्न-पत्रिका ४ |

अमराठी भाषिकांच्या परीक्षा मागाहून तारीख जाहीर करून घेण्यात येतील.

**संमेलनासाठी ठराव :** महाबळेश्वर साहित्य-संमेलनासाठी ज्यांना ठराव पाठवावयाचे असतील त्यांनी ते सूचक-अनुमोदकांच्या स्वाक्षरीसह साहित्य-परिषदेच्या कार्यालयाकडे ६ नोव्हेंबरपर्यंत पाठवावेत.

अनुक्रमणिका

## काही परिषद-प्रकाशने

**संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती**—गं. बा. सरदार
संतांच्या कार्याची मीमांसा करणाऱ्या या महत्त्वाच्या पुस्तकाची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. मूल्य ५ रुपये

**मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ४**—संपादक : रा. श्री. जोग
आवृत्ती संपत आली. फार थोड्या प्रती शिल्लक आहेत. मूल्य १५ रुपये

**भाषा : अंतःसूत्र आणि व्यवहार**—संपादक मु. ग. पानसे
भाषाविषयक अधिकारी व्यक्तींचा मौलिक लेखांचा संग्रह मूल्य ६ रुपये

**शोधनिबंधाची लेखनपद्धती**—स. गं. मालशे
संशोधनात्मक व समीक्षणात्मक लेखन करणाऱ्या प्रत्येकाने नित्य आपल्या जवळ ठेवावे व त्याचे परिशिलन करीत राहावे असे पुस्तक मूल्य १–२५

**आनंदवनभवन**—म. वा. धोंड
समर्थ रामदासांच्या ' श्रीवनभुवनी ' या अत्यंत वादग्रस्त काव्यावर टाकलेला नवा प्रकाश मूल्य १ रुपया

**महाराष्ट्र-एक अभ्यास**—इरावती कर्वे
महाराष्ट्राच्या उद्गम आणि विकासाची उद्बोधक मीमांसा डिसेंबरमध्ये प्रसिद्ध होणार मूल्य २ रुपये

**महाराष्ट्र—साहित्य—परिषद** टिळक रस्ता, पुणे ३०

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

Cover Printed by
RANGREKHA ART WORKS POONA 5.

अनुक्रमणिका